


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




संपादक

डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

रचना

हेमचंद्र कराडकर

अक्षरजुळणी

अभिजित पंडित
फोन : ५३३ २१ ७२

मुद्रण व्यवस्था

विजय एंटरप्रायझेस
कळवा, ठाणे – ५
फोन : ५३४ ७८ २८

मालक, मुद्रक, प्रकाशक
आणि पत्रव्यवहार

श्री. नाना जोशी
४ – अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०२२

# तपशील

अंक तिसरा, वर्ष पहिले, १९९६

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका



# संपादकीय

**प्रिय रसिकहो,**

'तपशील' चा हा तिसरा अंक ! मागच्या दोन्ही अंकांना आपण दिलेल्या प्रतिसादाबद्दल आम्ही सर्व आपले आभारी आहोत. गेल्या अंकात भाषाविषयक एक सूत्र धरून आम्ही काही लेख, टिपणे दिली होती. या अंकामध्ये तीन प्रसिद्ध लेखकांसंबंधी त्यांच्या कलाकृतींविषयी आणि जीवनाविषयी काही वेगळे सांगणारे लेख आम्ही देत आहोत.

रॉबिन्सन क्रूसो या कादंबरीने जगभर अमाप लोकप्रियता मिळवली. लोकप्रिय व्यक्तींबद्दल अनेक खऱ्या-खोट्या, कथा-दंतकथा प्रसृत होतात हे आपण जाणतो. कधी कधी या कथा 'मिथ' चं स्वरूप धारण करतात. (मिथ म्हणजे जनमानसात रुजलेली दंतकथा जी पुढे कधी कधी दैवतकथा बनू शकते. ) हे मिथ वापरून पुन: पुन: वेगवेगळ्या कलाकृती निर्माण होतात. रॉबिन्सन क्रूसो या व्यक्तिरेखेला अशाप्रकारे 'मिथ'चं स्वरूप प्राप्त झालेलं आहे. प्रख्यात फ्रेंच लेखक मिशेल तुर्निए यांनी त्या कादंबरीतील एक व्यक्ति 'फ्रायडे' या मिथवर आधारित एक कादंबरी लिहिली आहे. ती कादंबरी चांगलीच गाजली. या कादंबरी लेखनामागचा आपला हेतू सांगण्यासाठी लेखकाने आत्मचरित्रवजा. एक टिपणही लिहिले. हा लेख एकूण तीन भागांचा असून त्यापैकी पहिला भाग आम्ही या अंकात देत आहोत. रॉबिसन्स क्रूसोचे लेखक डॅनियल डिफो हे महान लेखक का होते, व त्यांची ही कादंबरी अक्षर वाङ्मयात जमा होणारी का ठरते याचे विवेचन या अंकात दिलेल्या भागात केलेले आहे.

रहस्यकथा वाचणे हा अनेकांचा आवडीचा छंद असतो. अर्नाळकर,दीनानाथ लाटे यासारखी मराठी नावे आठवतील. याचा अर्थ ते सर पी. डी. जेम्स या लेखिकेशी तुलना करण्याजोगे लेखक नाहीत हे या ठिकाणी लक्षात ठेवावयास हवे. दुसरी अन्य नावे घेण्यासारखीही नाहीच. म्हणून त्यांची नावे घेतलेली आहेत. रेक्स स्टाउट, रेमंड चँडलर, रुथ केंडॉल, आर्थर कॉनन डॉईल यासारखी इंग्रजी लेखकांची नावे या संदर्भात आपणास चटकन आठवतात. रहस्यकथा लेखनाच्या प्रांतात आपलं अधिराज्य गाजवून अॅगाथा ख्रिस्तीने स्त्रियांचे या क्षेत्रातील कृर्तत्व सिद्ध केलंच आहे. अशीच दुसरी एक रहस्यकथा सम्राज्ञी आहे 'सर पी. डी. जेम्स'. हे सम्राज्ञीपद तिला तिच्या वाचकांनी बहाल केलेलं आहे. ब्रिटिश सरकारनेही तिच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा गौरव करून तिला 'सर' ही पदवी दिली. या लेखिकेची मुलाखत आम्ही येथे देत आहोत. तसेच त्या मुलाखतीत तिच्या कादंबरीचा The Innocent Blood – उल्लेख आहे म्हणून या कादंबरीचा थोडक्यात परिचयही दिलेला आहे.

डॅनियल डिफो यांच्याप्रमाणेच डी. एच्. लॉरेन्स हेही इंग्रजीतील प्रतिभावान लेखक ! प्रख्यात समीक्षक जॉर्ज स्टाईनर यांच्यामते डी. एच्. लॉरेन्स हे 'अस्सल' इंग्रजी लिहिणारे लेखक! त्यांचे लेखन लोकप्रिय झाले असले तरी त्यांचे व्यक्तित्व मात्र अल्पज्ञात, गूढच होते. या व्यक्तित्वाच्या एका छटेची ओळख प्रेमपुजारी या लेखात आपणास होईल.

आपल्याला वाचनछंद कसा जडला, आपण आजवर काय काय वाचलं, त्याचा आपल्या मनावर कितपत ठसा राहिला या संबंधीचे विविध लेखकांचे आत्मनिवेदन आपण 'असा हा वाचनछंद' या लेखमालेमध्ये वाचत आहात. अनेकदा कोणते पुस्तक कधी, कसे वाचावे याविषयी आपल्या मनात संभ्रम निर्माण होतो. वाचनातील चोखंदळपणा अनुभवानेच प्राप्त होऊ

(कृपया पृष्ठ २० पहावे)

# मिशेल तुर्निए – फ्रायडे

## १. डॅनिएल डिफो

**– डॉ. मंगला सरदेशपांडे**

प्रख्यात ब्रिटिश कादंबरीकार आयरीश मुर्डाक (IRISH MURDOCH) यांनी शेक्स-पिअरसंबंधी लिहिताना म्हटले आहे, शेक्सपिअर यांच्या नाटकातील अनेक पात्रे, आपल्या नात्याची वा परिचयाची झाली आहेत. त्यातली अनेक वाक्प्रचारातही आली आहेत. भारतीय उदाहरण घ्यायचे झाल्यास प्रख्यात विचारवंत मानवेंद्र रॉय यांनी पं. नेहरूंना हॅम्लेटची उपमा दिली होती. ही उपमा बरोबर की चूक हा प्रश्न नाही. शेक्सपिअरच्या नाटकातले हॅम्लेट हे पात्र त्यांना आठवले हे महत्त्वाचे. हे सारे जरी खरे असले तरी शेक्सपिअरने निर्माण केलेली पात्रे ही 'मिथ' झालेली नाहीत. त्या मिथवर आधारलेल्या साहित्यकृतीही रचल्या गेल्या नाहीत. मुर्डाक यांनी आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला आहे. शेक्सपिअर या नावाचा विसर एकवेळ लोकांना पडेल, पण हॅम्लेट, रोमिओ, ज्युलिएट, ऑथेल्लो इत्यादी पात्रांचा विसर पडणार नाही. डिफो यांच्या रॉबिनसन क्रुसो या कादंबरीतला 'रॉबिनसन क्रुसो' हा आता 'मिथ' ठरला आहे. हे मिथ गृहीत धरून आजवर अनेक कादंबऱ्या तयार झाल्या. प्रख्यात फ्रेंच लेखक मिशेल तुर्निए यांनी रॉबिनसन क्रुसो हे 'मिथ' न वापरता त्याच कादंबरीतील एक पात्र 'फ्रायडे' हे त्या 'मिथ' बरोबर वापरून, त्याला मध्यवर्ती पात्र धरून 'फ्रायडे' ही कादंबरी लिहिली. आपल्या बौद्धिक आत्मचरित्रातील एक प्रकरण आपण फ्रायडे का लिहिली याबद्दल त्यांनी लिहिले आहे. या दोन्हीबद्दल आपण भाग दोन व तीनमध्ये विचार करणार आहोत.

प्रथम डॅनिएल डिफो हा लेखक व त्याच्या रॉबिनसन क्रुसो यासंबंधी थोडेसे. खरे म्हणजे रॉबिनसन क्रुसो या कादंबरीच्या लेखकाचे नाव सामान्यपणे कोणाला ठाऊक नसते. असलेच तर आठवत नाही. आठवलेच तर त्यानी दुसरी अनेक चांगली पुस्तके लिहिली होती याची गंधवार्ताही कोणाला नसते. रॉबिनसन क्रुसो ही कादंबरी आता बालवाङ्मयाचाही भाग झाली आहे. डॅनिएल डिफो यानी मोल्ल फ्लँडर्स (MOLL FLANDERS), रोक्झाना (ROXANA), कॅप्टन सिंगलटन (CAPTAIN SINGLETON), कर्नल जॅक (COLONEL JACK) आणि इतर अनेक पुस्तके लिहिलेली आहेत. ती त्यांच्या काळी चांगलीच गाजली होती. त्यांचा खपही मोठा होता. थोडक्यात रॉबिनसन क्रुसो या कादंबरीला इतकी अफाट लोकप्रियता लाभली की त्यांची इतर पुस्तके चांगली असूनही ती विस्मरणात गेली. या संबंधातील एक आठवण चांगलीच बोलकी आहे. इ. स. १८७० साली, 'ख्रिश्चन वर्ल्ड' या नियतकालिकाच्या संपादकांनी, डॅनिएल डिफो यांच्या कबरीवर त्यांचे स्मरण होईल असा मजकूर असलेली संगमरवरी शिला

बसवावी, अशी विनंती ब्रिटिश जनतेला केली. त्याच्या अगोदर काहा वर्षे वीज पडून डिफो यांच्या कबरीला फारच नुकसान पोहोचले होते. ख्रिश्चन वर्ल्डच्या संपादकांच्या विनंतीनुसार पैसे जमा झाले व संमगरवरी शिला त्या कबरीवर समारंभपूर्वक बसविण्यात आली. त्यावर मजकूर होता, 'रॉबिनसन क्रुसो या कादंबरीच्या लेखकाच्या स्मरणार्थ !' थोडक्यात इतर पुस्तकांचे स्मरण व नामोच्चारही नाही. डॅनिएल डिफो यांच्या भक्तांना या सर्वच प्रकाराचा उद्वेग येईल व ते वाजवीच आहे. पण या विस्मरणात अनुस्यूत असलेल्या मुद्द्याचा विसर पडू देता नये. डिफो यांचे चरित्रकार मि. राइट यांनी त्याचा उल्लेख केलेला आहे. त्यांच्या मते 'खानदान' कुटुंबातील दिवाणखान्यातील मेजावर ठेवण्यासारख्या त्या इतर कादंबऱ्या नव्हत्या. प्रख्यात लेखिका व्हर्जिनिया वुल्फ यांनी या संबंधात लिहिताना म्हटले होते "एखाद्या दिवाणखान्यात उपयुक्त अशी फर्निचरसारखी वस्तू, ही आपली अभिरुची ठसविण्याच्या बाबतीत जर अखेरचा मानदंड आहे या विचारास आपण मान्यता देणार नसलो, तर मग या परिस्थितीचा आपण निषेध केला पाहिजे अथवा रॉबिनसन क्रुसो या कादंबरीला जागतिक प्रसिद्धी लाभल्याने, बाकीच्या कादंबऱ्यांना वास्तविक जितकी प्रसिद्धी मिळावयास हवी तेवढी मिळाली नसावी. डॅनिएल यांचे स्मारक उभारायचेच असेल आणि ते स्मारक या शब्दाच्या अर्थास पात्र ठरावयाचे असेल, तर या स्मारकावर किमान– पक्षी मोल्ल फ्लॉनडर्स, रोक्झाना या दोन कादंबऱ्याची नावे, डिफो यांच्या नावाबरोबरचा खोदली पहिजेत; त्या दगडावर अगदी खोल जातील अशा प्रकारे खोदली पाहिजेत. इंग्लिश भाषेतल्या ज्या काही थोड्या महान कादंबऱ्या आहेत, त्यात निःशंकपणे या कादंबऱ्यांची गणना खास करावी लागेल." डॅनिएल डिफो यांचा जन्म नेमका कोठच्या साली? १६६० किंवा १६६१ याबद्दल अजूनही वाद आहे. रिचर्डसन आणि फिल्डींग या दोन कादंबरीकारांच्या कितीतरी अगोदर डॅनिएल डिफो यांनी कादंबरीलेखनास सुरुवात केली, तेव्हा तसे ते उतारवयातच होते. ते साठीला आलेले होते. डिफो, हे या दोन लेखकांच्या अगोदरचे लेखक याला तसे महत्त्व नाही, पण एका बाबतीत महत्त्व जरूर आहे. ते पहिलेच कादंबरीकार असल्याने, त्यांच्या समोर कोणाचा कित्ता नव्हता. ते या वाङ्मयाप्रसराकडे वळले, तेव्हा कादंबरा या साहित्यप्रकाराबद्दल कोणाला कसलीच कल्पना नव्हती. म्हणूनच त्यांच्या स्वत:च्या अशा ज्या कल्पना होत्या त्यांच्या जोरावरच त्यानी उतारवयात कादंबरीलेखनास आरंभ केला. डिफो यांचा काळ सामान्यपणे १६६० ते १७३१ असा मानल्यास फार चुकीचे ठरणार नाही. डिफो हे पत्रकार होते, व्यापारी होते. त्यांना तत्कालीन इंग्लडच्या दैनंदिन राजकारणात चांगलाच रस होता, व त्यात ते भागही घेत असत. इंग्लडमध्ये दुसऱ्या जेम्सच्या जागी विल्ययम ऑफ ऑरेंज हे गादीवर आले. या राजास अनेकांचा विरोध होता. या विरोधकांचा उपहास करण्यासाठी, दि टु बॉर्न इंग्लिशमन (१७०१) ही कविता त्यांनी रचली. चर्च ऑफ इंग्लंडवर हल्ला चढविणाऱ्या 'द शॉर्टेस्ट वे विथ डिस्सेंटर्स' या त्यांच्या पुस्तिकेचे लेखन १७०२ सालातले. या पुस्तिकेचे लेखन केल्याबद्दल शिक्षा म्हणून त्यांना खोड्यात अडकविण्यात

आले. दंड भरावा लागला व सरतेशेवटी त्यांची रवानगी तुरुंगातही झाली. तेथून सुटून आल्यानंतर तत्कालीन ब्रिटिश सरकारचे हेर म्हणून काम करण्यास त्यांनी आरंभ केला. ही नोकरी त्यांनी काही वर्षेच केली. त्यानंतर ते अनेक सामाजिक गटांकरता व काही समाजधुरिणांसाठी हेरगिरीचे काम करीत. काही वेळा एकाच वेळी ते दोन्ही बाजुंकडून पैसे घेऊन काम करीत असाही पुरावा उपलब्ध आहे. १७०४ ते १७११ च्या दरम्यान ते दि. रिव्हू नावाची पत्रिका प्रसिद्ध करीत. तशा प्रकारची इंग्रजी भाषेतली ती पहिली पत्रिका. पुढे अनेकांनी, अशा प्रकारच्या पत्रिकांचे संपादन केले. ॲडिसन व स्टील हे प्रख्यात लेखक 'दि स्पेक्टॅटर' नावाचे साप्ताहिक चालवीत. तेही 'दि रिव्हू' या पत्रिकेवरच बेतलेलं होते.

रॉबिन्सन क्रुसो ही कादंबरी १७०९ साली प्रसिद्ध झाली. ही कादंबरी अलेक्झांडर सेलर्किक या खलाशाच्या प्रत्यक्ष अनुभवावर सर्वस्वी आधारलेली नसली, तरी ती त्या अनुभवापासून स्फूर्ती घेऊन लिहिलेली आहे. त्यांनी आपल्या या कादंबरीलेखनामागच्या सूत्राबद्दल स्वत:च लिहून ठेवलेले आहे. "केवळ कल्पनाशक्तीतून निर्माण झालेल्या कथानकाचा (वाचकाला) पुरवठा करणे, हे निश्चितपणे अश्लाघ्य असेच आहे. या अशा प्रकारच्या खोटे बोलण्याने हृदयात प्रचंड छिद्र तयार होते आणि या छिद्रातून खोटे बोलण्याची सवय हळूहळू प्रवेश करते." म्हणूनच लिहिलेल्या कादंबऱ्यांच्या आणि इतर प्रकारच्या पुस्तकांच्या प्रस्तावनेत या सूत्राचा ते वारंवार उच्चार करतात. आपण लिहिलेला कोठचाही मजकूर केवळ कल्पनेवर आधारलेला नाही, त्याला वस्तुस्थितीचा भरमक्कम आधार आहे, या मुद्यावर भर देण्याची पराकोटीची काळजी ते सातत्याने घेताना दिसतात. या जगात जे काही वाईट आहे, अनैतिक आहे, गुन्हेगारी स्वरूपाचे आहे, ते जगासमोर स्पष्ट शब्दात मांडून, जे दुष्ट प्रवृत्तीचे लोक आहेत त्यांच्या हृदयपरिवर्तनासाठी प्रयत्न करणे आणि जे भोळेभाबडे आहेत त्यांना धोक्याचा इशारा देण्याचा प्रयत्न, आपल्या लिखाणाकरवी आपण करीत आहोत हेही ते ठासून सांगत. अत्यंत उच्च स्वरूपाची नैतिक इच्छा हीच आपल्या लिखाणामागची प्रेरणा व उद्देश आहे असेही त्यांचे सांगणे होते. त्यांची जी नैसर्गिक प्रकृती व प्रज्ञा होती, त्याच्याशी त्यांनी गृहीत धरलेले तत्त्व व सूत्र हे फारच मिळते-जुळते आहे, ही वाचकांच्या दृष्टीने सगळ्यात आनंदाची गोष्ट. त्यांनी कादंबरीलेखनास सुरुवात करीपर्यंतच्या त्यांच्या साठ वर्षांच्या आयुष्यात त्यांनी अनेक टक्के-टोणपे खाल्ले होते. आयुष्यात अनेक चढउतार पाहिले. हा सारा अनुभव त्यांच्या मनात अगदी खोलवर खोदल्यासारखा पक्का जाऊन बसलेला होता. या नंतरच त्यांनी आपल्या जगावेगळ्या व अनोख्या अनुभवाला वाङ्मयाचे स्वरूप दिले. त्यांनी पुढील दोन ओळीत आपल्या आयुष्यातल्या चित्र-विचित्र अनुभवांचे सार दिलेले आहे :

NO MAN HAS TASTED DIFFERINE FORTUNE MORE
AND THIRTEEN I HAVE BEEN RICH AND POOR
वेगवेगळ्या प्रकारचा यापेक्षा अधिक अनुभव, दुसऱ्या कोणाला आला नसेल.



अनुक्रमणिका

तेरा वेळा श्रीमंत आणि दरिद्री माझ्यासारखे भाग्य कोणाला लाभले नसेल.

रॉबिनसन क्रुसो यांची थोरवी नेमकी कशात आहे, या संबंधात अनेकांनी लिहून ठेवले आहे. त्याबद्दल प्रख्यात फ्रेंच लेखक मिशेल तुर्निए यांना काय म्हणावयाचे, ते त्यांनी आपल्या आत्मचरित्रपर लेखात सांगितले आहे. ते या लेखाच्या तिसऱ्या भागात दिलेले आहे. व्हर्जिनिया वुल्फ यांनी या बाबतींत दोन प्रकारे चर्चा करता येईल असे म्हटले आहे. "मध्यमवर्ग अस्तित्वात आला. त्याला लिहिता वाचता येत होते. वाचनाबद्दल उत्सुकता होती. केवळ राजपुत्र व राजकन्या यांच्यासंबंधीच्या कथा वाचण्यापुरतीच ती मर्यादित नव्हती. त्यांच्या स्वत:च्या दैनंदिन व कंटाळवाण्या जीवनाचे तपशील, आणि खुद्द त्यांचे स्वत:चे जीवन या दोन्ही गोष्टीबद्दल वाचण्याचीही त्यांना जबर इच्छा होती. या मागणीचा पुरवठा वाङ्मयाने केला. त्यासाठी हजारो लेखण्या कार्यरत होत्या. साहित्याने फक्त काव्य करण्याऐवजी जीवनातील वस्तुस्थिती व प्राप्त परिस्थिती यांचा आविष्कार करण्यासाठी स्वत:ला सिद्ध केले होते. थोडक्यात कादंबरीचा विकास कसा होत गेला या दृष्टिकोनातून रॉबिनसन क्रुसो या कादंबरीचा जरूर विचार करता येतो. या विचाराबरोबर दुसराही एक दृष्टिकोन पुढे येतो. लेखकाची संहिता महत्त्वाची, मग लेखक व त्याचे जीवन हे महत्त्वाचे का नाही ? रॉबिनसन क्रुसो वाचावयास जेवढा वेळ लागणार नाही त्यापेक्षा कितीतरी अधिक वेळ या कादंबरीच्या लेखकांचे जे जीवन होते त्याचे तपशील जमा करण्यात जाईल. या लेखकाचे जन्मसाल कोणते, तो आपले नाव कसे लिहीत होता, DEFUE (डिफो) असे लिही, की DEFOE (ड-फो) असे लिही? त्याचे पूर्वज कोण होते ? तो पायमोजे, गंजिफ्राक इत्यादी होजयरी माल विकण्याचा धंदा आपल्या आयुष्याच्या पहिल्या काही वर्षांत करीत होता असे सांगितले जाते. ते खरे असेलही. पण सतराव्या शतकात 'होजयरी'चा धंदा, याचा अर्थ नेमका काय होता? डिफो यांनी केलेल्या इतर उद्योगांचा उल्लेख या पूर्वी येऊन गेलाच आहे. इंग्लिश वाङ्मयाशी ज्या कोणाचा जुजबी परिचय आहे, त्याच्या एक गोष्ट लक्षात आली असेल. एखाद्या कादंबरीचा विकास कसा झाला. कादंबरीकाराचे चिंतन व चरित्र या सर्वांचा तपास घेण्यासाठी अनेक तास व अनेक जीवने खर्ची पडली आहेत. हे सारे खरे असेल तरी महत्त्वाचा मुद्दा शिल्लक राहातोच. ही सारी माहिती आपण अगदी बारीक-सारीक तपशीलात जाऊन वाचली, तर मग त्या वाचनाने फक्त रॉबिनसन क्रुसो या कादंबरीच्या वाचनाने आपल्याला जो आनंद होतो, त्यात अगदी अल्प अशी भर पडते का ?

एवंच सरेतशेवटी वाचक आणि लेखक या दोघांच्यातला हा व्यवहार आहे. साहित्यकृतीचे वाचन झाल्यानंतरच पुढची चर्चा होणार. म्हणूनच डिफो यांनी मोजे विकण्याचा धंदा केला, त्यांचे केस पिंगट होते, आणि त्याला खोड्यात अडविण्यात आले होते, हे सारे ज्ञान अप्रस्तुत व व्यर्थ अशी चिंता आहे. व्हर्जिनिया वुल्फ यांच्या मते ही बहुरत्ना वसुंधरा कोठचे अलंकार घालते, इत्यादी गोष्टी साहित्यसमीक्षक आपल्यावर लादतात व लेखकाने केलेल्या साहसाकडे चरित्रकार आपले लक्ष वेधतात, ही सारी माहिती निरुपयोगी व गैरलागू आहे. लेखकाचा जो

दृष्टिकोन व आवाका आहे, त्यावर आपण प्रभुत्व मिळविले पाहिजे. हेच काम मोठे कठीण असते. कादंबरीकाराच्या खांद्यावर आपण एकाट्याने उभे राहायचे. आणि त्याच्या दृष्टिकोनातून आसमंताचे निरीक्षण करायचे. माणूस आणि माणसे, त्या मागे असलेला निसर्ग आणि त्याहीपेक्षा वरच्या स्थानावर असलेली महासत्ता– या महासत्तेस आपण सोईसाठी ईश्वर म्हणून संबोधू या, या सर्वच गोष्टी समान व मोठ्या आहेत. या महान गोष्टीवर लक्ष केंद्रित करणे क्रमप्राप्तच आहे. लेखकाने या वस्तूंचा क्रम कोठच्या पद्धतीने लावला आहे, हे वाचकाला समजेपर्यंत त्याने हे काम करावयास हवे. परंतु वाचकाला आपण हे काम पुरे केले आहे असे वाटले की, मगच त्याच्यापुढील अडचणींना आरंभ होतो. सर्वच परिस्थिती गोंधळाची आहे असे वाटते. अनेक बाबतीतले आडाखे चुकतात. हे त्या अडचणींचे स्वरूप आहे. आपण केलेली माणूस-माणसे ही यादी ही तशी सरळ, सोपी व त्याविषयी कसलाही वाद उत्पन्न होणार नाही, अशी यादी आहे हे आपल्या लक्षात येऊ लागते. परंतु कादंबरीकार, या गोष्टींचा एकमेकांशी अशा तऱ्हेने संबंध प्रस्थापित करतो की, वाचकास तो बिन-ओळखीचा वाटतो. काही वेळा तर या गोष्टी राक्षसी स्वरूप धारण करतात. गुण्यागोविंदाने राहाणारी, एकाच प्रकारे श्वासोच्छवास करणारी माणसे, अनेक बाबतीत वेगळ्याच प्रकारे विचार करताना आढळतात. प्रमाणबद्धता कशात आहे, यासंबंधी त्यांच्या मनात प्रचंड तफावत असते. एखाद्या व्यक्तीला माणूस हा प्रचंड वाटेल, या उलट झाड फारच छोटे वाटेल. दुसऱ्या कोणास, झाडे प्रचंड महाकाय आहेत, माणूस त्यांच्यामागे कोठेतरी उभा असलेला खिजगणतीतही घेऊ नये, असा प्राणी वाटेल. आपणास पाठ्यपुस्तके काहीही सांगोत, पण अनेक लेखक एकाच वेळी, एकाच कालखंडात लेखन करीत असतात. परंतु त्या अनेक लेखकातील प्रत्येकाला, जे काही दिसेल, त्याचा आकार वेगवेगळा असतो. उदा. स्कॉट हा प्रख्यात इंग्रजी कादंबरीकार; या लेखकाला डोंगर प्रचंड भासतात आणि त्यानी शब्दांकित केलेले पुरुषही तसेच प्रचंड आहेत. जेन ऑस्टिन, ही जगप्रसिद्ध दुसरी महान कादंबरीकार. जेन ऑस्टिन चहाच्या कपावर चितारलेल्या गुलाबांची संख्या मोजून त्याची बरोबरी, आपल्या कादंबरीतल्या पात्रांनी केलेली नर्मविनोदी चमकदार संभाषणे कशी करतील हे पाहाते. स्कॉट आणि जेन ऑस्टिन यांनी एकाच कालखंडात जीवन व्यतीत केले व लेखनही केले. त्यांनी ज्या जगाचा अनुभव घेतला तेही वस्तुत: अजिबात वेगळे नव्हते. वाङ्मयीन इतिहासाच्या पुस्तकातून या दोघांचा उल्लेख होतो, तोही एकाच कालखंडाचा. हे सारे जरी सत्य असले, तरी ते आपल्या अवतीभोवतीच्या जगाकडे, ज्या दृष्टिकोनातून व ज्या आवाक्याने पाहातात, त्यात वेगळेपणा निश्चितच होता. एकदा हा मुद्दा आपण पक्केपणी समजावून घेतला, म्हणजे मग आपल्यापुरती तरी ही लढाई निकालात निघून आपण विजयी होऊ. आपणास प्राप्त झालेल्या नव्या दृष्टिकोनाच्या आधाराने समीक्षक व चरित्रकार यांनी आपल्याला फार मोठ्या उदारतेनें पुरवठा केलेल्या अनेक आनंददायी गोष्टींचा आस्वाद घेण्याकडे आपणास वळता येते.

परंतु नेमक्या याच ठिकाणी दुसऱ्या काही अडचणी उत्पन्न होतात. याचे कारण आपलाही

तेरा वेळा श्रीमंत आणि दरिद्री माझ्यासारखे भाग्य कोणाला लाभले नसेल.

रॉबिनसन क्रुसो यांची थोरवी नेमकी कशात आहे, या संबंधात अनेकांनी लिहून ठेवले आहे. त्याबद्दल प्रख्यात फ्रेंच लेखक मिशेल तुर्निए यांना काय म्हणावयाचे, ते त्यांनी आपल्या आत्मचरित्रपर लेखात सांगितले आहे. ते या लेखाच्या तिसऱ्या भागात दिलेले आहे. व्हर्जिनिया वुल्फ यांनी या बाबतींत दोन प्रकारे चर्चा करता येईल असे म्हटले आहे. "मध्यमवर्ग अस्तित्वात आला. त्याला लिहिता वाचता येत होते. वाचनाबद्दल उत्सुकता होती. केवळ राजपुत्र व राजकन्या यांच्यासंबंधीच्या कथा वाचण्यापुरतीच ती मर्यादित नव्हती. त्यांच्या स्वत:च्या दैनंदिन व कंटाळवाण्या जीवनाचे तपशील, आणि खुद्द त्यांचे स्वत:चे जीवन या दोन्ही गोष्टीबद्दल वाचण्याचीही त्यांना जबर इच्छा होती. या मागणीचा पुरवठा वाङमयाने केला. त्यासाठी हजारो लेखण्या कार्यरत होत्या. साहित्याने फक्त काव्य करण्याऐवजी जीवनातील वस्तुस्थिती व प्राप्त परिस्थिती यांचा आविष्कार करण्यासाठी स्वत:ला सिद्ध केले होते. थोडक्यात कादंबरीचा विकास कसा होत गेला या दृष्टिकोनातून रॉबिनसन क्रुसो या कादंबरीचा जरूर विचार करता येतो. या विचाराबरोबर दुसराही एक दृष्टिकोन पुढे येतो. लेखकाची संहिता महत्त्वाची, मग लेखक व त्याचे जीवन हे महत्त्वाचे का नाही ? रॉबिनसन क्रुसो वाचावयास जेवढा वेळ लागणार नाही त्यापेक्षा कितीतरी अधिक वेळ या कादंबरीच्या लेखकांचे जे जीवन होते त्याचे तपशील जमा करण्यात जाईल. या लेखकाचे जन्मसाल कोणते, तो आपले नाव कसे लिहीत होता, DEFUE (डिफो) असे लिही, की DEFOE (ड-फो) असे लिही? त्याचे पूर्वज कोण होते ? तो पायमोजे, गंजिफ्राक इत्यादी होजयरी माल विकण्याचा धंदा आपल्या आयुष्याच्या पहिल्या काही वर्षात करीत होता असे सांगितले जाते. ते खरे असेलही. पण सतराव्या शतकात 'होजयरी'चा धंदा, याचा अर्थ नेमका काय होता? डिफो यांनी केलेल्या इतर उद्योगांचा उल्लेख या पूर्वी येऊन गेलाच आहे. इंग्लिश वाङमयाशी ज्या कोणाचा जुजबी परिचय आहे, त्याच्या एक गोष्ट लक्षात आली असेल. एखाद्या कादंबरीचा विकास कसा झाला. कादंबरीकाराचे चिंतन व चरित्र या सर्वांचा तपास घेण्यासाठी अनेक तास व अनेक जीवने खर्ची पडली आहेत. हे सारे खरे असेल तरी महत्त्वाचा मुद्दा शिल्लक राहातोच. ही सारी माहिती आपण अगदी बारीक-सारीक तपशीलात जाऊन वाचली, तर मग त्या वाचनाने फक्त रॉबिनसन क्रुसो या कादंबरीच्या वाचनाने आपल्याला जो आनंद होतो, त्यात अगदी अल्प अशी भर पडते का ?

एवंच सरेतशेवटी वाचक आणि लेखक या दोघांच्यातला हा व्यवहार आहे. साहित्यकृतीचे वाचन झाल्यानंतरच पुढची चर्चा होणार. म्हणूनच डिफो यांनी मोजे विकण्याचा धंदा केला, त्यांचे केस पिंगट होते, आणि त्याला खोड्यात अडविण्यात आले होते, हे सारे ज्ञान अप्रस्तुत व व्यर्थ अशी चिंता आहे. व्हर्जिनिया वुल्फ यांच्या मते ही बहुरत्ना वसुंधरा कोठचे अलंकार घालते, इत्यादी गोष्टी साहित्यसमीक्षक आपल्यावर लादतात व लेखकाने केलेल्या साहसाकडे चरित्रकार आपले लक्ष वेधतात, ही सारी माहिती निरुपयोगी व गैरलागू आहे. लेखकाचा जो



अनुक्रमणिका

दृष्टिकोन व आवाका आहे,त्यावर आपण प्रभुत्व मिळविले पाहिजे.हेच काम मोठे कठीण असते. कादंबरीकाराच्या खांद्यावर आपण एकाट्याने उभे राहायचे. आणि त्याच्या दृष्टिकोनातून आसमंताचे निरीक्षण करायचे.माणूस आणि माणसे, त्या मागे असलेला निसर्ग आणि त्याहीपेक्षा वरच्या स्थानावर असलेली महासत्ता– या महासत्तेस आपण सोईसाठी ईश्वर म्हणून संबोधू या, या सर्वच गोष्टी समान व मोठ्या आहेत.या महान गोष्टीवर लक्ष केंद्रित करणे क्रमप्राप्तच आहे. लेखकाने या वस्तूंचा क्रम कोठच्या पद्धतीने लावला आहे, हे वाचकाला समजेपर्यंत त्याने हे काम करावयास हवे. परंतु वाचकाला आपण हे काम पुरे केले आहे असे वाटले की, मगच त्याच्यापुढील अडचणींना आरंभ होतो. सर्वच परिस्थिती गोंधळाची आहे असे वाटते. अनेक बाबतीतले आडाखे चुकतात. हे त्या अडचणींचे स्वरूप आहे. आपण केलेली माणूस–माणसे ही यादी ही तशी सरळ, सोपी व त्याविषयी कसलाही वाद उत्पन्न होणार नाही, अशी यादी आहे हे आपल्या लक्षात येऊ लागते. परंतु कादंबरीकार, या गोष्टींचा एकमेकांशी अशा तऱ्हेने संबंध प्रस्थापित करतो की, वाचकास तो बिन–ओळखींचा वाटतो. काही वेळा तर या गोष्टी राक्षसी स्वरूप धारण करतात. गुण्यागोविंदाने राहाणारी, एकाच प्रकारे श्वासोच्छवास करणारी माणसे,अनेक बाबतीत वेगळ्याच प्रकारे विचार करताना आढळतात.प्रमाणबद्धता कशात आहे, यासंबंधी त्यांच्या मनात प्रचंड तफावत असते. एखाद्या व्यक्तीला माणूस हा प्रचंड वाटेल, या उलट झाड फारच छोटे वाटेल. दुसऱ्या कोणास, झाडे प्रचंड महाकाय आहेत,माणूस त्यांच्यामागे कोठेतरी उभा असलेला खिजगणतीतही घेऊ नये, असा प्राणी वाटेल. आपणास पाठ्यपुस्तके काहीही सांगोत, पण अनेक लेखक एकाच वेळी, एकाच कालखंडात लेखन करीत असतात. परंतु त्या अनेक लेखकातील प्रत्येकाला, जे काही दिसेल, त्याचा आकार वेगवेगळा असतो. उदा. स्कॉट हा प्रख्यात इंग्रजी कादंबरीकार; या लेखकाला डोंगर प्रचंड भासतात आणि त्यानी शब्दांकित केलेले पुरुषही तसेच प्रचंड आहेत. जेन ऑस्टिन,ही जगप्रसिद्ध दुसरी महान कादंबरीकार.जेन ऑस्टिन चहाच्या कपावर चितारलेल्या गुलाबांची संख्या मोजून त्याची बरोबरी, आपल्या कादंबरीतल्या पात्रांनी केलेली नर्मविनोदी चमकदार संभाषणे कशी करतील हे पाहाते. स्कॉट आणि जेन ऑस्टिन यांनी एकाच कालखंडात जीवन व्यतीत केले व लेखनही केले. त्यांनी ज्या जगाचा अनुभव घेतला तेही वस्तुतः अजिबात वेगळे नव्हते. वाङ्मयीन इतिहासाच्या पुस्तकातून या दोघांचा उल्लेख होतो, तोही एकाच कालखंडाचा. हे सारे जरी सत्य असले, तरी ते आपल्या अवतीभोवतीच्या जगाकडे, ज्या दृष्टिकोनातून व ज्या आवाक्याने पाहातात, त्यात वेगळेपणा निश्चितच होता. एकदा हा मुद्दा आपण पक्केपणी समजावून घेतला, म्हणजे मग आपल्यापुरती तरी ही लढाई निकालात निघून आपण विजयी होऊ.आपणास प्राप्त झालेल्या नव्या दृष्टिकोनाच्या आधाराने समीक्षक व चरित्रकार यांनी आपल्याला फार मोठ्या उदारतेनें पुरवठा केलेल्या अनेक आनंददायी गोष्टींचा आस्वाद घेण्याकडे आपणास वळता येते.

परंतु नेमक्या याच ठिकाणी दुसऱ्या काही अडचणी उत्पन्न होतात. याचे कारण आपलाही

या जगासंबंधी एक विशिष्ट दृष्टिकोन असतो. आपला अनुभव आणि आपले पूर्वग्रह या दृष्टिकोनातून तयार झालेले असतात. म्हणूनच त्यांची सांगड, आपल्या स्वत:च्या अस्मितेशी आणि आपल्याला प्रिय असलेल्या गोष्टींशी असते. एखाद्या लेखकाने सांगितलेली गोष्ट, निर्माण केलेली व्यक्ती व तिचे रेखाटन म्हणूनच सर्वांनाच मान्य होत नाही. काही लोकांना ते आवडते, अनेकांना ते नापसंत असते. एका टोकाला जाऊन अनेकजण त्याचा धिक्कारही करतात. थोडक्यात, भिन्न भिन्न प्रकृतीचे वाचक कादंबरीचा जो दृष्टिकोन आहे, त्यावर आपले नियंत्रण ठेऊ इच्छितात. तो दृष्टिकोन, आपल्या स्वत:च्या दृष्टिकोनाशी कसा मिळता- जुळता होईल व आपल्या दृष्टिकोनाला अधिक बळकटी कशी प्राप्त होईल यासाठी या भिन्न भिन्न प्रकृतीच्या वाचकांची खटपट असते. परंतु प्रुस्टसारखे महान लेखक, आपल्या मार्गानेच चालत राहातात. ते वाचकांच्या आरडाओरडीकडे लक्ष देत नाहीत. प्रत्येक वाचकाचा खाजगी असा जो दृष्टिकोन असतो, त्यालाही काही अधिकार आहे, त्याचा विचार झाला पाहिजे, हे या महान लेखकांच्या खिजगणतीतही नसते. महान लेखक निढळाचा घाम गाळून, गोंधळात व्यवस्था निर्माण करतात. या व्यवस्थेत तो एखादे झाड, या ठिकाणी लावील, आणखी एखाद्या ठिकाणी ते ठेवील. लेखकाच्या मनातील 'ईश्वर,' हा लेखकाच्या इच्छेनुसार फार दूरच्या अंतरावर असेल किंवा नजिकही असेल. महान साहित्यकृतींचा दृष्टिकोन तसा स्पष्ट असतो, आणि त्यांना (लेखकाला आणि साहित्यकृतींना) गोंधळात व्यवस्था प्रस्थापित करण्यात यशही आलेले असते. परंतु महान लेखक ही कामगिरी करताना वाचकाच्या मनावर, आपला स्वत:चा दृष्टिकोन लादतोच. असे झाले म्हणजे मग वाचकांना अनेक वेळा वेदना होतात. वाचकाच्या मनात, त्याने आपली स्वत:ची म्हणून जी व्यवस्था प्रस्थापित केलेली असते ती उध्वस्त झाल्याकारणाने, त्याची अस्मिता दुखावली जाते. आधारभूत वाटणाऱ्या गोष्टी वाचकाकडून हिसकावून घेतल्या असल्याकारणाने, आपण भयभीत होतो. दुसरीकडे आपणास कंटाळा येतो. आपण 'बोअर' होतो, कारण एखाद्या सर्वस्वी नव्या कल्पनेकरवी कोणास आनंद मिळविणे अथवा मनोरंजन प्राप्त करून घेणे शक्य आहे का? तथापि राग, भीती, कंटाळा या अवस्थातून काहीवेळा, अत्यंत दुर्मिळ आणि चिरकाल टिकणाऱ्या आनंदाचीही निर्मिती होते. येथवर जो दृष्टिकोन मांडलेला आहे त्याचे उत्तम उदाहरण रॉबिनसन क्रूसो ही कादंबरी आहे. ही एक महान कादंबरी आहे, याचे एक कारण, डॅनिएल डिफो यांनी या कादंबरीत आपल्या स्वत:चा असा जो दृष्टिकोन आहे, त्याच्याशी सातत्याने इमान राखले आहे. याच कारणामुळें डिफो हे प्रत्येक वळणावर, आम्हा वाचकांची एकतर गळचेपी करतात, अथवा आम्हाला धुडकावून लावताना दिसतात. या कादंबरीचे जे संविधान आहे, त्याकडे आपण स्थूलमानाने दृष्टिक्षेप टाकू या आणि त्याची तुलना, आपल्या स्वत:च्या अगोदरच तयार असलेल्या दृष्टिकोनाशी करूया. अनेक संकटातून आणि साहसातून गेल्यानंतर एका निर्मनुष्य बेटावर फेकून देण्यात आलेल्या माणसाच्या एकाकीपणाच्या अनुभवाची ही कथा आहे. या अशा प्रकारच्या संविधानामुळे आपल्या मनात काही अपेक्षा निर्माण

होतात. जगाच्या टोकाला असलेल्या एका दूरवरच्या बेटासंबंधी आपणास काही चुरचुरीत व खमंग वाचावयास मिळेल अशी अपेक्षा आपण साहाजिकपणे करतो. त्या बेटावरचा सूर्योदय, सूर्यास्त, अगदी एकाकी पडलेला मनुष्य, स्वत:शीच समाजाची प्रकृती आणि वेगवेगळ्या प्रकारचे जीवन व्यतीत करणाऱ्या असंख्य व्यक्ती या संबंधी कसा विचार करतो, या सर्व विषयांसंबंधी आपणास काहीतरी वाचावयास मिळेल अशीही अपेक्षा असते. हे पुस्तक वाचावयास उघडण्यापूर्वीच, या पुस्तकाच्या वाचनाने, आपणास कोणत्या प्रकारचा आनंद मिळेल, याचे धूसर असे चित्रही कदाचित आपल्या मनात रेखाटलेले असते. आपण वाचावयास सुरुवात करतो, आणि प्रत्येक पानागणिक आपला अपेक्षाभंग होतो. आपण जे काही अपेक्षिलेले असते, त्याच्या अगदी विरुद्ध टोकाचा मजकूर आपण वाचतो. सूर्योदय, सूर्यास्त, एकाकीपणाची शांतता, एकांतात मनन करणारे आत्मे, यातले या ठिकाणी काहीही नसते. याउलट तेथे, एका भल्या मोठ्या मातीच्या घड्याव्यतिरिक्त, आपल्या नजरेला नजर देऊन, आपल्या चेहऱ्याकडे टक लावून पाहाणारे अन्य काहीही नसते. आपणास असे सांगण्यात येते की, "त्याचे असे आहे की ती तारीख १(एक) सप्टेंबर १६५१ होती. आपल्या कादंबरीच्या नायकाचे नाव आहे रॉबिनसन क्रूसो, आणि त्याच्या बापाला गाउट हा रोग झाला होता." या निवेदनाचा अर्थ स्पष्ट आहे. आपण आपल्या दृष्टिकोनात बदल करणे आवश्यक आहे. थोडक्यात यानंतर या कादंबरीत जे येणार आहे, त्यावर वस्तुस्थिती, घटना, प्रत्यक्ष वास्तव यांचाच प्रभाव जास्त करून राहाणार आहे. अगदी घाईघाईनें आपल्या स्वत:च्या दृष्टिकोनात बदल करणे आपणास भागच असते. नव्हे, हा बदल ही कादंबरी वाचून हातावेगळी करीपर्यंत, आपणास कायम टिकवून धरणे आवश्यक असते. निसर्गानें आपल्या विविध रंगांची मनोहारी आणि उदार अशी पखरण सर्वत्र करावयाचीच. निसर्ग हाच अवर्षण आणि उत्तम ठरेल असा पाऊस या दोन्ही 'देणग्या' देणारा एकमेव घटक आहे. आपले स्वत:चे जीवन कसेबसे टिकवून धरण्यासाठी सातत्याने संघर्ष करणारा प्राणी, या पातळीवरचा प्राणी म्हणजे मनुष्य; या इतक्या खालच्या पातळीवर मानवाला आणून सोडणे भागच असते. ईश्वर या संकल्पनेचाही संकोच होतो. सर्वसाक्षी, पुण्यवंतांच्या मदतीला धावून जाणारा, दलितांना संरक्षण देणारा इत्यादी, इत्यादी. ही जी मुळातली आपली ईश्वरविषयक संकल्पना त्यात फरक करावाच लागतो. आता ईश्वर आपली उपकारकर्त्याची जागा सोडून, न्यायाधीशाच्या जागी आलेला आहे.

या न्यायाधीशाचे आसन, चांगलेच न हलेल असे भरभक्कम आहे, परंतु या न्यायाधीशाला अनेक कठोर ठरतील असे निर्णय घ्यावे लागतील, हेही त्या बदललेल्या संकल्पनेत अनुस्यूत आहे. हे अशा प्रकारचे न्यायाधीशाचे आसन, हे नुकतेच कोठे उदयास येत होते. कोणत्याही मानवी दृष्टिकोनात, तीन अत्यंत महत्त्वाचे केंद्रबिंदू–ईश्वर, मानव, निसर्ग–या तीन केंद्रबिंदूसंबंधी माहिती मिळविण्यासाठी / एखादी व्यक्ती, जे जे काही हल्ले करते, त्यातील प्रत्येक हल्ला कसलीही दयामाया न दाखविणाऱ्या व्यावहारिक चातुर्याच्या मदतीनें साफ निपटून काढून



अनुक्रमणिका

परतविण्यात येतो. रॉबिनसन क्रूसो 'ईश्वरासंबंधी' विचार करतो. तो सांगतो, की मी स्वत:हूनच मैत्रीचा हात पुढे करतो व म्हणतो, नशिबाने, या अशा तऱ्हेने, वस्तूंचा व प्राण्यांचा नाश का बरे करावा? ..... परंतु या अशा विचारांना बांध घालण्यासाठी काहीतरी नेहमीच परतून माझी लगेच पकड घेते. ईश्वर अस्तित्वात नाही. तो निसर्गाचा विचार करतो. 'फुले व गवत यांनी बहरलेली शेते, अत्यंत सुंदर अशा वनराजीनें आणि घनदाट अरण्यानी भरभरारलेली पृथ्वी.' परंतु या अरण्यांचा एक महत्त्वाचा असा विशेष आहे. या अरण्यातून असंख्य पोपट वस्ती करून असतात, त्यांना माणसाळवता येते व बोलावयासही शिकवता येते. हे सारे जरी असले तरी त्याच्या मते निसर्ग अस्तित्वात नाही. रॉबिनसन क्रूसो, ज्यांना त्याने स्वत:च ठार केलेले असते, त्या मृतांबद्दल विचार करतो. या मृतदेहांना ताबडतोब पुरून टाकणे, हे अतिशय महत्त्वाचे असते. कारण 'त्यांना तसेच उघड्यावर सूर्यप्रकाशात राहू दिले तर ते लगेचच निसर्गधर्मानुसार त्रासदायक ठरतील.' मृत्यूलाही अस्तित्व नाही. कादंबरीतल्या पात्रांनाही नाही. एक त्या मातीच्या घड्याशिवाय कशालाच अस्तित्व नाही. म्हणायचेच झाले तर सरतेशेवटी आम्हा वाचकांना आपला दृष्टिकोन सोडून द्यावा लागतो; आणि डिफो यांची आम्हाला जे काही देण्याची इच्छा आहे ते स्वीकारावे लागते.

रॉबिनसन क्रूसो या कादंबरीच्या सुरुवातीकडे आपण परत एकदा वळूया आणि 'यॉर्क या शहरात १६३२ साली एका चांगल्या कुटुंबात माझा जन्म झाला' या वाक्याचा पुनरुच्चार करूया. या वाक्याइतके साधेसुधे, वस्तुस्थितीला अधिक धरून असणारे दुसरे वाक्य नाही. या वाक्याने या कादंबरीची सुरुवात होते. परिश्रम आणि सुव्यवस्था यांनी भरलेले मध्यमवर्गीय जीवन व त्या जीवनापासून प्राप्त होणारे वरदान याचाच विचार करण्याकडे आपण अगदी मोकळ्या मनाने खेचले जातो. आपणास असे आश्वासन दिले जाते की, ब्रिटिश मध्यमवर्गीय कुटुंबात जन्म घेण्याइतकी दुसरी कोठचीही अधिक चांगल्या भाग्याची गोष्ट नाही. श्रीमंताची तशीच गरिबांची कीवच करावयास हवी. कारण हे दोन्हीही वर्ग अस्वस्थता आणि विचलता या दोन्ही भावनिक अवस्थांना बळी पडतात. तळागाळातले आणि श्रीमंत या दोन्ही वर्गांच्या मध्यावरती जो मध्यमवर्ग आहे तो सर्वात उत्तम. संथपणा, नेमस्तपणा, शांतपणा, आणि आरोग्याचे वरदान, हे सर्वच गुण अत्यंत हवेहवेसे वाटणारे गुण आहेत. म्हणूनच नशिबाच्या दुष्ट फेऱ्यात सापडून एक मध्यमवर्गीय तरुण ते साहस करतो, त्या मूर्ख अशा साहसप्रेमाने झपाटला जातो, ही एक दुर्दैवी घटना होती. अशा तऱ्हेने हा कादंबरीकार लिहीत जातो. हळूहळू त्या तरुणाचे शब्दचित्र रेखाटले जाते..... त्या कारणानेच त्याचा विसर कधीही पडत नाही. उलट, आपल्या मनात कधीही पुसला जाणार नाही, असा ठसा तिथे उमटलेला असतो. रॉबिनसन क्रूसो याच्या शब्दचित्राचा व त्याच्या प्रतिभेचा ही कादंबरी वाचीत असताना कधीही विसर पडत नाही. त्याचे चातुर्य, त्याची सावधगिरी, सुव्यवस्था, आराम आणि प्रतिष्ठा या सर्वांबद्दल त्याला वाटत असलेले प्रेम, याबद्दल आपण वाचतो. जोवर काहीही कारणाने व कोणत्याही साधनांनी,

समुद्रपर्यटनास जात नाही, वादळात सापडत नाही, काळोख्या रात्री, धूसर प्रकाशात पाहात नाही, तोवर हे जग रॉबिनसन क्रूसोला जसे दिसते, अगदी तसेच ते आपणासही दिसते.

लाटा, खलाशी, आकाश, जहाज या साऱ्या गोष्टी, त्या कसलेही कल्पनाचातुर्य नसलेल्या पण धूर्त अशा मध्यमवर्गीय डोळ्यांना दिसत, तशाच त्या आपणासही दिसतात. स्वाभाविकपणेच सावध, परंपरावादी, धूर्त, आणि अत्यंत व्यवहारी अशा बुद्धीला जे दिसते, तसेच सर्व काही आपणासही दिसते. त्या दृष्टीला उत्साहाचा, स्पर्श होणेच शक्य नाही. निसर्ग हा सर्वसामान्य व्यवहारापेक्षा अधिक आगळावेगळा आहे, याबद्दल रॉबिनसन क्रूसोला काही प्रमाणात तिरस्कारच आहे. नियती, अतिशयोक्ती करते, असा त्याला संशय आहे. तो इतका कामात गढलेला असतो, तसेच आपणास नशीब केव्हा हात देईल यावर इतकी नजर ठेवून असतो की त्याला त्याच्या अवतीभोवती जे काही घडत असते त्यातल्या फक्त एक दशांशाचीच तो दखल घेतो. प्रत्येक घटनेमागे, गोष्टीमागे कार्यकारणभाव आहे, याबद्दल त्याची खात्री आहे. अर्थात तो समजावून घेण्यासाठी पुरेसा वेळ असला तरच ते शक्य आहे. रात्रीच्या वेळी जे प्रचंड असे असंख्य प्राणी बाहेर पडतात व ते त्याच्या होडीभोवती तरंगत असतात, घुटमळत असतात, त्याची भीती आपणाला वाटते. त्याला तशी भीती वाटत नाही. वाटलीच तर त्याचे प्रमाण आपणाला वाटते त्यापेक्षा कितीतरी कमी असते. त्या प्रचंड प्राण्यांना पाहिल्याबरोबर त्याने त्या प्राण्यावर गोळी झाडली, तो प्राणी सिंह होता वा अन्य कोणता प्राणी होता हे त्या गोळी झाडणाऱ्याला खरोखरच माहीत नसते. एवंच ते आपणास माहीत होण्याअगोदरच आश्चर्याने आपलें तोंड जास्त जास्तच फाकत जाते. बढाईखोर आणि दाखवेगिरी करणाऱ्या एखाद्या प्रवाशाने, आपणास राक्षसी असे प्राणी देऊ केले असता आपण त्याना टाळण्याकरता बाजूला सरकलो असतो. पण या दुष्ट रॉबिनसन क्रूसोने देऊ केलेला राक्षसी प्राणी आपण 'गिळंकृत' करतो. थोडक्यात हा ठणठणीत तब्बेतीचा मध्यमवर्गीय, ज्याची ज्याची दखल घेतो, ती प्रत्यक्ष वस्तुस्थितीच आहे, असे डोळे झाकूनही आपण मानावयास तयार असतो. क्रूसो, सदैव पिण्याच्या पाण्याच्या पिंपाची मोजदाद करतो, आणि त्यायोगे आपल्याला भरपूर पाणीपुरवठा होईल याबद्दल व्यवहारी तरतूद करत असतो. तसेच एखाद्या तपशीलाचीही चूक करताना आपणास तो आढळत नाही. आपणास कुतूहल असते की फळीवरच्या मेणाच्या गोळ्याचा त्याला विसर पडला आहे का? अजिबात नाही. त्याने त्या गोळ्यापासून मेणबत्या केव्हाच बनविलेल्या असतात. परंतु तेविसाव्या पानावर या घटनेला जेवढे महत्त्व होते, तेवढे महत्त्व अडतिसाव्या पानावर खासच नाही. म्हणून आम्हा वाचकास आश्चर्यचकित करण्यासाठी एखादी गोष्ट वा घटना तशीच हातची राखून ठेवलेली असते. उदा; रानटी मांजरे, जर इतक्या मोठ्या प्रमाणात माणसाळलेली आहेत, तर मग शेळ्या इतक्या बुजऱ्या का असतात? पण आपणास या राहून गेलेल्या गोष्टीबद्दल तेवढी चिंता वाटत नाही. याचे कारण आपणास अशी खात्री आहे, की त्यामागे काही कारण आहे; आणि ते चांगलेच संयुक्तिक असणार. लेखकाला

परतविण्यात येतो. रॉबिनसन क्रूसो 'ईश्वरासंबंधी' विचार करतो. तो सांगतो, की मी स्वत:हूनच मैत्रीचा हात पुढे करतो व म्हणतो, नशिबाने, या अशा तऱ्हेने, वस्तूंचा व प्राण्यांचा नाश का बरे करावा? .....परंतु या अशा विचारांना बांध घालण्यासाठी काहीतरी नेहमीच परतून माझी लगेच पकड घेते. ईश्वर अस्तित्वात नाही. तो निसर्गाचा विचार करतो. 'फुले व गवत यांनी बहरलेली शेते, अत्यंत सुंदर अशा वनराजीनें आणि घनदाट अरण्यानी भरभरारलेली पृथ्वी.' परंतु या अरण्यांचा एक महत्त्वाचा असा विशेष आहे. या अरण्यातून असंख्य पोपट वस्ती करून असतात, त्यांना माणसाळवता येते व बोलावयासही शिकवता येते. हे सारे जरी असले तरी त्याच्या मते निसर्ग अस्तित्वात नाही. रॉबिनसन क्रूसो, ज्यांना त्याने स्वत:च ठार केलेले असते, त्या मृतांबद्दल विचार करतो. या मृतदेहांना ताबडतोब पुरून टाकणे, हे अतिशय महत्त्वाचे असते. कारण 'त्यांना तसेच उघड्यावर सूर्यप्रकाशात राहू दिले तर ते लगेचच निसर्गधर्मानुसार त्रासदायक ठरतील.' मृत्यूलाही अस्तित्व नाही. कादंबरीतल्या पात्रांनाही नाही. एक त्या मातीच्या घड्याशिवाय कशालाच अस्तित्व नाही. म्हणायचेच झाले तर सरतेशेवटी आम्हा वाचकांना आपला दृष्टिकोन सोडून द्यावा लागतो; आणि डिफो यांची आम्हाला जे काही देण्याची इच्छा आहे ते स्वीकारावे लागते.

रॉबिनसन क्रूसो या कादंबरीच्या सुरुवातीकडे आपण परत एकदा वळूया आणि 'यॉर्क या शहरात १६३२ साली एका चांगल्या कुटुंबात माझा जन्म झाला' या वाक्याचा पुनरुच्चार करूया. या वाक्याइतके साधेसुधे, वस्तुस्थितीला अधिक धरून असणारे दुसरे वाक्य नाही. या वाक्याने या कादंबरीची सुरुवात होते. परिश्रम आणि सुव्यवस्था यांनी भरलेले मध्यमवर्गीय जीवन व त्या जीवनापासून प्राप्त होणारे वरदान याचाच विचार करण्याकडे आपण अगदी मोकळ्या मनाने खेचले जातो. आपणास असे आश्वासन दिले जाते की, ब्रिटिश मध्यमवर्गीय कुटुंबात जन्म घेण्याइतकी दुसरी कोठचीही अधिक चांगल्या भाग्याची गोष्ट नाही. श्रीमंताची तशीच गरिबांची कीवच करावयास हवी. कारण हे दोन्हीही वर्ग अस्वस्थता आणि विचलता या दोन्ही भावनिक अवस्थांना बळी पडतात. तळागाळातले आणि श्रीमंत या दोन्ही वर्गांच्या मध्यावरती जो मध्यमवर्ग आहे तो सर्वात उत्तम. संथपणा, नेमस्तपणा, शांतपणा, आणि आरोग्याचे वरदान, हे सर्वच गुण अत्यंत हवेहवेसे वाटणारे गुण आहेत. म्हणूनच नशिबाच्या दुष्ट फेऱ्यात सापडून एक मध्यमवर्गीय तरुण ते साहस करतो, त्या मूर्ख अशा साहसप्रेमाने झपाटला जातो, ही एक दुर्दैवी घटना होती. अशा तऱ्हेने हा कादंबरीकार लिहीत जातो. हळूहळू त्या तरुणाचे शब्दचित्र रेखाटले जाते..... त्या कारणानेच त्याचा विसर कधीही पडत नाही. उलट, आपल्या मनात कधीही पुसला जाणार नाही, असा ठसा तिथे उमटलेला असतो. रॉबिनसन क्रूसो याच्या शब्दचित्राचा व त्याच्या प्रतिभेचा ही कादंबरी वाचीत असताना कधीही विसर पडत नाही. त्याचे चातुर्य, त्याची सावधगिरी, सुव्यवस्था, आराम आणि प्रतिष्ठा या सर्वांबद्दल त्याला वाटत असलेले प्रेम, याबद्दल आपण वाचतो. जोवर काहीही कारणाने व कोणत्याही साधनांनी,



अनुक्रमणिका

समुद्रपर्यटनास जात नाही, वादळात सापडत नाही, काळोख्या रात्री, धूसर प्रकाशात पाहात नाही, तोवर हे जग रॉबिनसन क्रूसोला जसे दिसते, अगदी तसेच ते आपणासही दिसते.

लाटा, खलाशी, आकाश, जहाज या साऱ्या गोष्टी, त्या कसलेही कल्पनाचातुर्य नसलेल्या पण धूर्त अशा मध्यमवर्गीय डोळ्यांना दिसत, तशाच त्या आपणासही दिसतात. स्वाभाविकपणेच सावध, परंपरावादी, धूर्त, आणि अत्यंत व्यवहारी अशा बुद्धीला जे दिसते, तसेच सर्व काही आपणासही दिसते. त्या दृष्टीला उत्साहाचा, स्पर्श होणेच शक्य नाही. निसर्ग हा सर्वसामान्य व्यवहारापेक्षा अधिक आगळावेगळा आहे, याबद्दल रॉबिनसन क्रूसोला काही प्रमाणात तिरस्कारच आहे. नियती, अतिशयोक्ती करते, असा त्याला संशय आहे. तो इतका कामात गढलेला असतो, तसेच आपणास नशीब केव्हा हात देईल यावर इतकी नजर ठेवून असतो की त्याला त्याच्या अवतीभोवती जे काही घडत असते त्यातल्या फक्त एक दशांशाचीच तो दखल घेतो. प्रत्येक घटनेमागे, गोष्टीमागे कार्यकारणभाव आहे, याबद्दल त्याची खात्री आहे. अर्थात तो समजावून घेण्यासाठी पुरेसा वेळ असला तरच ते शक्य आहे. रात्रीच्या वेळी जे प्रचंड असे असंख्य प्राणी बाहेर पडतात व ते त्याच्या होडीभोवती तरंगत असतात, घुटमळत असतात, त्याची भीती आपणाला वाटते. त्याला तशी भीती वाटत नाही. वाटलीच तर त्याचे प्रमाण आपणाला वाटते त्यापेक्षा कितीतरी कमी असते. त्या प्रचंड प्राण्यांना पाहिल्याबरोबर त्याने त्या प्राण्यावर गोळी झाडली, तो प्राणी सिंह होता वा अन्य कोणता प्राणी होता हे त्या गोळी झाडणाऱ्याला खरोखरच माहीत नसते. एवंच ते आपणास माहीत होण्याअगोदरच आश्चर्याने आपलें तोंड जास्त जास्तच फाकत जाते. बढाईखोर आणि दाखवेगिरी करणाऱ्या एखाद्या प्रवाशाने, आपणास राक्षसी असे प्राणी देऊ केले असता आपण त्याना टाळण्याकरता बाजूला सरकलो असतो. पण या दुष्ट रॉबिनसन क्रूसोने देऊ केलेला राक्षसी प्राणी आपण 'गिळंकृत' करतो. थोडक्यात हा ठणठणीत तब्बेतीचा मध्यमवर्गीय, ज्याची ज्याची दखल घेतो, ती प्रत्यक्ष वस्तुस्थितीच आहे, असे डोळे झाकूनही आपण मानावयास तयार असतो. क्रूसो, सदैव पिण्याच्या पाण्याच्या पिंपाची मोजदाद करतो, आणि त्यायोगे आपल्याला भरपूर पाणीपुरवठा होईल याबद्दल व्यवहारी तरतूद करत असतो. तसेच एखाद्या तपशीलाचीही चूक करताना आपणास तो आढळत नाही. आपणास कुतूहल असते की फळीवरच्या मेणाच्या गोळ्याचा त्याला विसर पडला आहे का? अजिबात नाही. त्याने त्या गोळ्यापासून मेणबत्त्या केव्हाच बनविलेल्या असतात. परंतु तेविसाव्या पानावर या घटनेला जेवढे महत्त्व होते, तेवढे महत्त्व अडतिसाव्या पानावर खासच नाही. म्हणून आम्हा वाचकास आश्चर्यचकित करण्यासाठी एखादी गोष्ट वा घटना तशीच हातची राखून ठेवलेली असते. उदा; रानटी मांजरे, जर इतक्या मोठ्या प्रमाणात माणसाळलेली आहेत, तर मग शेळ्या इतक्या बुजऱ्या का असतात? पण आपणास या राहून गेलेल्या गोष्टीबद्दल तेवढी चिंता वाटत नाही. याचे कारण आपणास अशी खात्री आहे, की त्यामागे काही कारण आहे; आणि ते चांगलेच संयुक्तिक असणार. लेखकाला

सवड असती, तर त्याने आपणास सांगितलेच असते. परंतु एखाद्या निर्मनुष्य आणि उजाड बेटावर एखाद्या मनुष्याला केवळ स्वत:साठी, स्वत:चे अस्तित्व टिकवून धरण्यासाठी, जो संघर्ष करावा लागतो, त्यामुळे त्याच्या जीवनावर दबाव येणारच. ही खरोखरच हसण्यावारी नेण्यासारखी गोष्ट नाही. तसेच ती ज्याबद्दल शोक करावा, अशीही गोष्ट नाही. मनुष्यप्राण्याला प्रत्येक गोष्ट वा घटना, यासंबंधी काहीना काही दृष्टिकोन असणे आवश्यक आहे. आपल्या दारूगोळ्याच्या साठ्यावर आकाशात वीज चमकली व मग त्या साठ्यावर ठिणगी पडली व त्या साठ्याचा स्फोट झाला. आता ही घटना घडली ती नैसर्गिक कारणामुळे घडली; यासाठी निसर्गाबद्दल हर्षवायू होण्याचे कारण नाही. या उलट दारूगोळ्याचा साठा करण्यासाठी, अधिक सुरक्षित जागा शोधावयास हवी. यासाठी ती सूचना आहे असे समजले पाहिजे. डिफो हा कादंबरीकार त्याला सत्याची जी प्रचीती आलेली आहे त्यात रेसभरही फरक न करता, वाचकासमोर सगळा पट उघडून दाखवितो. हा मार्ग पत्करून हा महान कादंबरीकार, आपण कादंबरीकारांच्या पहिल्या रांगेत बसण्यास लायक आहोत, असे सिद्ध करतो. म्हणूनच तपशीलातला एखादा भाग बुद्धिपुरस्सर मागे ठेवून, दुसऱ्या एखाद्या भागाला प्राधान्य देऊन, या कादंबरीकाराचे जे महान उद्दिष्ट, वस्तुस्थितीचे भान, ते साध्य करायचे असते. त्या उद्दिष्टाला ते परिणामकारक ठरेल, अशा तऱ्हेने उठाव प्राप्त करून देण्याची इच्छा असते. या दोन्ही गोष्टी डिफो हा कादंबरीकार फारच चांगल्या प्रकारे साध्य करतो. सरतेशेवटी आणखी एक गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे. हा कादंबरीकार, सर्वसामान्यपणे ज्या कृती, अगदी सर्वसामान्य समजल्या जातात, त्यांना प्रतिष्ठा प्राप्त करून देतो. तसेच या सर्वसामान्य अशा वस्तूतही सौंदर्य आहे हे वाचकाला पटवून देतो. उदा. खणणे, शिकवणे, झाड लावणे, छोटीशी वास्तू उभारणे, या क्रिया तशा साध्या व सोप्या असल्या तरी त्यांची गंभीरपणे दखल घेतली जावी इतक्या महत्त्वाच्या आहेत. कुऱ्हाड, कात्री, ओंडके, फरशी ही साधीसुधी हत्यारे व अवजारे या लेखकाच्या कादंबरीत सुंदर बनतात. कोठच्याही प्रकारच्या मल्लीनाथीचा अडसर न येता, या कादंबरीतले कथानक अत्यंत विलोभनीय अशा साधेपणाने पुढे सरकतच राहाते. असेही म्हणता येईल की व्युत्पन्न अशा मल्लीनाथीने वा कोणत्याही प्रकारच्या भाष्याने हे कथानक अधिक उठावदार करता आले असते का ? या प्रश्नाचे उत्तर अगदी स्पष्टपणे नाही हेच आहे. एखाद्या मानसशास्त्रज्ञाने, जो मार्ग पत्करला असता त्याच्या अगदी विरुद्ध दिशेने व मार्गाने डिफो हा कादंबरीकार जातो. हे अगदी सत्य आहे. भावनांचा मनावर काय परिणाम होतो, याचे वर्णन न करता, हा लेखक लेखन करतो, उदा. रॉबिन्सन क्रुसोने एका शारीरिक व मानसिक दु:खाच्याप्रसंगी आपल्या हाताची मूठ इतकी घट्ट आवळली की कोणत्याही व कुठच्याही फारसे काठिण्य नसलेल्या वस्तूचा पार भुगा झाला असता. अशाच दुसऱ्या एका शारीरिक व मानसिक दु:खाच्या प्रसंगी रॉबिन्सन क्रुसो, म्हणाला, "माझ्या तोंडातले दात हे एकमेकांवर जोरजोराने आदळत व मग त्यांची अशी मिठी बसे की त्यांना एकमेकांपासून अलग करणे मला काही काळ शक्य

होत नसे." या अशा वर्णनांचा परिणाम फार जबरदस्त होतो. अनेक पात्रे करतील अशा प्रकारच्या मनोविश्लेषणात्मक वर्णनापेक्षाही ती अधिक काही सांगून जातात; व त्यांचा परिणामही अधिक खोलवर पोचणारा असतो. रॉबिनसन क्रुसोची उपजत बुद्धी या बाबतीत अचूक निर्णय घेते. त्याचे असे सांगणे होते की "जे कोणी वैज्ञानिक असतील त्यांनी या गोष्टीचे स्पष्टीकरण द्यावे. त्या घटनांमागचा कार्यकारणभाव व त्या कोठल्या पद्धतीने घडल्या इत्यादी सांगावे. मी त्या सर्वांना एवढेच सांगेन की, घटनेचे वर्णन करा." आपण जर डिफो असतो. तर एखाद्या घटनेचे वर्णन करतो हे निश्चितपणे पुरेसे आहे. घटना व वस्तुस्थिती यांचे वर्णन करण्याचे डिफो यांचे कौशल्य कल्पनातीत आहे. सर्वसामान्य लेखकाला जे जमणार नाही, ते डिफो या कौशल्याच्या मदतीने घडवून आणतात. डिफो हा जो परिणाम घडवून आणतात, तो फक्त जे महान सहित्यिक वर्णनात्मक गद्यलेखनातले अधिकारी लेखक आहेत, त्यांच्याच आवाक्यातला आहे. डिफो दोन चार शब्दात वातावरणनिर्मिती करतात. उदा. अनेकजण मृत्यू पावले, आणि सारेच उद्ध्वस्त झाल्याची भावना सर्वत्र पसरली आहे. हा परिणाम डिफो अत्यंत गद्य शब्दांचा वापर करून साधतात. रॉबिनसन क्रुसो सांगतो, "मी त्यांना पुन्हा कधीही पाहिले नाही किंवा त्यांची नाव-निशाणी, त्यांच्या अस्तित्वाची कसलीही खूण मागे राहिली नाही. याला अपवाद होता. त्यांच्या तीन हॅट्स, एक टोपी, दोन जोडे, पण ते एकाच व्यक्तीचे नसावेत."

एवंच डिफो पुन्हापुन्हा रांगड्या वस्तुस्थितीवर भर देतात. ते वारंवार असे सांगतात, 'एक मातीचा घडा हीच पार्श्वभूमी' आहे. आपल्या शब्दचातुर्याच्या जोरावर फार दूर अंतरावर असलेली बेटे मानवी हृदयाच्या एकाकीपणाचे दर्शन घडवितात व त्याचा अनुभवही देतात. त्या घड्यावर आणि तो ज्या मातीपासून घडविलेला आहे त्या मातीवर त्यांची ठाम श्रद्धा आहे. डिफो यांनी आपल्या मनात ही जी प्रतिमा उभी केली होती, त्या प्रतिमेला पूरक होईल, त्या प्रतिमेवर शिरजोरी करणार नाही अशा प्रकारे आपले संकल्पचित्र तयार केले. त्यानुसार आपल्या कथानकातील प्रत्येक घटनेची योजना केली. थोडक्यात बाहेरच्या जगातील कोलाहल त्यांच्या संकल्पचित्रात जो सुसंवाद होता त्यात बंदिस्त केला. आपण वाचक हे पुस्तक वाचून झाल्यानंतर, ते बंद करून खाली ठेवतो. त्यावेळी आपल्या मनात पुढील विचार येतच राहातात. एखाद्या मातीच्या घड्याकरवी आपणास एक विशिष्ट दृष्टिकोन प्राप्त होतो. त्या दृष्टिकोनाच्या अनुषंगाने आपण काही निष्कर्ष काढतो. एकदा हे निष्कर्ष पक्केपणी आपलेसे केल्यानंतर या दृष्टिकोनाने आपले सर्वस्वी समाधान का करू नये ? प्रचंड तुफानामुळे निर्माण झालेले लाटांचे तांडव आणि डोंगराची रांग, पण तीही सलग नाही, अशा पार्श्वभूमीवर एखादी व्यक्ती उभी आहे. ही मानवी अवस्था आपण आपलीशी केली म्हणजे मग त्या साध्यासुध्या मातीच्या घड्याने आपणास जो दृष्टिकोन दिला त्याने आपले (वाचकाचे) समाधान का होऊ नये? या प्रश्नाचे उत्तर या कादंबरीच्या इतिहासानेच दिलेले आहे. आपले समाधान होतेच. इतकेच नव्हे सर्वसामान्य वाचक आणि प्रज्ञावान लेखक या दोघांनाही आनंद होतो. म्हणूनच अनेक वर्षे वाचक ही कादंबरी



अनुक्रमणिका

विकत घेऊन वाचीत आले आहेत. आणि अनेक लेखक वेगवेगळ्या कालखंडात रॉबिनसन क्रुसो ही मिथ वापरून त्यावर आपली नवी कादंबरी बेततात.

डॅनिएल डिफो हे तुरुंगात होते याचा उल्लेख यापूर्वीच येऊन गेला आहे. ते न्यू गेट या तुरुंगात चांगले अठरा महिने होते. या तुरुंगावासाच्या काळात, चोर, चांचे, हमरस्त्यावर दरोडेखोरी करणारे, आणि खोटी नाणी पाडणारे अशा अनेक प्रकारच्या गुन्हेगारांच्या सहवासात ते होते. त्यांचे या गुन्हेगारांशी अनेक वेळा संभाषण झाले होते. या सर्वांचा जो दृष्टिकोन होता, तो डिफो यांनी चांगलाच आत्मसात केला होता. परंतु याबाबतीत डिफो यांचे जे वैशिष्ट्य आहे ते आपण नमूद केले पाहिजे. केवळ अपघाताने या गुन्हेगार मंडळींचा सहवास त्यांच्यावर लादण्यात आला होता. म्हणूनच त्यांना विशेष अनुभवांची प्राप्ती झाली हे खरे आहे. त्यांनी हे सारे आधाशीपणे ग्रहण केले हेही खरे आहे. हे अनेक माणसे करतात. परंतु या अनुभवांचा ठसा आपल्या मनातून कधीही पुसला जाणार नाही, अशा पद्धतीने तो जतन करणे, आणि त्या अनुभवांचा वापर करून उत्तम साहित्यकृती निर्माण करणे ही आगळीच गोष्ट आहे. आणखीही एक गोष्ट त्यांच्या साहित्यकृतीतून दिसून येते. डिफो या गुन्हेगार-माणसात, दारिद्र्याने जे ताण-तणाव निर्माण झाले त्याचेच वर्णन करून थांबत नाहीत. ते या माणसांचे कसलाही आसरा नसलेले जीवन, परिस्थितीच्या रेट्यापुढे वारंवार जीवनमार्ग बदलण्याची आपत्ती यांचे वर्णन त्यांच्या कल्पकतेला अधिक जवळचे वाटते. त्यांच्या कादंबऱ्यात वर्णनांचा फाफटपसारा आढळत नाही. तरलता, संकटे, दुःख इत्यादी मुद्यांवर व गोष्टींवरही ते भर देत नाहीत. परंतु या साऱ्या गोष्टी नकळतच आपल्या अवतीभोवती झाल्या आहेत, अशा प्रकारे त्यांचे कथन करण्यावर ते जोर देतात. असे करताना अत्यंत शांतपणे ही गोष्टी ते करतात. त्यांना या अठरा महिन्यात भेटलेल्या या साऱ्या व्यक्तींशी त्यांची फारच जवळीक असल्याकारणाने त्या सर्वांनी डिफो यांच्या मनाच्या अगदी आतल्या भागात कायमचे स्थान मिळविले होते. महान कलाकार होण्यासाठी ते जाणीवपूर्वक प्रयत्न करताना दिसत नाहीत. त्यांच्या कादंबऱ्यात कलाकुसर आढळत नाही. त्याचे कारणही तेच असावे. त्यांच्या समकालिनांना आपल्या साहित्यकृतीत कितीतरी अमोल गोष्टी आणता आल्या नाहीत. त्यापेक्षा कितीतरी अधिक गोष्टी डिफो यांच्या साहित्यकृतीत आहेत. त्याही त्यांनी सहजपणे अणि अजाणतेपणे आणलेल्या आहेत. ते आपल्या पाठीमागे फारच मोठा साहित्यठेवा ठेऊन गेले याबद्दल वादच होणे शक्य नाही. आणखीही एक मुद्दा या ठिकाणी नमूद केला पाहिजे. डिफो हे आपल्या साहित्यकृतीतून अनेक अनीतिमान व्यक्तींचे फारच सहानुभूतीपूर्वक चित्रण झाले आहे, हे मान्य करतात. पण त्याजबरोबर या चित्रणात एक नीतिपर संदेश आहे. असा दावा ते अगदी जाणीवपूर्वक करतात. त्यांच्या कादंबऱ्यातील नायिका वेश्या आहेत, चांचेगिरी करणारे, चोर लफंगे अशीही अनेक पात्रे आहेत. ही सर्व पात्रे सर्वसामान्यपणे आपले आयुष्य हे कसे वाया गेलेले आयुष्य आहे याबद्दल वस्तुनिष्ठ आणि परखड असे निवेदन करतात. आपण जी काही दुष्कृत्ये केली, दुवर्तन केले याविषयी आपणास आता खेद

होत आहे असेही सांगतात. या अशा प्रकारच्या कबुलीजबाबामुळे तत्कालीन वाचकांचे समाधान होत असावे. एकतर त्या वाचकाला गुन्हेगार, चांचे, चोर, दरोडखोर, आणि वेश्या या अशा प्रकारच्या सर्व समाजबाह्य व्यक्तींच्या आयुष्यातले बारीक सारीक तपशील जाणून घेण्याची जबरदस्त इच्छा होती. डिफो हे महान साहित्यिक हा मुद्दा वादातीत आहे. परंतु महान साहित्यिक होण्यासाठी ते जाणीवपूर्वक प्रयत्न करीत नसत. ते सहजगत्या घडले एवढेच. त्यांनी आपल्या नजरेसमोर मध्यमवर्गीय आणि तळागाळातून आलेले लोक हाच वाचकवर्ग कल्पिला होता. ते त्यांच्यासाठी कादंबऱ्या लिहीत आणि ते वाचकही त्यांच्या लेखनावर निहायत खूष होते. त्यांच्या लेखनातील मनाला भुरळ पाडणार वास्तववाद, भावनात्मक आणि धर्मपारायण अशी नैतिक वागणूक असावी. यासाठी करण्यात येणारे आवाहन हे सारेच त्या वाचकवर्गाला खूष करणारे होते. त्यांच्या कादंबऱ्यांना वस्तुस्थिती आणि घटना या दोन्हींतही चांगला भरभक्कम असा आधार होता. त्याजबरोबर तशा थोड्याशा विसविशीत अशा संविधानातील वस्तुस्थितीचा यथार्थ आविष्कार व्हावा, या हेतून अनेक तपशीलांची त्यानी केलेली निवड ही देखील वाचकांच्या पसंतीची होती. या सर्वच गोष्टींमुळे त्यांच्या कादंबऱ्यांना एक प्रकारे प्रत्यक्ष घडलेल्या घटनांच्या वर्णनांचे स्वरूप प्राप्त झालेले आहे. त्याचबरोबर आपल्यास समजावयास सोप्या, साध्या व नित्य परिचयाच्या भाषेच्या जोरावर ते आपल्याला इच्छित होता तो परिणाम साध्य करून घेत होते. डिफो यांनी किमान २५० (दोनशे पन्नास) वेगवेगळ्या साहित्यकृती निर्माण केल्यानंतरही त्यांच्या साहित्यनिर्मितीच्या वेगात खंड पडला नाही.

रॉबिनसन क्रुसो या कादंबरीच्या पाठोपाठ १७२० साली त्यांनी 'कॅप्टन सिंगलटन' ही कादंबरी लिहिली. या कादंबरीचा विषय – एक चोरलेले मूल. पुढे या मुलाला जिप्सी जमातीतील लोकांना विकण्यात येते. तो कालांतराने एक निष्णात चाचा बनतो. चाच्यांच्या साहसपूर्ण जीवनावर बेतलेली ही कादंबरी आहे. या कादंबरीनंतर मोल्ल फ्लँडर्स ही कादंबरी प्रकाशित झाली. ही त्यांची एक महत्त्वाची कादंबरी. व्हर्जिनिया वुल्फ यांच्या मते ही महानच कादंबरी. मोल्ल फ्लँडर्सची आई, एक गुन्हेगार म्हणून शिक्षा भोगत असताना, त्या तुरुंगातच तिला जन्म देते. मोल्ल फ्लाँडर्स काम-सुख देण्याबाबत सहज वश होणारी, विलोभनीय अशी नायिका. तिला तिच्या कामजीवनात जे काही अनुभव येतात. त्यानुसार तिच्या नशिबात चढउतार होतो. ती वृद्धावस्थेत आल्यानंतर आजवर आपण ज्या प्रकारचे जीवन जगलो, त्याबद्दल तिची सदसद्‌विवेकबुद्धी तिला टोचणी देऊ लागते. डिफो यांना आपल्या मध्यमवर्गीय व तळागाळातील वाचकांच्या मनोवृत्तीची जाण किती चांगली होती याचे दर्शन मोल्ल फ्लँडर्स या नायिकेच्या चित्रणात आहे. एकीकडे या मसालेदार जीवनातले बारीकसारीक तपशील जाणून घेण्याची उत्कंठा पण त्याचबरोबर हे असे अनीतिमान जीवन ती जगते याबद्दल तिला खेद होतो.

याविषयी खुषी, अशी रस्सीखेच त्या वाचकवर्गाच्या मनात सदैव चालू असे. थोडक्यात आम्ही जरी कंटाळवाणे आयुष्य जगत असलो, तरी ते आयुष्य सरतेशेवटी फारच चांगले

आयुष्य आहे याला हा कादंबरीकार मान्यता देतो,हेच त्या वाचकवर्गाच्या पसंतीचे होते.

डिफो यांच्या सर्वच कादंबऱ्यात एक मध्यवर्ती सूत्र आहे. गुंन्हेगारीच्या जगतात जे मुलगे व मुली जन्माला येतात,त्यांना आपल्या जन्मापासूनच स्वत:चे अस्तित्व टिकविण्यासाठी संघर्ष करावा लागतो. या अशा परिस्थितीत जन्माला आलेल्या पात्रांनी केलेली वातावरणनिर्मिती ही डिफो यांच्या फारच पसंतीची होती. उदा. मोल्ल फ्लँडर्सला तिच्या जन्मापासून उसंत नव्हतीच. डिफो यांनी निर्माण केलेली अत्यंत उल्लेखनीय अशी ही नायिका. तिच्यामागे कसला कसला तरी धोषा एक सारखा लागलेला असतो. सैतानातही जो अत्यंत वाईट ठरला असता तो सैतान– दारिद्र्य हा तिला कायम सतावतो. तिला घरगुती व प्रेमळ जीवनाचा अनुभव कधीही येत नाही, कारण तिच्या जन्मदात्रीला त्यातले काहीच माहीत नव्हते. रोक्झाना ही डिफो यांची दुसरी एक नायिका. तिच्या जीवनाची सुरुवात तशी चांगल्या परिस्थितीत झालेली होती. पंधराव्या वर्षी तिचे लग्न होते. परंतु थोड्याच दिवसात आपला नवरा कर्जबाजारी होऊन त्याला नादारी जाहीर करण्याची पाळी आली आहे, हे तिला पाहावे लागते. यावेळी तिच्या पदरात पाच मुले होती. डिफो या परिस्थितीचे वर्णन करताना लिहितात, 'शब्दांच्या पलीकडे जाणारी अत्यंत घृणास्पद अशी अवस्था.'

मोल्ल फ्लॉंडर्सला अगदी लहानपणापासूनच द्रव्यार्जन करावे लागले होते. एकदा शिवणकाम शिकून घेतल्यानंतर पोट भरण्यासाठी एक हुन्नर प्राप्त झाली. पैसे मिळवण्याला एक साधन हाती आले. तिला अपार कष्ट करावे लागले. सतत स्थलांतर करावे लागले. वैचित्र्यपूर्ण अनुभवांना सामोरे जावे लागले. डिफो यांनी आपल्या नायिकेला तरल अशा घरगुती वातावरणाचा अनुभव अजिबात दिला नाही. तसे करणे हे त्यांच्या आवाक्याबाहेरचे असावे. डिफो यांना गुन्हेगारी जगताबद्दल चांगलीच जाण होती. त्या जगतातील असाधारण व्यक्ती आणि त्यांची चालचलणूक

या दोन्हीबद्दल त्यांना भरपूर माहिती होती. या सर्वांचा उपयोग मोल्ल फ्लँडर्सच्या निर्मितीत भरपूर झालेला आढळतो. सुरुवातीपासून आपले अस्तित्व टिकवून धरण्याची जबाबदारी तिच्यावर सोपविण्यात आलेली आहे. तिला आपल्या स्वत:ची अक्कलहुशारी व अन्य व्यक्तींची परीक्षा करण्याची ताकद या दोहोंवर सर्वस्वी भिस्त ठेवावी लागत होती. तिच्या आयुष्यात झटपट निर्णय घेतलाच पाहिजे, असे तातडीचे प्रश्न अनेक आले. या प्रसंगाच्या वेळी तिने स्वत:च्या अनुभवातून, स्वत:चे डोके वापरून तयार केलेल्या नीतितत्त्वांच्या मदतीने, प्रसंग येईल तसा तसा त्या प्रसंगाशी मुकाबला केला. ही कादंबरी तशी फारच प्रवाही आहे. याचे एक कारण असे आहे की, त्यावेळच्या समाजाला जे नीतिनियम, कायदे मान्य होते, त्यापलीकडे या कादंबरीची नायिका केव्हाच गेली होती. असे असल्याने या कादंबरीच्या व्यक्तिचित्रणात व वर्णनात कसलीच बंधने येत नाहीत. मोल्ल फ्लँडर्स तारुण्याच्या अगदी सुरुवातीच्या काळातच समाजाबाहेर फेकली गेली, म्हणूनच अशा व्यक्तीला जे अनिर्बंध स्वातंत्र्य असते त्याची प्राप्ती तिला झालेली होती. स्थैर्य, सुरक्षितता, सौख्य आणि आराम या अवस्थेत येऊन तिथेच थांबणे ही मोल्ल फ्लँडर्सच्या

बाबतीत एक अशक्यप्राय घटना होती. या अशा प्रकारच्या शब्दचित्रणामुळेंच डिफो हे किती प्रज्ञावान कादंबरीकार आहेत याचा पुरावा मिळतो. ही कादंबरी साहसे व मसालेदार घटना यांची मालिका असलेली कादंबरी करण्याचा धोका ते टाळतात. कादंबरीकार आम्हा वाचकास समजावून सांगतो की, मोल्ल फ्लँडर्स ही स्त्री आहे. तिला स्वत:चे असे आयुष्य आहे. तिचे आयुष्य, ही साहसांची एक मालिका यासाठी उपयुक्त साहित्य, या स्वरूपाचे नाही हे सिद्ध करण्यासाठीच जणू ती आपल्या आयुष्याच्या सुरुवातीला भावनाविवशतेने प्रेमात पडते. ही घटना दुर्दैवी होती, पण तसे झाले. या प्रेमात पडण्यात चूक केली हे तिला समजल्यानंतर, ती जागृत होते. या प्रेमसंबंधातून बाहेर पडून, दुसऱ्या कोणाशी तरी लग्न केले पाहिजे याची जाणही तिला होते. म्हणूनच ती आपल्या भावी आयुष्याचे चित्र काय असेल? आपली सांपत्तिक परिस्थिती कशी असेल, याबद्दल अगदी नीट तपशीलात जाऊन तपासणी करते. तिच्या भावनांचा यात कसलाच अधिक्षेप नाही. तिचा जन्म ज्या परिस्थितीत झाला होता, त्यावर त्याची जबाबदारी आहे. डिफो यांच्या सर्वच नायिका, या कोणतीही गोष्ट समजावून घेण्याबद्दल, फारच व्यवहारी व दक्ष असतात. हे असे करताना त्या अगदी 'निरोगी' असतात म्हणून कसलेही पूर्वग्रह, हेवेदावे यांचा स्पर्शही त्यांना झालेला नसतो. मोल्ल फ्लँडर्स या नियमाला अपवाद नाही. तिला जेव्हा सोईचे व फायद्याचे असते, तेव्हा ती चक्क खोटे बोलते. हे असे वर्तन केले याबद्दल तिला कसलाही विधिनिषेध नसतो. परंतु ती ज्यावेळी, तिला प्रतीत झालेल्या सत्याविषयी बोलते, तेव्हा त्यात काहीना काहीतरी असे असते की, ते नाकारणे केवळ अशक्य! वैयक्तिक प्रेम व्यक्त करण्यासंबंधी, जी कलाकुसर लागते, त्यावर वेळ खर्च करण्यासाठी तिला फुरसतच नाही. एखादा अश्रू ढाळला जातो, एखाद्या असहाय्यतेच्या क्षणाची नोंद होते, पण हे सारे तसे तात्पुरतेच. कथानकाचा ओघ चालूच राहातो. वादळ आपल्या हृदयात गच्च धरून ठेवील अशी या कथानायिकेची प्रकृती आहे. आपली स्वत:ची ताकद कार्यवाहीत आणण्यात तिला आनंद आहे. ती तशी हृदयशून्य आहे हे खरेच. पण तिच्यावर विचारशून्यतेचा, छचोरपणाचा आरोप कोणासही करता येणार नाही. तिला जीवनात आनंद आहे. ती अशा प्रकारचे जीवन जगते की, आपण सारेच तिच्यामागे फरफटत जाऊ. याही पलीकडे जाऊन एक गोष्ट सांगता येईल. तिच्या महत्त्वाकांक्षेने आपल्या शक्तीवर, तसा ताणच आणलेला आहे. ताण अशासाठी की आपण तिच्या महत्त्वाकांक्षेची गणना उदात्त अशा भावनात करतो. आपली कल्पनाशक्ती इतकी ताणावी लागते. ती चाणाक्ष आहे. व्यावहारिक आवश्यकतांची तिला चांगली जाण आहे. हे असे असले तरी रोमांचकारी प्रणयाच्या इच्छेने ती झपाटलेली आहे. एखाद्या पुरुषाचा 'जंटलमन' कोठच्या गुणामुळे होतो यासंबंधी तिच्या ज्या काही कल्पना आहेत, त्यांनी तिला पछाडलेले आहे. ती म्हणते एखाद्या लफंग्याने मला फसविण्यापेक्षा एखाद्या प्रतिष्ठावान पुरुषाने मला फसविले तर मी ते पसंत करीन. एकदा ती हमरस्त्यावर दरोडेखोरीचा धंदा करणाऱ्या दरोडेखारीला ठकविते. त्यानंतर तिला पैशांची किती प्राप्ती झाली हे अगदी मोकळेपणे सांगून टाकते. ती हरएक प्रकारच्या गुन्ह्याकडे सहानुभूतीने पाहावयास तयार आहे.

परंतु यासाठी तिची फक्त एकच अट असते. एखाद्याची चलती असते, तेव्हा त्याने केलेला गुन्हा, क्रौर्य, दादागिरी या सर्व गोष्टींबद्दल मोल्ल फ्लँडर्स त्या गुन्हेगार व्यक्तीला क्षमा करणार. अट फक्त एकच असते. हे गुन्हे अगदी खालच्या पातळावर असता कामा नयेत. तसेच त्यात दयामाया नाही असेही होता नये. तसेच गुन्हा करणाऱ्या व्यक्तीचा पडता काळ असला म्हणजे त्याने घृणास्पद आणि नीच समजली जातील असली कृत्ये करता कामा नयेत असे तिचे सांगणे होते. म्हणूनच मोल्ल फ्लँडर्स या निर्ढावलेल्या, पापी व गुन्हेगार बाईच्या अंगी असलेल्या गुणांची यादी अशीच वाढविता येईल. तिला शोक करायला वेळ नव्हता याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेलाच आहे. गुन्हेगारांकडे ती क्षमाशील दृष्टीने पाही. याचा अर्थ ती निर्दय होती असा नाही. आपल्या जीवनाकडे गंभीरपणे पाहात नव्हती असेही नाही. तिला आपल्या स्वतःच्या अस्तित्वाबद्दल आत्मीयता होती आणि जीवनाविषयी आनंद होता. सर्व जगाचा तिला कितीही वाईट अनुभव आला, तरी तिच्या मनात या जगाविषयी प्रेमभावना व सद्भावनाच होती. थोडक्यात डिफो यांची ही नायिका पाप-पुण्याबद्दल सर्वसामान्य व्यक्तीच्या ज्या कल्पना असतात, त्यानुसार वर्तन करीत नव्हती हे खरेच आहे. पण सर्वसामान्यांच्या दृष्टिकोनातून विचार करताही, तिच्या गुणांची व चांगुलपणाची यादीही चांगलीच मोठी आहे. या सर्व कारणांमुळे, कोठल्याही नीति-नियमांची चाड नसेलल्या मोल्ल फ्लँडर्सला आपण दोषी ठरवत नाही, उलट तिचे कौतुकच वाटू लागते.

डिफो हे नुसतेच पत्रकार नव्हते. आपल्याला माहीत असलेल्या घटना जशाच्या तशा आम जनतेपर्यंत ते पोचवीत नव्हते. त्यांना मानसशास्त्राची प्रकृती काय आहे, याची चांगली जाण होती. त्यांनी आपल्या वाङ्मयात अनेक व्यक्ती व पात्रे निर्माण केली. या सर्वांनाच त्यांच्या साहित्यात आपल्या गतीने, आकार व आशय प्राप्त होती. डिफो एखाद्या तरल मुद्यावर भर देत नाहीत, वा त्याच्या अवतीभोवती घोटाळतही नाहीत. त्यांनी शब्दबद्ध केलेल्या शोकपर्यवासी प्रसंगाबद्दलही हेच म्हणता येईल. डिफो यांनी निर्माण केलेली पात्रे व व्यक्ती, ही त्यांच्या स्वतःच्या मनात फारच आत गेलेली असतात. म्हणूनच त्या पात्रांना व व्यक्तींना, आपण नेमके असे का वागतो. हेच ज्यांना ठाऊक नाही, अशा प्रकारे, डिफो आपण निर्माण केलेल्या त्या पात्रांचे जीवन घडवितात. म्हणूनच स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव नसलेल्या, एखाद्या प्रतिभावान साहित्यिकाने, एक प्रकारे अजाणतेपणे निर्मिती केलेली असते. या निर्मितीत, त्याने खूपसे 'सोने' मागे ठेवलेले असते. त्याचसारखे हे आहे. त्या सारखीच डिफो यांची निर्मिती आहे. डिफो यांच्या समकालीनातील कोणालाही ते सोने पृष्ठभागावरही आणता झाले नाही. मग ते मागे ठेवण्याची गोष्टच विसरा. मोल्ल फ्लँडर्स ही वृद्ध होते. तिला आपण आजवर जे जीवन जगतो, त्यासंबंधी टोचणी लागते; असे जरी डिफो यांनी शब्दांकित केलेले असले, तरी त्यासंबंधी त्यांचा विचार व निर्णय, हा तसा पक्का होता असे दिसत नाही. कारण ते मोल्ल फ्लँडर्सने नेमका गुन्हा कोठचा केला? तिच्या पापाचे स्वरूप नेमके काय? अथवा तिने अमुक तमुक पाप केले, या

विषयी डिफो यांचे नेमके काहीच ठरत नव्हते. तसेच समाजाने, वाऱ्यावर सोडून दिलेल्या व्यक्तीचा जेव्हा ते विचार करत होते, तेव्हा त्या विचारात अनुस्यूत असलेल्या प्रश्नांची जाणीवही त्यांना नव्हती असे दिसते. त्यांनी असे जरी स्पष्टपणे सांगितलेले नसले, तरी या उपस्थित होणाऱ्या आनुषंगिक प्रश्नांची उत्तरे, त्यांना जे श्रद्धेय वाटत होते, त्याच्याशी मिळतीजुळती नाहीत, याबद्दल त्यांनी सूचन केलेले आहे. या संबंधीचा पुरावा एज्युकेशन ऑफ विमेन (स्त्रियांचे शिक्षण) या नावाचा निबंध त्यांनी लिहिला होता, त्यात सापडतो. स्त्रियांचा आवाका किती प्रचंड आहे, हे जाणण्यात ते आपल्या युगाच्या फारच पुढे होते. त्यांच्या मते स्त्रियांवर नेहमीच अन्याय होतो. त्या अन्यायाचे स्वरूपही क्रूर आहे असे त्यांचे म्हणणे होते. ते या लेखात पुढे म्हणतात:

"शिक्षणापासून मिळणाऱ्या फायद्यांपासून आपण स्त्रियांना वंचित करतो. जगातली अत्यंत रानटी अशी ही प्रथा आहे हे असे मला वारंवार वाटत आलेले आहे. आपला देश एक सुसंस्कृत व ख्रिश्चन धर्माबद्दल कमालीची आस्था असलेला देश! या संदर्भात स्त्रियांना शिक्षण न देणे ही प्रथा अत्यंत रानटी अशीच आहे. चुका करण्याबद्दल आणि उर्मटपणाविषयी आपण स्त्रियांची रोजच कानउघाडणी करतो. पण पुरुषांइतकाच त्यांना शिक्षणाचा फायदा मिळाला असता, तर त्या आम्हा पुरुषांपेक्षा कितीतरी कमी अपराधी ठरल्या असत्या, याविषयी मला खात्री आहे.

कदाचित आजकालच्या स्त्री-मुक्तीच्या पुरस्कर्त्या, मोल्ल फ्लँडर्स आणि रोक्झाना या डिफो यांच्या नायिका या आपल्या पूर्वसूरी आहेत असे मानणारही नाहीत. परंतु स्त्री-मुक्तीबद्दल फारच आधुनिक ठरेल अशा तत्त्वप्रणालीविषयी काही सांगावे, एवढाच हेतू डिफो यांचा नव्हता, हे स्पष्ट आहे. त्यांनी या व्यक्ती शब्दबद्ध करताना, त्या एका विशिष्ट प्रकारे केल्या आहेत. या नायिकांना काहीशा सर्वसामान्य अशा जगावेगळ्या आपत्तींना व परिस्थितीला सामोरे जावे लागले होते. हे सारे डिफो असे काही चित्रित करतात, की आपली सहानुभूती त्या दोघींनी कितीही अनीतिमान दिसणारे वर्तन केले तरी त्यांच्याकडेच वळते. मोल्ल फ्लँडर्स हिने एके ठिकाणी "स्त्रियांना आपले स्थान पक्केपणी टिकवून धरावयाचे असेल, तर धैर्य आणि सत्ता यांचीच आवश्यकता आहे", असे सांगितले आहे. तिने आपल्या स्वत:च्या वर्तनाने या दोन गोष्टी साध्य केल्या आणि त्यापासून काय फायदे होतात तेही दाखवून दिले.

इ. स. १७२२ साली, डिफो यांनी एक वेगळ्याच प्रकारचे पुस्तक लिहिले. त्या पुस्तकाचे नाव आहे, 'जर्नल ऑफ दि प्लेग इअर' (प्लेगच्या वर्षातला नोंदवही). हे त्यांचे पुस्तक चांगलेच प्रसिद्ध आहे, आणि डिफो यांच्या सर्व साहित्यिकृतीतली ती सर्वोत्कृष्ट साहित्यकृती मानली जाते. इ. स. १६६५ साली इंग्लंडमध्ये महाभयानक अशी प्लेगची साथ आली होती. डिफो यांनी त्याबद्दलचे वृत्तांत वाचून रचलेली ही कृती आहे. प्रख्यात रोजनिशीकार सॅम्युअल पेपी यांनी त्याच साथीचे – प्रत्यक्ष घटना घटताना पाहिल्यानंतरचे – वर्णन लिहून काढले होते. डिफो यांचे कल्पित वर्णन त्या वर्णनापेक्षा कितीतरी उजवे आहे. डिफो यांच्या वर्णनात वेधकता, वैचित्र्य आणि १६६५ सालातला उडालेला हाहाकार अगदी स्पष्टपणे उभा करण्याची



अनुक्रमणिका

ताकद आहे.

या पुस्तकानंतर रोक्झाना ऑर फॉर्च्युनेट मिस्ट्रेस (रोक्झाना अथवा सुदैवी रखेली) ही कादंबरी १९२४ साली लिहिली. व्हर्जिनिया वुल्फ यांच्या मते ही इंग्रजी साहित्यातील आणखी एक महान कादंबरी. याचा उल्लेख या पूर्वी आलाच आहे. या कादंबरीत मोल्ल फ्लँडर्स या कादंबरीत वर्णिलेल्या विषयाकडे ते पुन्हा एकदा वळतात. डिफो यांनी या कादंबरीत रोक्झानाच्या सुखलोलुपतेविरुद्ध निषेध नोंदविला आहे हे खरे. पण त्यांचे मन त्यात नसावे. कारण हा निषेध तसा जोरदार नसून अगदी वरवरचा आहे. या उलट रोक्झाना आपले सौंदर्य व लैंगिक आकर्षण या दोहोंचा वापर करून पैसा व सुख कसे प्राप्त करून घेते, याचा या कादंबरीत साद्यंत वृत्तांत वाचावयास मिळतो. रोक्झानाची अनेक विषयांवरची मते, ही त्या काळातील मतापेक्षा फारच पुढे गेलेली होती. उदा. विवाहबंधनांनी गुलामगिरी कशी येते, याबद्दल ती फारच चतुराईने व तरल युक्तिवादाचा वापर करून जोरदार प्रतिपादन करते. ते ऐकणारा त्यावर तिला म्हणतो, "सध्या सर्वमान्य अशी जी रूढी आहे, त्या विरुद्ध तो एक प्रकारचा युक्तिवाद आहे." यावरून असा समज होण्याची शक्यता आहे, की डिफो आपल्या कादंबरीतल्या पात्रांच्याद्वारा प्रचारी प्रवचने झोडणारे गृहस्थ आहेत. ही कादंबरीत वाचणाराला तसा अनुभव येणार नाही. हा अशा स्वरूपाचा युक्तिवाद करणारी रोक्झाना हिला आपण आदर्श स्त्रीत्वाचा उत्तम नमुना नाही याबद्दल जाणीव आहे. म्हणूनच वर उल्लेख केलेला युक्तिवाद करताना "तो एका वरच्या थरावरचा युक्तिवाद आहे. माझ्या मनात प्रथम येणारा विचार तो कधीच नव्हता," हे सांगण्याची मोकळीक तिला आहे. रोक्झानाला आपला दोष व कमकुवतपणा या दोहोविषयी चांगली जाणीव आहे. आपल्या स्वत:च्या हेतूबद्दल तिच्या मनात नेहमीच शंका व संशय असतात. म्हणूनच त्याविषयी ती आपली स्वत:ची एकसारखी उलट तपासणी करताना आढळते. या सर्व कारणांमुळे रोक्झानाहे एक वेगळ्याच प्रकारचे व्यक्तिचित्र आहे, याचा अनुभव वाचकाला येतो.

व्हर्जिनिया वुल्फने म्हटले आहे, "स्त्री-मुक्तीबद्दलचे विचार डिफो यांनी प्रथम मांडले म्हणून, किंवा त्यांनी वर्णन केलेल्या काही प्रसंगांचे इब्सेनच्या नाटकात रूपांतर झाले म्हणूनच त्यांच्याबद्दल आपणास आदर वाटावा असे नाही. स्त्रियांची परिस्थिती काय होती यासंबंधीचे त्यांचे विचार व कल्पना काहीही असोत. ते जीवनातील महत्त्वाच्या आणि चिरकाल टिकणाऱ्या गोष्टींबद्दल लिहितात. क्षणभंगुर आणि किरकोळ अशा गोष्टीविषयी लिहीत नाहीत, म्हणून ते आपल्या आदरास पात्र आहेत. अनेकवेळा त्यांचे लिखाण कंटाळवाणे वाटते. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अगदी काटेकोरपणे विचार करणाऱ्या प्रवाशांच्या नेमकेपणाने ते प्रत्येक गोष्टीची नोंद करीत आहेत असे वाटते. हा प्रवासी भोवतालची वनराजी लक्षात घेत नाही. मानवी स्वभावाच्या फार मोठ्या भागाबद्दल तो अज्ञानी आहे असे वाटते. हे सारे मान्य करूया. परंतु आपण ज्यांना महान लेखक मानतो, त्यांच्या लिखाणतही हे दोष आपणाला आढळून येतात.

म्हणूनच या महान लेखकांचे हे दोष नजरेआड करून जे लिखाण राहाते त्यांची वैशिष्ट्यपूर्णता व वाचनीयता आपण कधीच नाकारत नाही."

डिफो यांनी सुरुवातीलाच आपला मर्यादित आवाका स्पष्ट केला आहे.तसेच त्यांनी आपल्या स्वत:च्या आकांक्षावर बंधने घातली आहेत. हे केल्यानंतर मात्र त्यांनी आपला दृष्टिकोन किती अंतर्भेदी आहे, हे दाखवून दिले आहे.त्याच्या जोरावरच फारच वेगळ्या सत्याजवळ ते पोचतात. डिफो यांचे उद्दिष्ट किती मर्यादित आहे, या सत्य घटनेपेक्षा, त्यांनी हस्तगत केलेले सत्य हे अधिक दुर्मिळ व अधिक काळ टिकणारे आहे. मोल्ल फ्लँडर्स, रोक्झाना, आणि त्या दोघींच्या मैत्रिणी यांची शब्दचित्रे त्यांनी का शब्दांकित केली? त्यांच्या कथा का सांगितल्या? किंवा अनैतिक जे सर्वसामान्य नीतिकल्पनांच्या अनुषंगाने आदर्श ठरले असते, त्यांची वर्णने वाचून आमजनतेला फायदा होईल म्हणून त्यांचे चित्रण केले का? या प्रश्नांचे उत्तर या वर्णित व्यक्तींकडे 'वैचित्र्य' होते म्हणून ते केले गेले,असे कोणी सांगितले तर ते बरोबर ठरणार नाही. खुद्द डिफो यांनीच या त्यांच्या नायिकांची वागणूक अनैतिकतेचा आदर्श ठरली असती याची कबुली दिलेली आहे,असे कोणी वर उल्लेखिलेल्या उत्तराच्या समर्थनार्थ सांगेलही. पण तेही चूक आहे. डिफो यांना पुढील गोष्टी सूचित करावयाच्या आहेत. डिफो यांनी निर्माण केलेल्या या सर्व पात्रांनी,आपल्या आयुष्यभर खडतर हालअपेष्टा सोसल्या, आणि म्हणूनच त्यांच्यात स्वाभाविक ठरेल अशा प्रामाणिकपणाची निर्मिती झाली होती. डिफो यांचे लक्ष त्यांच्याकडे खेचले गेले ते त्या कारणानेंच. गुन्हेगारी आणि अनैतिकतेच्या जगात वावरणारी, व त्या जगात अनुस्यूत असलेले दुर्गुण अंगी असलेल्या डिफो यांनी निर्माण केलेल्या व्यक्ती,आपल्या स्वत:च्या वागणुकीबद्दल कसलेही समर्थन देत नाहीत. आपल्या हेतूंच्या समर्थनार्थ ते कशाचाही आसरा घेत नाहीत. दारिद्र्य हाच आपल्याकडून काम करून घेणारा धनी त्यांचे असे सांगणे आहे. डिफो त्यांच्या वागण्यातल्या ज्या त्रुटी आहेत, त्याबद्दल जरूर मत व्यक्त करतात, पण ते अगदी खालच्या आवाजात. त्या व्यक्तींचे धैर्य, उपक्रमशीलता व चिकाटी पाहून डिफो आनंदित होतात. त्यांना त्या गुन्हेगारांचा समाज हा प्रसन्न संभाषण, परस्परांवर असलेला विश्वास, सुखदायक कथानके, आणि एक प्रकारे त्यांनी घडविलेले 'जिनिएस' या सर्व गोष्टींनी भरलेला आहे, असे त्यांना आढळून आले हाते. त्या सर्वांची चित्रणे कल्पनातीत अशा वैविध्याने विनटलेली होती. डिफो त्यांची स्तुती करतात व त्याबद्दल खुषी व्यक्त करतात.

ते काहीही असो, हे सर्व स्त्री-पुरुष आपल्या इच्छा, भावना या सर्वांविषयी अगदी मनमोकळेपणे बोलतात. मानवजातीच्या आरंभापासून या त्यांच्या इच्छा व भावना यांनी स्त्री-पुरुषांना दोलायमान केलेले आहे; या वर्तमानकाळातही त्या इच्छा व भावनांचा जोष कायम आहे. त्यांच्या सर्व वागण्यात एक आदब आहे. त्याकडेही डिफो मोकळेपणाने पाहातात व त्याचे चित्रण करतात. पैसा हा विषय तसा रोचक नाही. या गुन्हेगार व्यक्तींच्या इतिहासात 'पैसा' या विषयाने फारच मोठा भाग व्यापलेला असतो. हा विषय त्यांच्या जीवनातही तसा

रोचक नसला तरी तो कधीच शोकपर्यवासी (TRAGIC) होत नाही. कारण पैसा हाती आल्यानंतर या गुन्हेगार व्यक्तींपैकी बहुतेकांना ऐषआराम प्राप्त होणार नसतो व तसा त्यांच्या जीवनावर त्या पैशाचा फार मोठा परिणामही होत नाही. पण त्यांच्याजवळचा पैसा, हे प्रामाणिकपणा, प्रतिष्ठा आणि प्रत्यक्ष जीवन या सर्वांचेच प्रतीक आहे. डिफो हे तसे लांब चऱ्हाट वळणारे, कंटाळवाणे लेखक आहेत, असा कोणी त्यांच्याबद्दल आक्षेप घेईल. तो काही प्रमाणात खराही आहे. तसे असले तरी एक गोष्ट नक्की. अत्यंत किरकोळ अशा गोष्टीत ते कधीही व्यस्त नसतात.

(आधारित)

(संपादकीय)

शकतो. हातात आलेले किंवा मिळवलेले पुस्तक वाचताना आपण काय लक्षात ठेवावे यासंबंधी या अंकात एकलेख आहे. प्रसिद्ध लेखिका व्हर्जिनिया वुल्फ यांनी पुस्तकवाचनासंबंधी केलेले हे मार्गदर्शन आपणास उद्बोधक वाटेल.

प्रकाशक आणि लेखक यांचे संबंध म्हणजे 'तुझे माझे जमेना आणि तुझ्यावाचून चालेना' अशा स्वरूपाचे ! फक्त मराठी लेखक प्रकाशक यांच्या बाबतीतच ही गोष्ट खरी आहे असे नाही तर जगभरच्या साहित्यक्षेत्राकडे नजर टाकली असता सर्वत्र अशीच वृत्ती असल्याचे आढळते. त्याविषयी एक मजेशीर टिपण नोंदवहीत !

भारतात लेखन हा पूर्ण वेळचा व्यवसाय होऊ शकत नाही. त्यामुळेच employment exchange प्रमाणे इथे लेखकांसाठी काम किंवा काम मिळवून देणारे प्रतिनिधी, या गोष्टी आपणास परिचित नाहीत. परदेशात 'literary agent' लेखकांचा प्रतिनिधी ही एक 'संस्था'च असते. अशा संस्थेचे काम करीत असताना एका प्रतिनिधीला आलेल्या अनुभवांचे टिपणही नोंदवहीत वाचावयास मिळेल.

जाताजाता पुन: एकवार, अंकाची गुणवत्ता वाढावी यासाठी सूचना कराव्यात, लेखनसाहाय्य करावे असे आपणा सर्वांस आवाहन ! हे द्वैमासिक आपणा सर्वांचेच आहे हे आम्ही आपणास सांगायला नकोच. तेव्हा ते अधिकाधिक दर्जेदार आणि समर्थ कसे होईल ते आपण सर्वांनीच पाहायचे आहे.

– संपादक.

---

**'तपशील' चा तपशील :**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अंकांची) वार्षिक वर्गणी रु. २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येईल.





अनुक्रमणिका

# लेखकाची मुलाखत

## सर पी. डी. जेम्स

**– डॉ. आनंद जोशी**

**डिटेक्टिव आणि क्राइम कादंबरी – एक नोंद**

डिटेक्टिव व क्राइम कादंबरी हे दोन्ही साहित्यप्रकार मराठी साहित्यात तसे उपेक्षित व अविकसित. मराठीतील डिटेक्टिव क्राइमकथा या भाषांतरित, रूपांतरित किंवा आधारित असतात. हा साहित्यप्रकार कादंबऱ्यांच्या इतर प्रकारांप्रमाणे मराठीत का विकसित झाला नाही हा एक प्रबंधाचा विषय होईल. पण याचं महत्त्वाचं कारण कोणतं हे थोडा विचार केल्यास सहज लक्षात येईल. खाजगी डिटेक्टिव ही संकल्पना व संस्था पाश्चिमात्य समाजात निर्माण झाली व तिचा विकास होऊन ती तेथील काही लोकांच्या उपजीविकेचे साधन बनली. भारतीय समाजात ही संकल्पना म्हणावी तशी अजून रुजलेली नाही व तिचा विकासही झाला नाही. त्याला लागणारे विज्ञान व तंत्रज्ञान हेही परकीय असून त्याचा विकास आपल्या देशात कूर्मगतीनं होत आहे. त्यामुळे आपल्या देशात प्रायव्हेट डिटेक्टिव अेजन्सी व्यापक प्रमाणात दिसत नाहीत. जी संकल्पना समाजात रुजलेली नसते त्याचे साहित्यात प्रतिबिंब पडणे कठीण म्हणून डिटेक्टिव, आणि क्राइम नॉव्हेल हा साहित्यप्रकार मराठीत अभावानेच दिसतो. हा साहित्यप्रकार मराठी मातीत रुजला नसल्यामुळे त्यासाठी लागणारी शब्दसंपत्ती व संज्ञा निर्माण झालेल्या नाहीत. साहित्यसमीक्षा परिभाषाकोशात डिटेक्टिव नॉव्हेलला गुप्तचर कादंबरी हा प्रतिशब्द दिला आहे, तर क्राइम नॉव्हेल हा शब्द या कोशात नाही. डिटेक्टिव कादंबरीला रहस्यप्रधान हा दुसरा शब्द आहे. पण हे दोन्ही शब्द डिटेक्टिव कादंबरी ही संज्ञा सार्थपणे वाचकांच्या डोळ्यासमोर उभी करण्यास असमर्थ ठरतात. या लेखवजा मुलाखतीत डिटेक्टिव कादंबरी व क्राइम कादंबरी हे दोन शब्द तसेच ठेवले आहेत. काही ठिकाणी डिटेक्टिव कादंबरीला रहस्यप्रधान कादंबरी व क्राइम नॉव्हेलला गुन्हेविषयक कादंबरी असे मराठी प्रतिशब्द वापरले आहेत.

इंग्रजी साहित्यात पहिली डिटेक्टिव कथा पो (Poe) या लेखकानं लिहिली असं सर्व–साधारणपणे मानलं जातं. पो या लेखकानं 'मर्डर इन रु मॉर्ग' ही कथा १८४१ साली लिहिली. विल्की कॉलीन्सची 'दि मून स्टोन' १८६८ साली प्रकाशित झाली. सर आर्थर कॉनन डॉयलच्या शेरलॉक होम्सनं जागतिक प्रसिद्धी मिळवली. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात! शेरलॉक होम्स हा जंटलमन डिटेक्टिव, डिटेक्टिवचा आदर्श म्हणून प्रसिद्ध व प्रस्थापित झाला.

विसाव्या शतकात जी. के. चेस्टरटन, ॲगाथा ख्रिस्ती, डोरोथी सेयर्स या ब्रिटिश लेखकांनी होम्सच्या परंपरेवर डिटेक्टिव कथांची उभारणी केली. कायदा व सुव्यवस्थेचा विजय होतो हे

त्यांनी त्यांच्या कथातून प्रकर्षानं दाखवून दिलं. या लेखकांच्या कथांना खानदानी व घरंदाज वातावरणाची पार्श्वभूमी लाभली. डिटेक्टिव कथांच्या या तथाकथित सुवर्णयुगाला आव्हान केलं अमेरिकी हार्डबॉइल्ड डिटेक्टिव लेखकांनी. हार्डबॉइल्ड म्हणजे कणखर,(या कादंबऱ्यातला डिटेक्टिव मारामाऱ्या करतो, वेळप्रसंगी चांगलाच जखमी होतो. प्रेमात तर तो एकसारखाच पडत असतो, एरवीच्या डिटेक्टिव कादंबऱ्यात हे होत नाही) वास्तववादी डिटेक्टिव कथारूप साहित्याची शैली. हार्डबॉइल्ड ही डिटेक्टिव व क्राइम कादंबऱ्यांच्या संदर्भातील पारिभाषिक संज्ञा. डॅशेल हॅमेट, रेमंड चँड्लर या लेखकांनी हार्डबॉइल्ड शैलीत १९३०च्या सुमारास डिटेक्टिवकथा लिहिण्यास सुरुवात केली. भ्रष्टाचार व कपट कारस्थानं यानं अंतर्व्याप्त झालेल्या जगताचं प्रतिबिंब हार्डबॉइल्ड शैलीत दिसून येतं. आधुनिक डिटेक्टिव व क्राइम कथारूप साहित्यात अभिजात व हार्डबॉइल्ड या दोन्ही शैलींचं प्रतिनिधित्व करणारं साहित्य आपल्याला दिसून येतं म्हणून या साहित्यप्रकाराच्या लोकप्रियतेची व अष्टपैलूपणाची ही पोचपावतीच आहे असं पाश्चिमात्य साहित्यविश्वात मानलं जातं.

पी. डी. जेम्स या लेखिकेने डिटेक्टिव आणि क्राइम कादंबरीवर स्वत:चा ठसा उमटवला व डिटेक्टिव कादंबरी वाङ्मयाच्या मुख्य प्रवाहात आणली. तिच्या मुलाखतीचा वृत्तान्त सोबत दिला आहे. इंग्रजी भाषेत व संभाषणात आदरार्थी बहुवचन नसते म्हणून पी. डी. जेम्सच्या मुलाखतीलासुद्धा त्याच पद्धतीने द्वितीय पुरुषी एकवचन वापरले आहे.

**पी. डी. जेम्सची मुलाखत**

पी. डी. जेम्स ही ब्रिटनमधील एक आवडती व प्रशंसेस पात्र झालेली लेखिका. गुन्हेविषयक कथांची राणी व बुजर्ग रहस्यप्रधान कादंबरीकार म्हणून जेम्सचा लौकिक. तिचा वाचकवर्ग विस्तृत आणि विविध स्तरातील. गुन्हेगारीविश्वाच्या व रहस्यप्रधान कादंबऱ्या चवीने वाचणाऱ्या वर्तुळाबाहेरसुद्धा पी. डी. जेम्सचा वाचकवर्ग अथांग पसरलेला. टाइम्स लिटररी सप्लिमेंट व लिटररी रिव्ह्यू या वाङ्मयास वाहिलेल्या नियतकालिकातून समीक्षकांनी जेम्सची प्रशंसा केली आहे. शेरलॉक होम्सचा आर्थर कॉनन डॉयल व हर्क्युल पायरॉयची ॲगाथा ख्रिस्ती ही नावे मराठी वाचकांना परिचित पण पी. डी. जेम्स मात्र अपरिचित. वर सांगितलेल्या दोन दिग्गजांच्या कथारूप साहित्यापेक्षा पी. डी. जेम्सच्या कादंबऱ्या निराळ्या. रहस्यप्रधान व गुन्हेविषयक कादंबरीच्या प्रचलीत व्याख्येपल्याडच्या जेम्सच्या कादंबऱ्या. रहस्यप्रधान कादंबरीचा स्वत:चा साहित्यप्रकार तिने निर्माण केला. रहस्यप्रधान कादंबरी पी. डी. जेम्सने कादंबरीच्या मुख्य प्रवाहात आणली व स्वत:चा ठसा उमटवला म्हणून हा लेखप्रपंच.

**कौटुंबिक परवड वाङ्मयीन यश**

१९२० साली जेम्सचा ऑक्सफर्डमध्ये जन्म, पण शिक्षण मात्र केंब्रिज येथील कन्याशाळेत. तिच्या शिक्षणाची सुरुवात वयाच्या अकराव्या वर्षी, जेव्हा तिचे आईवडील केंब्रिजला स्थिरस्थावर झाले तेव्हा. ती शाळेत गेली जेमतेम पाच वर्ष. वयाच्या सोळाव्या वर्षी तिने शाळा सोडली

आणि कामाला सुरुवात केली. १९४१ साली कॉनॉर ब्रँटी व्हाइट या डॉक्टरशी तिचं लग्न झाले. दोन मुली झाल्या, क्लेअर आणि जेन. नवरा दुसऱ्या महायुद्धानंतर परतला तो खचलेला मनोरुग्ण होऊन. काम करणं आता त्याच्याने शक्य नव्हतं. कुटुंब चालवण्याची जबाबदारी जेम्सवर पडली. नॅशनल हेल्थ स्कीममध्ये तिनं नोकरी धरली. व काही वर्षात तिची गृहखात्यात बदली झाली. चांगलं काम करून तिने लौकिक कमावला व एक महत्त्वाची अधिकारी म्हणून पोलिस खात्यात नोकरीच्या शेवटच्या काही वर्षात तिची नेमणूक झाली. १९६२ साली वयाच्या चाळीशीची दोन घरं उलटल्यानंतर जेम्सची 'कव्हर हर फेस ' ही पहिली कादंबरी प्रकाशित झाली. अर्थात त्याची जडणघडण प्रक्रिया केव्हा सुरू झाली हे पाहाणे उद्बोधक.

पुढील वीस वर्षात जेम्सने अकरा कादंबऱ्या लिहिल्या. समीक्षकांची शाबासकी व वाढती लोकप्रियता असा तिचा वाङ्मयीन यशाचा आलेख. ' इनोसंट ब्लड ' या तिच्या आठव्या कादंबरीने विक्रम केला. अमेरिकन बेस्ट सेलर लिस्टमध्ये प्रथम क्रमांक, व त्याबरोबर मिळणारी जागतिक प्रसिद्धी व पैसा यांनी जेम्सचं जीवन उजळलं. आजतागायत जेम्सच्या वेगवेगळ्या पुस्तकांच्या एक कोटी प्रती अमेरिकेत खपल्या. कादंबरीप्रसिद्धीच्या निमित्ताने, तसंच व्याख्यानांसाठी जेम्स अमेरिकेच्या वाऱ्या अजूनही करते.

१९८७ साली आयुष्यभरच्या वाङ्मयीन कर्तबगारीसाठी जेम्सला कार्टिये डायमंड डॅगर हे पारितोषक देण्यात आलं. ' प्राइड फॉर अ नाइटिंगेल ' की या तिच्या चौथ्या कादंबरीला ' क्राइम रायटर्स असोसिअेशनने ' सिल्वर डॅगर देऊन गौरवलं. 'प्राइड फॉर अ नाइटिंगेल ' व 'ॲन अनसुटेबल जॉब फॉर अ वुमन' या तिच्या दोन कादंबऱ्यानी अमेरिकेतील 'एडगर ॲलन पो' पारितोषक पटकावलं. केंब्रिजच्या डाउनिंग कॉलेजची अधिछात्री, चार विद्यापीठांकडून सन्माननीय डॉक्टरेट, रॉयल सोसायटी ऑफ आर्ट, आणि रॉयल सोसायटी ऑफ लिटरेचरची फेलो, आर्ट कौन्सिलच्या वाङ्मयीन विभागाची अध्यक्ष, बीबीसीची संचालक, असे बहुविध मान – सन्मान तिला मिळाले. १९९१ साली इंग्लंडच्या राणीने तिला सरदारकी दिली. 'बॅरोनेस जेम्स ऑफ हॉलंड पार्क' म्हणून ती हाउस ऑफ लॉर्डस्‌मध्ये बसते. लंडनच्या हॉलंड पार्कमधील रिजन्सी राइस या शानदार घरात ती राहाते. दिवाणखाना खुर्ची – सोफ्याच्या आरामदायी अवकाशाने भरला आहे. सुंदर आरसे, स्टॅफोर्डशायरच्या कलापूर्ण आकृत्या दिवाणखान्याची शाही शोभा वाढवतात. पुस्तकांच्या सुरेख केसमध्ये आकर्षक बाइडिंगमधील चित्तवेधक व रंजक 'नोटेबल ब्रिटिश ट्रायल्स' पाहुण्यांचं लक्ष वेधून घेतात. याच दिवाणखान्यात पी. डी. जेम्सची मुलाखत शुशी गुप्पी यांनी १९९४ साली घेतली त्याचा हा वृत्तांत.

**मुलाखत**

चाळीशीत जेम्सने लिखाणास सुरुवात केली. पण तिला लेखक कधीपासूनच व्हायचं होतं? तुला कसं कळलं तुला लेखक व्हायचं आहे ते? व लेखक होण्यासाठी काय करावं याबद्दल तू काय विचार केला होतास? असे प्रश्न मुलाखतीत जेम्सला विचारले गेले.

जेम्सला वाटतं हे ज्ञान तिला जन्मजातच होतं. अगदी लहानपणापासून जेम्स गोष्टीवेल्हाळ. धाकट्या भावाला, बहिणीला ती जुळवून कल्पित गोष्टी सांगायची. ती जणू कल्पनेच्या जगात जगत होती. तिचं बालपणीचं वागणं व इतर लेखकांचं त्यांच्या बालपणीचं वागणं जवळ जवळ सारखं होतं असं इतर लेखकांनी तिला सांगितलं. ती स्वत:चं वर्णन स्वत:शी करताना त्रयस्थाच्या भूमिकेतून बोलायची. म्हणजे असं. "तिनं केस विंचरले, चेहरा धुतला, मग तिनं नाइट ड्रेस घातला." जणू काही जेम्स स्वत:च्या बाहेर उभी राहून स्वत:ला न्याहाळत होती. यावर जेम्स म्हणते, "हे सगळं अर्थपूर्ण होतं की नाही हे मला माहीत नाही, पण जेव्हापासून पुस्तक म्हणजे काय हे मला कळू लागलं तेव्हापासून मला लिहायचं होतं असं मला वाटतं."

सर पी. डी. जेम्सचे आईवडील साहित्यात रस घेणारे होते का, ते खूप वाचत असत का? तिच्या घरी कोणती पुस्तकं होती? या प्रश्नाचा ऊहापोह जेम्सने केला आहे.

तीन भावंडात सर पी. डी. जेम्स सर्वात मोठी. वडील देशांतर्गत महसूल खात्यात अधिकारी. तिच्या आईवडिलांचं वैवाहिक जीवन खास मिळतं जुळतं, आनंदी होतं असं नाही. वडील संकोची, अबोल, अत्यंत बुद्धिमान पण भावनेच्या बाबतीत बोथट, तर आई बुद्धीने बेताची, प्रेमळ आणि आवेगी. छोटी जेम्स वडिलांना घाबरायची. तिची धाकटी भावंडं वडिलांना घाबरत, पण वडील वृद्ध झाल्यानंतर त्यांची बुद्धिमत्ता, धिरोदात्त स्वभाव, विनोदी बुद्धी, याचं महत्त्व व मूल्य पी. डी. जेम्सला कळलं. सर पी. डी जेम्सला वाटतं तिच्याकडे व्यक्तिवैशिष्ट्ये आली आहेत ती त्या दोघांकडून. तिच्या आईवडिलांना ना वाचनाची आवड ना लेखनाची. पण जेम्सच्या यशात दोघं आनंदानं सहभागी होत. जेम्सला आजही स्मरतात त्यांच्या ऊबदार आठवणी.

जेम्सचं शिक्षण झालं केंब्रिजमधील जुन्या पद्धतीच्या मोफत सरकारी शाळेत. त्या काळी ब्रिटनमधील सरकारी शिक्षण उत्तम होतं. पण तिला सोळाव्या वर्षी शिक्षण सोडावं लागलं कारण विद्यापीठातलं शिक्षण मोफत नव्हतं. आईवडिलांजवळ विद्यापीठाची फी भरायला पैसे नव्हते. जेम्स म्हणते, "मला विद्यापीठात शिकायला आवडलं असतं पण मला नाही वाटत त्यामुळे मी अधिक चांगली लेखिका झाले असते. कदाचित उलटच घडण्याची शक्यता जास्त."

जेम्स ज्यावेळी शाळकरी मुलगी होती त्या वेळी केंब्रिज हे सुंदर व उत्साहवर्धक शहर होतं. पेशाला वाहून घेतलेले शिक्षक या शहराकडे आकृष्ट होत. जेम्सच्या सगळ्या शिक्षिका अविवाहित. पहिल्या महायुद्धात अमाप पुरुष मारले गेले म्हणून त्यांना अविवाहित राहाण्याची वेळ आली. जेम्सची एकच शिक्षिका विवाहित पण विधवा ! या सर्व शिक्षिकांनी संपूर्ण लक्ष विद्यार्थिनींवर केंद्रित केलं. जेव्हा जेम्सनं शाळा सोडली तेव्हा तिनं हल्लीच्या पदवीधरांपेक्षा जास्त शेक्सपीयर वाचला होता व महत्त्वाचे सर्व कवी वाचले होते. आजच्या विद्यापीठीय विद्यार्थ्यांचं संकुचित व मर्यादित वाचन पाहून जेम्स चकीत होते.

जेम्सच्या वडिलांच्या घरी पुस्तकांची वानवा. केंब्रिजच्या सार्वजनिक वाचनालयातून ती पुस्तकं आणायची. साहसकथेपासून जेन ऑस्टिनपर्यंत सर्व काही वाचायची. तिला आवडलेल्या

पहिल्या काही पुस्तकातील महत्त्वाचं पुस्तक म्हणजे ख्रिश्चन प्रार्थनेचं ! इतिहासाची व कालातीततेची जाण निर्माण करणाऱ्या या सुंदर भाषेतील पुस्तकानं जेम्स मोहून गेली.

जेन ऑस्टिन ही खरी प्रौढांना भावणारी लेखिका. पण जेम्सला मात्र तिची मोहिनी लहान वयात पडली. जेन ऑस्टिनकडे जेम्स का ओढली गेली याचं मार्मिक चिवेचन जेम्सनं केलं आहे. जेन ऑस्टिनच्या साहित्यातील उपरोध व तिची संरचनेवरची पकड या दोन गोष्टींनी जेम्सला जेन ऑस्टिनच्या कादंबऱ्यांकडे खेचलं. जेम्स म्हणते, "एखाद्याने वाङ्मयाला दिलेला प्रतिसाद हा एकाने दुसऱ्या माणसाला दिलेल्या प्रतिसादासारखा असतो. समजा तुम्ही मला विचारलं की या माणसातलं तुला काय रुचतं, भावतं तर मी म्हणेन त्याचं धैर्य, बुद्धी, त्याचा विनोदी स्वभाव. तसेच जेन ऑस्टिनची शैली, तिचा उपरोध मला भावतो. तिनं निर्माण केलेल्या विशिष्ट विश्वात मला अगदी स्वत:च्या घरी असल्यासारखं वाटतं. म्हणून तर मी माझ्या दुसऱ्या मुलीचं नाव जेन ठेवलं !"

जेम्सची दुसरी मुलगी जेन. तिच्या जन्माच्या वेळी लंडनवर तुफान बॉम्बफेक चालू होती. दुसरं महायुद्ध भडकत होतं. जेम्सनं चार्लेट मॅटर्निटी होममध्ये नाव घातलं होतं. पण ते धोक्याचं वाटल्यामुळे, हॅम्पस्टेड येथील एका तळघराच्या फ्लॅटमध्ये ती राहायला गेली. तिथं तिला जास्त सुरक्षित वाटलं. वर विमानविरोधी तोफांचे आवाज आणि पडणाऱ्या बॉम्बच्या कल्लोळात जेम्स तळघरात बसून जेन ऑस्टिन शंभराव्या वेळेला वाचत होती भारावून!

जॉर्ज इलियट सुद्धा तू तितक्याच चवीनं वाचलीस का? असा प्रश्न मुलाखतीत जेम्सला विचारला गेला. त्याला उत्तर देताना जेम्सनं जॉर्ज इलियटसह डिकन्स व ट्रोलॉप या दोन इंग्रजी कादंबरीकारांबद्दल स्वत:ची मतं नोंदवली आहेत.

जेम्सने जॉर्ज इलियट बऱ्याच उशिरा वाचायला सुरुवात केली. जॉर्ज इलियटची 'मिडल मार्च' ही महान कादंबऱ्यातील एक या बहुतेकांच्या मताशी जेम्स सहमत आहे. पण तिला जेन ऑस्टिनइतकं जॉर्ज इलियटचं प्रेम नाही. जेम्सनं डिकन्स वाचला. त्याची प्रतिभा तिनं जाणली. पण डिकन्स तिचा आवडता लेखक नाही. डिकन्स स्त्रियांच्या व्यक्तिरेखा निर्माण करण्यात अयशस्वी ठरला असं जेम्सला वाटतं. डिकन्सच्या स्त्रिया हे स्त्रीचं आश्चर्यकारक विडंबन आहे. त्या स्त्रिया दुष्ट, विचित्र, विरूप व इव्हिल आहेत पण ह्या वास्तव नाहीत. ट्रोलॉपच्या स्त्री– व्यक्तिचित्रणात, स्वभावचित्रणात जी तरलता, सूक्ष्मता दिसते ती डिकन्समध्ये दिसत नाही. जेम्सला वाटतं ट्रोलॉपचं स्त्रीस्वभावाचं आकलन व चित्रण चकित करणारं आहे.

जेम्सनं जेन ऑस्टिन व ट्रोलॉप यांच्यातील सूक्ष्मभेद दाखवून दिला आहे. स्त्री उपस्थित नसताना फक्त दोन पुरुष बसले आहेत असं चित्रण जेन ऑस्टिननं कधी केलं नाही, कारण ते तिच्या अनुभवापलिकडचं आहे असं जेन ऑस्टिनला वाटत असावं. तिच्या वाङ्मयात दोन पुरुषामधील संवाद स्त्रीच्या उपस्थितीत घडतो! तुलनेने ट्रोलॉपच्या वाङ्मयात दोन स्त्रियांमधील वादसंवाद सतत घडतात. उदा; 'कॅन यु फरगीव हर' या कादंबरीत ॲलिस वॅवॉसॉर व लेडी

ग्लेन कोरा पॉलीसर या दोन महिलांमधील संवाद पाहा. हा संवाद होत असताना पुरुष उपस्थित नसतो. पण हा संवााद ट्रोलॉपने स्त्रीस्वभावाला धरून तंतोतंत उतरवला आहे. हा दोन महिलांमधील संवाद नाही, स्त्रिया असं बोलणारच नाहीत, असं कोणत्याही वाचकाला वाटत नाही, इतका तो स्त्रीसुलभ झाला आहे! "ट्रोलॉप या साध्या पण कावलेल्या चेहऱ्याच्या माणसाचं, स्त्रियांच्या मानसिकतेचं ज्ञान व आकलन थक्क करणारं होतं" असं जेम्सनं म्हटलं आहे.

'दि वे वुइ लिव्ह नाऊ" या कादंबरीत ट्रोलॉपने स्त्रीहक्काबद्दलचा पहिला आवाज ब्रिटनमध्ये उठवला. त्यामुळे ट्रोलॉप हा स्त्रीमुक्तीवाद्यांचा हिरो! याबद्दल जेम्स म्हणते, "साधारणत: समकालीन वाद व विचारज्वालांच्या संदर्भात पुस्तकाचा विचार करण्याची माझी प्रवृत्ती नाही. त्यामुळे ते पुस्तक खुजं होत. पण ट्रोलॉपचं ते विशिष्ट पुस्तक ही समकालीन कादंबरी होती. त्यातील मुख्य व्यक्तिरेखा म्हणजे जणू राक्षसच! ज्यावेळी विवाह हा वैयक्तिक जीवनाच्या साफल्याचा एकमेव पर्याय अशी स्त्रीजीवनाची स्थिती होती, त्या काळातील स्त्रियांचं जीवन ट्रोलॉपने त्या कादंबरीत रंगवलं आहे."

जेम्सनं 'वॉर अँड पीस', 'ॲना कॅरेनिना' या कांदबऱ्या वाचल्या होत्या. पण इतर रशियन, फ्रेंच, लेखक तिनं वाचले नव्हते. शाळा सोडल्यानंतर लगेच नोकरी, त्यामुळे तिला भरपूर इंग्लिश लेखक वाचायला सुद्धा वेळ मिळाला नाही. हेमिंग्वे, फिटझ्गेराल्ड, जॉन ओहारा हे अमेरिकन लेखक तिने वाचले. अमेरिकी गुन्हेगारी कथालेखकांचा फक्त या साहित्यप्रकारावर नव्हे, तर कादंबरी या संपूर्ण वाङ्मयप्रकाराच्या प्रवासावर गाढ प्रभाव होता असं जेम्सला वाटतं. अमेरिकी लेखकांच्या भाषेतील जोम व जोर, त्याचप्रमाणे भाषेचा कल्पक उपयोग ही त्या प्रभावाची काही कारणं. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीचा मुख्य प्रवाहातील अमेरिकी कादंबरीवर प्रभाव पडलेला जेम्सला दिसतो.

या वळणावरून मुलाखत जेम्सने निवडलेल्या साहित्यप्रकाराकडे, म्हणजे 'क्राइम नॉव्हेल'–कडे वळली. अशा कादंबऱ्या लिहिण्याची विशेष बुद्धिमत्ता तुझ्याकडे होती म्हणून तू या प्रकारच्या लेखनाकडे वळलीस का? असा प्रश्न मुलाखतकाराने विचारला. या प्रश्नाला उत्तर देताना जेम्सने क्राइम नॉव्हेलबद्दलची स्वत:ची मते मांडली आहेत.

तथाकथित साहित्यिक कादंबरी व गुन्हेविषयक (क्राइम) कादंबरी असा भेद जास्त करत नाही. मुख्य प्रवाहातील कादंबरी (मेनस्ट्रीम नॉव्हेल) हाच शब्दप्रयोग तिला योग्य वाटतो. क्राइम नॉव्हेल वाचण्यात ती रमून जाई, त्यामुळे अशा कथा लिहाव्या का न लिहाव्या असा प्रश्न तिला पडला नाही. अशा कथा कादंबऱ्या लिहिण्यात ती यशस्वी होईल असा तिचा होरा होता. रहस्यप्रधान कथा हा लोकप्रिय प्रकार असल्यामुळे प्रकाशनासाठी तो लवकर स्वीकारला जाईल असंही तिला वाटत होतं. स्वत:च्या जीवनातील दु:खद आघाती अनुभव वापरून आत्मचरित्रात्मक पुस्तक लिहिणं हा एक पर्याय तिच्यापुढे होता. लेखनाचा पहिला प्रयत्न म्हणून तसे लिहिण्यास हरकत नव्हती. पण त्यापेक्षा तिने रहस्यप्रधान कथा लिहिणं पसंत केलं. याला आणखी दोन

कारण होती. आदि, मध्य आणि अंत असलेलं संरचित कथारूप साहित्य तिला आवडे. ज्या कादंबरीत निवेदनात्मक शैलीचा ओघ, घटनांची गती, आणि उत्कंठेची उकल आहे अशा कादंबरीची तिला आवड म्हणून तिनं रहस्यप्रधान कादंबरीची निवड केली. लेखक होण्यासाठी तिनं प्रस्थान ठेवलं. मोठ्या कष्टानं मार्ग सापडला. आयुष्यभर ज्यासाठी ती आसुसली ते दृष्टिपथात येत होतं. अशावेळी रहस्यप्रधान कादंबरी लिहिणं ही वाङ्मयीन कादंबरी लिहिण्यासाठी उमेदवारीच असं वाटून तिनं रहस्यप्रधान कादंबरी लिहिण्याचं ठरवलं. वाईट दर्जाची रहस्यप्रधान कादंबरी लिहिणं सोपं, पण चांगली रहस्यप्रधान कादंबरी लिहिणं कठीण; म्हणून तर अशा लेखनप्रयत्नाला जेम्सनं उमेदवारी म्हटलं आहे. रहस्यप्रधान कादंबरी म्हणजे एक कोडं तयार करणं इतकच नव्हे, तर एक वातावरण, पार्श्वभूमी, व्यक्तिरेखा अशा कितीतरी गोष्टी त्यात निर्माण करावयाच्या असतात. हे सर्व ऐंशी ते नव्वद हजार शब्दात बसवायचं! तिची पहिली कादंबरी यशस्वी झाली. रहस्यप्रधान कादंबरीचे संकेत व सीमांचे बंधन पाळून (सिरीयस रायटर) खरा लेखक होता येईल अशी खात्री पटल्यामुळे तिनं तशाच कादंबऱ्या लिहिणं चालू ठेवलं. अशाच कादंबऱ्यातून स्त्रीपुरुषांतल्या, माणसामाणसांतल्या संबंधांबद्दल, त्यांच्या समाजाबद्दल काही वास्तवपूर्ण लिहिता येईल असा जेम्सचा विश्वास दृढ होत गेला.

सर्व महान कादंबऱ्या या डिटेक्टिव नॉव्हेल असतात. अगदी 'क्राइम अँड पनिशमेंट' ते रॉबग्रिलेटच्या जलौझिपर्यंत असे बोर्जेसनं म्हटलं आहे. या विधानाच्या संदर्भात जेम्सला काय वाटतं ते तिनं सांगितलं आहे.

जेम्सनं या दृष्टिकोनातून कधी कादंबरीकडे बघितलं नव्हतं. बोर्जेसच्या वरील विधानात तथ्यांश आहे असं तिला वाटतं. 'हे मोठं वेधक निरीक्षण आहे' असं तिनं म्हटलं आहे. बोर्जेसचं म्हणणं तसं खरं आहे. कादंबरी हा एक कृत्रिम साहित्यप्रकार, आणि रहस्यप्रधान कादंबरी जास्तच कृत्रिम! लेखकाला घटना निवडून वेचून घ्याव्या लागतात, मग त्यांची विशिष्ट प्रकारे मांडणी करावी लागते, हे करताना स्वत:चा अनुभव वापरून हे सर्व वास्तवदर्शी होण्याची काळजी घ्यावी लागते. प्रश्नाची उकल करणं हे दोन्ही साहित्यप्रकारांचं वैशिष्ट्य. जेम्सने जेन ऑस्टिनचं उदाहरण दिलं आहे. जेम्सच्या मते जेन ऑस्टिनची 'एमा' ही लक्षणीय डिटेक्टिव कादंबरी आहे. या कथेत कथनाच्या ओघात मानवी संबंधांबद्दलचे सत्य जेनने मोठ्या शिताफीने ठिकठिकाणी पेरले आहे. उदा., 'एमा' कादंबरीत फ्रँक चर्चिल हायबरी येथे येतो. त्याचा जेन फेअरफॅक्सशी गुप्तपणे वाङ्निश्चय झालेला आहे. तिला पियानो हवा आहे. फ्रँक लंडनला केस कापण्यासाठी म्हणून जातो आणि काही दिवसात जेनकडे पियानो येतो. मानवी संबंधाच्या अशा किती तर सूचनिका जेनच्या एमामध्ये दिसतात. या कादंबरीत खून नाही, मृत्यू नाही, तरी सुद्धा कादंबरीतील फसवणूक व तपास यांचा मनोहारी लपंडाव वाचकाला खिळवून ठेवतो.

जेम्सच्या वरील विधानावर मुलाखतकाराने स्वत:चे मत मांडले. रहस्यप्रधान कादंबरीची जेम्सची व्याख्या फारच व्यापक वाटते. या विशिष्ट साहित्यप्रकाराचे काही संकेत व नियम

असतात,हा प्रकार हाताळण्यासाठी विशिष्ट प्रकारची बुद्धिमत्ता आणि मानसिकता लागते असा सर्वसाधारण समज आहे. त्याप्रमाणे डिटेक्टिव कादंबरी म्हणजे शव आलच आणि ते शव सुद्धा रहस्यमय परिस्थितीत सापडलेलं! त्या रहस्यमय परिस्थितीचा शोध व वेध या कादंबरीत घेतलेला असतो. ब्रिटनच्या आरोग्यखात्यात जेम्स काय करत होती,त्या नोकरीचा तिच्या लेखन कामावर काही परिणाम झाला का? असा प्रश्न तिला विचारला. या बाबत जेम्सने पुढील माहिती दिली आहे.

आरोग्यखात्याच्या प्रशासकीय विभागात जेम्स काम करत असल्यामुळे तिचा प्रेताशी कधीच संबंध आला नाही. परन्तु सुरुवातीपासून तिला मृत्यूबद्दल कुतूहल. मृत्यूनं तिला मोहिनी घातली होती. जेव्हा बालपणी तिनं 'हम्टी डम्टी सॅट ऑन अ वॉल/हम्टी डम्टी हॅड अ ग्रेट फॉल', हे बडबडगीत ऐकलं, तेव्हा तिला प्रश्न पडला हम्टीला कोणी ढकललं का तो पडला?

रहस्यप्रधान कथेला शवाची गरज असते असं असलं तरी तशी गरज दरवेळेला असतेच असं नाही. डोरोथी एल. सेयर्सच्या 'गॉडी नाइट' या डिटेक्टिव कादंबरीत शव नाही. अर्थात अशा कथा विरळा. साधारणत: डिटेक्टिव कादंबरी रहस्यमय मृत्यूभोवती गुंफलेली असते. हिऱ्याची अंगठी कोणी चोरली यापेक्षा खून कोणी केला याचा प्रखर भावनिक आघात असतो. डिटेक्टिव कथा कादंबऱ्या लिहिणाऱ्यांना मृत्यूबद्दल मानवसुलभ भीतियुक्त कुतूहल असते. मृत्यूला कथारूपात गुंफण्यात किंवा त्याचे बौद्धिक कोडे निर्माण करण्यात लेखक स्वत:ची मृत्यू व हिंसाचाराबद्दलची पूर्वजात भीती विस्तारित करत असतो.

रहस्यमय शव कथेच्या सुरुवातीला आणायचं व त्याभोवती कथा रचायची असं तू करतेस का? या प्रश्नाचं उत्तर देताना जेम्स म्हणते, "नाही, मी तसं करत नाही. पण अशा तऱ्हेने कथा निर्माण करण्याची पद्धत आहे." यासाठी जेम्सनं एक उदाहरण दिलं आहे. चापाचा चष्मा लावलेल्या नग्न शवाने डोरोथी एल सेयर्सच्या 'व्हूज बॉडी' या कथेची सुरुवात होते. जेम्सच्या 'श्राउड फॉर अ नाइटिंगेल' या कादंबरीची सुरुवात कोणाचा तरी खून करण्याच्या कल्पनेतून होते. ज्यावेळी जेम्सने एका रुग्णाला तोंडातील नळीवाटे भरवताना बघितलं त्यावेळी तिला वाटलं या पद्धतीनं खून करता येईल, दुधाऐवजी विष देऊन आणि तसा खून तिनं केला अर्थात कथेत! पण जेम्सच्या कल्पनेची ठिणगी उडते ती एखादी विशिष्ट परिस्थिती बघून.

मग ही विशिष्ट परिस्थिती तुला कशी मिळते, योगायोगानं का कल्पनेच्या भरारीत?का चित्रपट दिग्दर्शक आजुबाजूची संभाव्य स्थानं शोधतो त्याप्रमाणे? या प्रश्नांच्या उत्तरात जेम्सनं स्वत:च्या निर्मितीप्रक्रियेवर प्रकाश टाकला आहे.

जेम्स मुद्दाम विशिष्ट परिस्थिती शोधत फिरत नाही. एक पुस्तक लिहून झाल्यावर लगेच दुसऱ्या पुस्तकाची सुरुवात झालीच पाहिजे असं तिला वाटत नाही. ऊर्मीची वाट बघत ती थांबते मग कितीही वेळ लागो. मनाची कवाडं उघडी ठेवून ती ऊर्मीच्या स्वागतास सज्ज असते. कल्पनाशक्तीला आवाहन करणारी विशिष्ट परिस्थिती भेटेल या वेड्या आशेने ती उगाचच

भटकत नाही. सगळं घडतं ते योगायोगानं. 'डिव्हायसेस अँड डिझायर्स ' या तिच्या कादंबरीला पार्श्वभूमी लाभली आहे इंग्लंडच्या पूर्व किनारपट्टीची. हे कसं घडलं ते जेम्सनं सांगितलं आहे. ती एकदा इंग्लंडच्या पूर्व किनारपट्टीवरील सफॉक गावी गेली होती, सुटी घालवायला. शंखशिंपल्यांनी भरलेल्या किनाऱ्यावर ती उभी होती. समोर बोचऱ्या थंड पाण्याचा उग्र अॅटलांटिक पसरला होता. दोन मच्छीमार बोटी किनाऱ्याला लागल्या. जाळी वाळत पडली होती. ती हजार वर्षे तेथे उभी राहिली असली तरी ते दृष्य बदलणार नाही, बोटी, जाळी आणि किनारा. तिच्या मनात विचार येऊन गेला. मग तिची नजर गावाकडे वळली. न्युक्लीअर पॉवर स्टेशनचे दोन आक्राळ विक्राळ आकार तिला दिसले. त्या भागातून फिरताना दिसलेले काळानं उद्ध्वस्त केलेले धर्मगुरूंचे मठ, नष्ट होत चाललेल्या श्रद्धेची प्रतीकं, जुन्या मोडक्या वायुचक्क्यांची आता झालेली घरं. एका बाजूला काळानं हात फिरवलेलं दृष्य, तर दुसरीकडे कालातीत दृष्य! त्यावेळी तिनं नक्की केलं, तिची पुढची कादंबरी याच सागरतीराच्या पार्श्वभूमीवर उभी राहाणार आणि त्या कादंबरीत अणूशक्तीनं निर्माण होणाऱ्या भयावह प्रश्नाचं कथानक असणार. ऊर्मीच्या उगमाचा क्षण बेहोषीचा, कारण त्याचवेळी जेम्सला कळतं की तिच्या मनात पुस्तकाचा जन्म झाला आहे, मग पुस्तक प्रत्यक्षात यावयास कितीही वेळ लागो!

कथानकाचा शोध लावणंच कठीण असतं हे बरेच आधुनिक कादंबरीकार व नाटककार मान्य करतात. टॉम स्टोपार्डसारखा लेखकासुद्धा असं म्हणतो. त्यामुळे बरेच लेखक ज्यात कथानक नाही अशी कादंबरी लिहितात. अशा कादंबरीत विशेष काही घडत नाही. पण रहस्यप्रधान कथेमध्ये कथानक (प्लॉट) हेच सर्वस्व असतं. विशिष्ट परिस्थिती सापडल्यानंतर तू कथानक कसं तयार करतेस? विशिष्ट परिस्थती मिळाल्याबरोबर तू लिहायला सुरुवात करतेस का? जेम्सनं उदाहरणं देत हा मुद्दा विषद केला आहे.

विशिष्ट परिस्थिती मिळाली की जेम्स लिखाणाला सुरुवात करत नाही. मधे कितीतरी महिने जातात. जेम्सला वाटतं बऱ्याच लेखकांना कथानक कसं रचावं हेच समजत नाही. काही लेखकांना कथानक रचण्याची कला असते. पण ते मुद्दाम तसं करत नाहीत कारण त्यांना आपण वेगळे आहोत हे दाखवण्याची इच्छा असते. इंग्लिश कथारूप साहित्यात समर्थ कथनात्मक परंपरा आहेत. गतकाळातील इंग्लिश कादंबरीकारांजवळ ती कला होती. कथानकाशिवाय पुस्तक लिहिणं सोपं असतं असं जेम्सला वाटतं. तिचा कथानकावर पूर्ण विश्वास आहे. १९३०चा काळ हे रहस्यप्रधान कथांचं सुवर्णयुग. त्याकाळी कथानक हेच सर्वस्व होतं. वाचकांना त्या काळी हवं होतं नित्य नूतन कल्पक कथानक. नुसता साधासुधा खून नव्हे तर अत्यंत कपट कारस्थानानं व असामान्य चलाखपणाने केलेला खून! त्या काळच्या कथेत प्रेतं सापडायची ती खिडकीदारं लावलेल्या बंद खोलीत आणि प्रेताच्या चेहऱ्यावर असायचा भेदरलेला भाव. अॅगाथा ख्रिस्तीचं उदाहरण घ्या. तिच्या कथानकात कल्पकतेची परमावधी झालेली दिसते. व्यक्तिचित्रणातील सूक्ष्मता, कथेचा प्रेरक हेतू , किंवा प्रायोजकता आणि उत्तम शैली याचा विचार त्याकाळी कोणी

करत नसे. त्याकाळची रहस्यप्रधान कादंबरी म्हणजे वाङ्मयातील पत्त्याची जादू. पण आज रहस्यप्रधान कादंबरी मुख्य प्रवाहातील कादंबरीच्या समीप येत आहे. अर्थात कथानक आजही हवंच आहे.

जितका वेळ जेम्सला व्यक्तिचित्रणाला लागतो तितकाच वेळ तिला कथानकनिर्मितीला लागतो. कधीकधी जास्त सुद्धा. एकदा विशिष्ट परिस्थिती हातात सापडली, मग जेम्स कथेतील भागांशी जणू काही संपर्क साधायला सुरुवात करते. कथेतील सूचक धागे हळुहळू जुळत जातात. कथा आकार घेते. 'डिवायसेस अँड डिझायर्स' या कादंबरीसाठी तिनं पंधरा वह्याभरून नोंदी केल्या. ती परत त्या सागरकिनारी गेली. तिकडचं आकाश, निसर्गदृश्य, वास्तुशिल्पं, आणि तेथील गावकरी या सर्वांबद्दलची तिने टिपणं केली व त्यातूनच कादंबरीची निर्मिती झाली. जेम्स म्हणते, "खरचं कादंबरी लिहिणं ही एक चमत्कृतीयुक्त प्रक्रिया. कथेतील व्यक्ती माझ्या नियंत्रणाबाहेर कुठं तरी अधांतरी फिरत असतात, आणि कादंबरीच्या महिनोन महिन्यांच्या जनन काळात मी त्यांचा शोध घेत असते, त्यांच्याशी संपर्क शोधत असते, त्यांना जाणून घेण्याचा प्रयत्न करत असते."

काही कादंबरीकार म्हणतात, "आमच्या कादंबरीचा शेवट काय होणार हे आम्हालाच ठाऊक नसतं. पण डिटेक्टिव कादंबरीत मात्र कादंबरीकाराला शेवट काय व कसा होणार हे ठाऊक असतं, कारण कादंबरीचा आरंभ होतो रहस्यमय प्रेतानं व त्या रहस्याचा उलगडा कादंबरीकाराला करायचा असतो, असं मुलाखतकारानं म्हटल्यावर जेम्सनं स्वतःची मतं मांडली आहेत.

जेम्सच्या मते क्राइम कादंबरी व डिटेक्टिव कादंबरी यात भेद आहे. डिटेक्टिव कादंबरी सुव्यवस्थित बांधणीची. त्यात रहस्य सोडवण्याचे तार्किक सूचक धागेदोरे असतात. हा एक बौद्धिक साहित्यप्रकार. यात लेखकानं केलेला रहस्याचा उलगडा तर्कसंगत असलाच पाहिजे म्हणून लेखकाला कादंबरीचा शेवट आरंभालाच ठाऊक असायला हवा.

क्राइम कादंबरीचा पट विस्तीर्ण व व्यापक आहे. ॲगाथा ख्रिस्तीच्या कादंबऱ्यांपासून, विल्की कॉलीन्स, ट्रोलॉप (दि युस्टॅस डायमंड), डिकन्स (दि मिस्ट्री ऑफ एडविन ड्रुड), ग्रहॅम ग्रीनच्या हेरगिरीच्या कांदबऱ्या, डॉस्टोएवस्कीची 'क्राइम अँड पनिशमेंट,' 'ब्रदर्स कॅरामझॉव' या सर्व कांदबऱ्या जेम्सच्या मते क्राइम कांदबऱ्यात मोडतात. डिटेक्टिव कादंबरी हा क्राइम कादंबरीचा उपप्रकार. अमेरिकन याला 'मिस्ट्री नॉवेल' म्हणतात. जेम्सला मिस्ट्री नॉवेल हे नाव सार्थ वाटतं. क्राइम कादंबरीत वाचकाला गुन्हा कोणी केला हे माहीत असतं पण कुतूहल असतं हा गुन्हेगार पकडला जाईल का, कसा पकडला जाईल यात! गुन्हेगारावर तसंच त्याच्या निकटवर्तीयांवर, व समाजावर गुन्ह्याचा कोणता परिणाम झाला हे पण कादंबरीत दाखवलेलं असतं. ग्रॅहॅम ग्रीनची 'ब्रायटन रॉक' ही क्राइम नॉवेल ठरेल, पण त्याच्यात रहस्य (मिस्ट्री) नाही म्हणून ती डिटेक्टिव नॉवेल होत नाही. या कादंबरीत पिंकी व त्याची रखेली (मिस्ट्रेस) यांच्यामधील संबंध, त्याचे

ईश्वरशास्त्रीय (थिऑलॉजिकल) पैलू याबद्दलचे चित्रण आहे. डिटेक्टिव कादंबरी ही क्राइम कादंबरीपेक्षा मर्यादित असते हा महत्त्वाचा मुद्दा.

डिटेक्टिव कादंबरीतील मध्यवर्ती व्यक्तिरेखा म्हणजे डिटेक्टिव. लेखकाच्या कादंबरीतून तो पुन्हा पुन्हा येतो व वाचकाच्या परिचयाचा, आवडीचा बनतो. एकदा निर्माण केल्यानंतर लेखक या डिटेक्टिवच्या जीवनप्रवासाचा साक्षी असतो. हा डिटेक्टिव वयाने जसजसा मोठा होत जातो, प्रेमात पडतो, तसतसे त्याच्या स्वभावात बदल होतात. जेम्सचा डिटेक्टिव स्कॉटलंड यार्डचा कमांडर ॲडॅम डॅलग्लिअेश! याचा शोध तू कसा लावलास? त्याचं नाव तुला कसं सुचलं? हा डिटेक्टिव तुझीच पुरुषी प्रतिकृती आहे का? या प्रश्नांची दिलखुलास उत्तर जेम्सनं दिली आहेत.

मेसी डॅलग्लिअेश ही स्कॉटिश महिला जेम्सची इंग्लिशची शिक्षिका. अगदी सर्वसामान्य नाही आणि अगदी वेगळं नाही असं नाव जेम्सला तिच्या डिटेक्टिवसाठी हवं होतं. डॅलग्लिअेश हे नाव तिला तसं वाटलं. जेम्सनं त्याचं पहिलं नाव ॲडॅम ठेवलं आणि गंमत म्हणजे बरेच वर्षानंतर तिची शिक्षिका मेसी डॅलग्लिअेश म्हणाली, "तिच्या वडिलाचं नाव ॲडॅम होतं!" हा योगायोग. जेम्सनं निर्मिलेला डिटेक्टिव ही तिची पुरुषी प्रतिकृती नाही असं जेम्सनं सांगितलं आहे. पण ज्या व्यक्तिविशेषाबद्दल तिला कौतुक आहे. ते गुण तिनं तिच्या डिटेक्टिवमध्ये ओतले आहेत. एखादी व्यक्तिरेखा लेखकाच्या पुनरावर्ती पुस्तकात येणारी असेल तर ती लेखकाला आवडेल अशी हवी, कारण त्या व्यक्तिरेखेबरोबर लेखकाला बरीच वर्ष काढायची असतात, असं जेम्सला वाटतं. १९३०च्या डिटेक्टिव कादंबऱ्यांवरून लेखकांनी धडा घेण्यासारखा आहे. ॲगाथा ख्रिस्तीनं टोकदार मिशा असलेल्या गमतीदार बेल्जियन डिटेक्टिव तयार केला, पण त्याचा पुढचा प्रवास पाहिला म्हणजे ॲगाथा ख्रिस्तीला असा डिटेक्टिव निर्माण केल्याबद्दल खेद झाला असेल. औदार्य, अनुकंपा, उत्तम बुद्धिमत्ता या गुणविशेषांबद्दल जेम्सला आदर म्हणून हेच गुण असलेला डिटेक्टिव निर्माण करावा असं तिला वाटलं!

हे सर्व गुण तुझ्यात आहेत असं सर्वजण म्हणतात नाही का? एक दिवस तू या डॅलग्लिअेशला सोडून दिलसं आणि कॉर्डेलिया ग्रे ही महिला डिटेक्टिव आणलीस. स्त्रीमुक्तिवादाची झळ डिटेक्टिव कादंबरीला लागली असं म्हणायचं का?

या प्रश्नाचं उत्तर नाही असं देऊन, जेम्सनं त्याचं स्पष्टीकरण दिलं आहे. महिला डिटेक्टिव आणणं ही त्या विशिष्ट कथेची गरज होती. जेम्सला ती कादंबरी केंब्रिज या प्रेमनगरीत उभी करायची होती. त्या कथेत एका विद्यार्थ्याचा खून झाला आहे, वरकरणी आत्महत्या वाटावी या तऱ्हेनं. विद्यार्थी प्रसिद्ध वैज्ञानिकाचा मुलगा. हे रहस्य एखाद्या तरुण डिटेक्टिवनं उलगडावं असं जेम्सला वाटतं. लेखकाच्या मनात अशा कल्पना एकदम का येतात हे मात्र गूढ असं जेम्स म्हणते! स्वतंत्र वृत्तीची, सुरेख, घिटुकली, तरुण कॉर्डेलिया यासाठी निर्मिली. तिच्या बॉसकडून डबघाईला आलेली डिटेक्टिव एजन्सी तिला मिळाली. ही अेजन्सी पुन्हा उभी करायचं आव्हान

तिच्यापुढे आहे. म्हणून कादंबरीचं शीर्षक 'ॲन अनसुटेबल जॉब फॉर अ वुमन'. केंब्रिजमधील प्रख्यात वैज्ञानिकाच्या मुलाच्या खुनाची केस हीच तिची पहिली केस. कोरोनरच्या प्राथमिक तपासात आत्महत्या असा निर्णय येतो. पण मुलाच्या बापाला सतत वाटतं हा खून आहे, तो का झाला हे त्याला जाणून घ्यायचं असतं. डिटेक्टिव कॉर्डेलियाकडे ही केस घेऊन मुलाचा बाप येतो. आत्महत्या ही फसवाफसवी आहे हे कॉर्डेलिया शोधून काढते व हा खून आहे हे सिद्ध करते.

अमेरिकी डिटेक्टिव कथात बऱ्याच प्रसिद्ध महिला डिटेक्टिव आहेत आणि त्या ॲगाथा ख्रिस्तीच्या मिस मार्पल्सारख्या हौशी नसून अत्युत्तम व्यावसायिक आहेत. या महिला डिटेक्टिव पिस्तुल बाळगतात, बाहेर मिळणारं हॅम्बर्गर खातात, त्या घरेलु नसतात, असे मुलाखतकारांनी मांडल्यानंतर जेम्सनं त्यावर आणखी माहिती दिली आहे.

विशेषत: अमेरिकी लेखकांनी व्यावसायिक खाजगी डिटेक्टिव निर्मिल्या आहेत. खाजगी डिटेक्टिवना प्रायवेट आइज् (Private eyes) म्हणतात. या खाजगी महिला डिटेक्टिव हिंसक विश्वात वावरतात, पुरुष डिटेक्टिवप्रमाणे पिस्तुल बाळगतात. पण इंग्लंडमध्ये खाजगी डिटेक्टिवना पिस्तुल बाळगण्याची परवानगी नसते. कॉर्डेलिया ही जेम्सची वीस वर्षापूर्वीची निर्मिती. तिच्याजवळ पिस्तुल नाही. पिस्तुलधारी कॉर्डेलिया वास्तवाला धरून दिसली नसती.

डेविड हॅमेट व रेमंड चँडलर यांचा डिटेक्टिव हा एकांडा शिलेदार. तो पोलिसांच्या विरुद्ध दिशेनं काम करतो. त्याला गुन्हेगारांइतकाच पोलिसांकडून धोका. कारण पोलिसांना त्यांचं काम पसंत पडलं नाही तर त्याचा डिटेक्टिवगिरीचा परवाना जायचा! अशा डिटेक्टिव लेखनातील गमताजमती जेम्सनं मुलाखतीच्या ओघात सांगितल्या आहेत.

स्त्रीवादी चळवळ व वाङ्मयातील महिला डिटेक्टिवचा उदय याचं काही लेणं देणं आहे असं तुला वाटतं?

जेम्स म्हणते, "हो हे संभाव्य आहे. हे पण लक्षात ठेवायला हवं की या वास्तववादी कथा आहेत. समाजामध्ये खाजगी डिटेक्टिवना यशस्वी व्हायचं असेल तर त्यांना व्यावसायिक होणं जरुरीचं ठरतं."

तू म्हणतेस त्याप्रमाणे तू जुन्या जमान्यातील, जुन्या पिढीची लेखिका. तू तुझं वर्णन स्त्रीवादी म्हणून करशील का? याला दिलेल्या उत्तरात जेम्सनं स्त्रीवादाचा तिला अभिप्रेत असेलला अर्थ सांगितला आहे.

जेम्सच्या मते 'स्त्रीवादी' म्हणजे एक खूणचिठ्ठी (लेबल)! स्त्रियांना समान संधी, समान पगार मिळावा, समान वागणूक मिळेल असा समाज असावा, स्त्रियांशी सर्वांचा व्यवहार उचित असावा येथपर्यंत जेम्स स्वत: स्त्रीवादी आहे. तिला स्त्रियांबद्दल आपुलकी आहे. जहाल स्त्रीवादी महिला पुरुषांच्या विरुद्ध असतात आणि आपण स्त्री आहोत हेच त्यांना आवडत नाही. स्त्रीवादाच्या या टोकाला जेम्स जात नाही. काही मूलभूत प्रश्नांना सोपी उत्तरं नसतात असं तिला वाटतं. स्त्रीची

जैविक जडणघडण मुलं होण्याच्या दृष्टीने झाली आहे. मुलांना बालपणी मातेची नितांत गरज असते. त्यामुळे पुरुषांप्रमाणे स्त्रीला शैक्षणिक व व्यावसायिक प्रगतिपट समानतेने साधता येत नाही. आजच्या स्त्रीला तिच्या आई-आजीपेक्षा जास्त खडतर जीवन जगावं लागतं,जरी आज स्त्री-पुरुष समानता असली तरी सुद्धा! पूर्वी कुटुंब मोठी होती,चांगल्या दाया होत्या. आजच्या स्त्रीला अशी मदत मिळत नाही. आज स्त्रीला तारुण्यात व्यावसायिक व शैक्षणिक संधी उपलब्ध असतात पण त्याच काळांत मुलांचं नुकसान न होता त्या संधींचा पुरेपूर फायदा उठवणं स्त्रीला कठीण जातं. त्यामुळे स्त्रीची मानसिक व शारीरिक ओढाताण होते. एका बाजूला नोकरी सांभाळायची तर दुसऱ्या बाजूला कुटुंब. अगदी तारेवरची कसरत असते स्त्रीची. कोणीतरी घर चालावयाला हवं. नवऱ्यानं घरकामात कितीही मदत केली तरी स्त्री हे कुटुंबाचं हृदय अशी जेम्सची भावना आहे. काय सोडावं काय धरावं हा निर्णय घेणं कठीण. मुलं शाळेत जायला लागेपर्यंत नोकरी सोडून काही वर्षं घरी राहावं हा निर्णय घेणं सोपं नाही. बरेच वेळा तथाकथित स्वातंत्र्याच्या भावनेपोटी स्त्री स्वतः नोकरी करून पैसे कमावते व ते पैसे मुलांकडे बघण्यासाठी ठेवलेल्या व्यक्तीला देण्यात खर्च करते. मातेऐवजी तीच व्यक्ती मुलांचा आनंद उपभोगते!

आता आपण परत तुझ्या लेखनविषयाकडे वळूया, असे म्हणत मुलाखतकारानं विचारलं,डिटेक्टिव कथा लिहायला लागण्याआधी तू कोणते डिटेक्टिव लेखक चवीनं वाचत होतीस?

यावर जेम्सनं वाचनाबद्दलच्या स्वतःच्या आवडीनिवडी सांगितल्या आहेत. डोरोथी एल् सेयर्स,नॅगीओ मार्श,जोसेफिन टे,या डिटेक्टिव लेखिका वाचणे ती पसंत करी. रूथ रेंडॉलच्या डिटेक्टिव कथा तिला आवडतात. रूथ रेंडॉल, क्राइम नॉवेल 'बार्बरा वाइन' या टोपणनावाने लिहिते. जेम्स तिच्या क्राइम नॉवेल्स वाचणं जास्त पसंत करते. पण आता जेम्स फारशा क्राइम नॉवेल वाचत नाही. आता तो साहित्यप्रकार तिच्या अत्यंत आवडीचा नाही!

तू बऱ्याच डिटेक्टिव लेखकांचा निर्देश केला आहेस. पण दोन महत्त्वाच्या लेखकांबद्दल तुला विचारायचं. त्यातील पहिला सर आर्थर कॉनन डॉयल, शेरलॉक होम्सचा निर्माता. – मुलाखतकार.

जेम्सच्या मते सर आर्थर कॉनन डॉयलचा प्रत्येक क्राइम रायटरवर प्रभाव असतोच. काही वेळा हा प्रभाव अंतर्मनाच्या स्तरावर असतो एवढेच. सर आर्थरने गुन्हेविषयक लिखाणाला, तर्कसंगत विचारसरणी व मूर्त बुद्धिवादाचा वारसा दिला. या दोन्ही गोष्टींचा गुन्हेविषयक लेखकांनी आदर केला पाहिजे हेच जणू दाखवून दिलं. कथा सांगण्याची हातोटी, तसेच विनिर्दिष्ट व विभिन्न विश्व निर्माण करण्याची क्षमता या देणग्या सर आर्थरकडून या साहित्यप्रकाराला मिळाल्या. शेरलॉक होम्स हा हौशी (अमॅच्युअर) व जगप्रसिद्ध झालेला पहिला डिटेक्टिव. त्याचा निर्माता म्हणून सर आर्थर कॉनन डॉयलचे साहित्यातील स्थान अढळ आहे. सर आर्थरने गुन्हेविषयक लिखाण लोकप्रिय केलं. सर आर्थरने या साहित्यप्रकाराला दिलेलं महत्त्वाचं योगदान म्हणजे

गुन्हेविषयक लिखाणाला मिळवून दिलेली लोकप्रियता जी आजतागायत तसूभरही कमी झालेली नाही.

आणि जॉर्जेस् सिमेनॉन? हा लेखक तू खूप वाचला आहेस का? मुलाखतकारानं विचारलं.

जेम्सला या लेखकाचं खूप कौतुक आहे. कोणतेही निकष लावले तरी जॉर्जेस् सिमेनॉन हा चांगला कादंबरीकार. त्याचं मानवी मानसिकतेचं व विशेषत: गुन्हेगाराच्या मानसिकतेचं आकलन विलक्षण. त्याची लेखनपद्धती मात्र क्राइम रायटरच्या दृष्टीनं अनन्यसाधारण आहे. तो त्याच्या कादंबरीची रचना पूर्वतयारीनं करत नाही असं त्यानेच सांगितलं आहे. त्याच्या व्यक्तिरेखांची नावं तो आंतरराष्ट्रीय टेलिफोन डिरेक्टरीमधून काढतो व त्यांना कादंबरीतील विशिष्ट प्रसंगात बसवतो आणि त्यानंतर त्या व्यक्तिरेखाच कथानकाचा कब्जा घेऊन कादंबरी घडवतात. अर्थात डिटेक्टिव कादंबरी लिहिण्याची ही संयुक्तिक पद्धत नव्हे. कारण अभिजात गुन्हे शोधण्यासाठी काळजीपूर्वक ज्या सूचनिका निर्माण कराव्या लागतात त्याच्याशी ही पद्धत जुळणारी नाही. जेम्सच्या दृष्टीनं जॉर्जेस सिमेनॉन हा उत्तम क्राइम रायटर आहे पण तो मूळचा डिटेक्टिव लेखक नाही!

असं म्हणतात की विशेषत: स्त्रिया डिटेक्टिव कथा लिहिण्यात तरबेज असतात. याला कोणती कारणं असावीत? स्त्रिया या जास्त अंत:स्फूर्त, सूक्ष्म-निरीक्षक व सहानुभूतीपूर्वक विचार करण्याऱ्या असतात, म्हणून का? असे सवाल मुलाखतकाराने जेम्सला केले.

त्यावर जेम्स म्हणते, "हो हे खरच आहे. निगुतीनं निर्मिलेल्या सूचक धाग्यांची वीण असलेल्या पारंपारिक डिटेक्टिव कथा लिहिण्यात स्त्रिया प्रवीण. पण मारामारीच्या, वेगवान घटनांच्या, हिंसक गुन्ह्यांच्या कथा हे मात्र पुरुषाचं क्षेत्र! डिटेक्टिव कथेतील सूचनिका (क्लूज) तयार करण्यासाठी रोजच्या व्यवहारातील सूक्ष्म तपशीलाकडे लक्ष पुरवणं जरुरीचं असतं. सूक्ष्म तपशील हुडकून काढण्याची नजर स्त्रीला लाभलेली असते. स्त्री चांगली कथालेखिका होण्याचं हे एक महत्त्वाचं कारण. जॉर्ज ऑरवेल म्हणतो, "खून हा अनन्य गुन्हा आहे. ज्यामुळे तीव्र भावना उफाळून आल्या पाहिजेत. स्त्रियांना शस्त्रास्त्रांपेक्षा या तीव्र भावना वेधक वाटतात. डिटेक्टिव् कथेची सुनिश्चित रचना स्त्रियांना भयावह घटना हाताळण्यासाठी आधारभूत ठरते. या साहित्य प्रकाराच्या चौकटीबाहेर त्याच भावना स्त्रियांना क्लेशदायक असतात."

ज्यावेळी जेम्सने पहिली कादंबरी लिहिली व ती प्रकाशनासाठी स्वीकारली गेली याचं तिला आश्चर्य वाटलं का? असा प्रश्न मुलाखतरकारानी केला.

जेम्सला याचं आश्चर्य वाटलं नाही पण आनंद जरूर झाला. जर तिनं पुस्तक लिहून पूर्ण केलं तर ते प्रकाशित होईल याची तिला खात्री होती. फाबर अँड फाबर या पहिल्याच प्रकाशकाकडे तिनं हस्तलिखित पाठवलं व ते स्वीकारलं गेलं. ही प्रकाशनसंस्था तिची कायमची झाली. कितीतरी चांगल्या कांदबरीकारांच्या टेबलावर 'साभार परतच्या' चिठ्ठ्या पडलेल्या असतात. जेम्स स्वत:ला नशीबवान समजते.

पहिल्या पुस्तकाच्या यशामुळं जेम्सला उत्तेजन मिळालं आणि ती लिहीत राहिली. अकरा डिटेक्टिव कादंबऱ्या लिहिल्यानंतर १९९३ साली तिनं 'चिल्ड्रेन ऑफ मेन' ही कादंबरी लिहिली. भविष्यकाळाबद्दलची नीतिवादी तात्पर्यकथा असं या कादंबरीचं वर्णन करता येईल का? असा प्रश्न जेम्सला विचारला.

या कादंबरीचं वर्णन भविष्याबद्दलची नीतिवादी तात्पर्यकथा असं करणं जेम्सला योग्य वाटतं. ती या कादंबरीचा विचार विज्ञानकथा म्हणून करत नाही. काहींनी 'चिल्ड्रेन ऑफ मेन' ला विज्ञानकथा म्हटलं आहे. खरं पाहता नीतिकथा लिहिणं हाही जेम्सच्या उद्देश नव्हता, पण आपोआप तसं घडून आलं. या कादंबरीची जन्मकथा जेम्सनं सांगितली आहे. एखाद्या विशिष्ट परिस्थितीनं या वेळेस जेम्सला लिहिण्याची स्फूर्ती दिली नव्हती. एका विज्ञानविषयक पुस्तकाचं परीक्षण ती वाचत होती. पाश्चिमात्य पुरुषांच्या वीर्यातील शुक्रजंतूंचे प्रमाण आश्चर्यकारकरीत्या कमी होत असून गेल्या पन्नास वर्षात ते पन्नास टक्क्यांनी कमी झालं आहे असं त्या पुस्तकात लिहिलं होतं. जेम्सनं काही वैज्ञानिकांना याबद्दल विचारलं. कदाचित प्रदुषणामुळे असं घडत असेल असं वैज्ञानिकांनी तिला सांगितलं. त्या निबंधात आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला होता. पृथ्वीवरील जीवसृष्टीत कोट्यावधी जीव होते आणि आता त्यातील बरेच जीव नष्ट झाले आहेत. भूतलावरून नष्ट होणं हा सुद्धा मानवजातीचा नैसर्गिक अंत आहे. मानवाचं भूतलावरील अस्तित्व म्हणजे काळाच्या पापणीची एक उघडझाप! या सर्व विचारांनी जेम्स प्रभावित झाली. जगातील शेवटचं मूल जन्मल्यावर पंचवीस वर्षानंतरचं इंग्लंड कसं असेल, आणि पुढची आणखी पंचवीस वर्ष मुलाच्या जन्मवेळचं रडणं कोणाच्या कानावर पडलचं नाही असं घडलं तर– जेम्स म्हणते, "आणि मी बैठक मारून लिहायला सुरुवात केली. या कादंबरीत खून आहे. तरीसुद्धा ही डिटेक्टिव कथा नाही. ती एक नीतिवादी तात्पर्यकथा आहे. माझ्या इतर सर्व कादंबऱ्यांपेक्षा अगदी आगळी-वेगळी!"

लोकसंख्येचा विस्फोट हा जगापुढील गडगंज प्रश्न, पाश्चिमात्य पुरुषाच्या वीर्यातील शुक्रजंतूचे प्रमाण कमी होणे हा नव्हे. शुक्रजंतूचे प्रमाण कमी होणे ही एक इष्ट घटना म्हणावी लागेल. तुला नाही असं वाटतं? मुलाखतकारानं विचारलं.

जेम्स उत्तरादाखल म्हणते, "हो मला ठाऊक आहे. भारत लोकसंख्या विस्फोटाला तोंड देऊ शकत नाही. चीन लोकसंख्येवर नियंत्रण आणण्याचा जोरदार प्रयत्न करत आहे पण कोणती किंमत मोजून? आफ्रिकेत अेडस् व दुष्काळ यानं माणसं मरत आहेत. पण पाश्चिमात्य देशात जननप्रमाण धडाक्यानं खाली येत आहे. तेव्हा मानवानं त्याचं ज्ञान वापरून जननक्षमतेचं योग्य विनियमन केलं पाहिजे, नाहीतर मानवजात नष्ट होण्याच्या सावटाखाली राहील.

'ओरिजिनल सिन' (Original Sin) ही तिची त्यानंतरची कादंबरी. अॅडॅम डॅलग्लिअेश हा डिटेक्टिव या कादंबरीत पुन्हा अवतरला. जेम्स परत जुन्या साहित्यप्रकाराकडे का वळली? तिच्या वाचकांना डॅलग्लिअेश परत हवा होता का?



अनुक्रमणिका

'चिल्ड्रेन ऑफ मेन' ला चांगलं यश मिळालं.बेस्ट सेलर यादीत कादंबरी सहाव्या क्रमांकावर पोचली. लोकांनी त्याला उत्तम प्रतिसाद दिला. पण सगळ्यांना डॅलग्लिअेशची अनुपस्थिती जाणवत होती. जेम्सने या डिटेक्टिवला कायमची रजा दिली असं त्यांना वाटत होतं. म्हणून जेम्सने डॅलग्लिअेशला परत आणलं असं नाही. त्याला परत का आणलं याचं कारण जेम्सने दिलेलं नाही.

'ओरिजिनल सिन' ची कथा घडते लंडनमध्ये. प्रकाशनव्यवसायाच्या जगात. थेम्स नदीच्या तीरावर. या कादंबरीतून वाहाणारी नदी म्हणजे कथेच्या आशयसूत्राचा एकीकरण करणारा प्रवाह. या कादंबरीत डॅलग्लिअेशला मदत करते व्यावसायिक महिला डिटेक्टिव केट मिस्कीन. केट मिस्कीन ही जेम्सची डिटेक्टिव 'अ टेस्ट फॉर डेथ' या कादंबरीत प्रथम आली. ओरिजिनल सिनची रूपरेखा पुढीलप्रमाणे. हेन्री पेवेरेलचा नुकताच मृत्यू झाला आहे. त्याचवेळी त्याचा भागीदार जीन फिलीप एटेन निवृत्त होतो. एटेनचा मुलगा जेरार्ड प्रकाशनसंस्थेचा अध्यक्ष व कार्यकारी संचालक होतो. जेरार्ड स्वभावाने निर्घृण. त्याने बरेच शत्रू निर्माण केले. त्याने टाकलेली रखेली ही त्यातली एक. मानहानी झालेला व उपेक्षिलेला लेखक, जेरार्डचे सहकारी, धाकदपटशा दाखवलेला कंपनीचा कर्मचारीवर्ग हे सर्व जेरार्डचे शत्रू. जेरार्ड त्याच्या घरी मृतावस्थेत सापडतो, त्याच्या शरीरावर बरेच आघात झालेले आढळतात. ज्यांच्यावर खुनाचा संशय आहे अशा बऱ्याच व्यक्ती आजुबाजूला आहेत. मग खून कोणी केला?

ओरिजिनल सिन हे शीर्षक का? पुस्तकाची शीर्षकं तुला महत्त्वाची वाटतात का? मुलाखतकार.

जेम्सला पुस्तकाची शीर्षकं महत्त्वाची वाटतात. तिला वाटतं योग्य शीर्षक शोधून काढणं महत्वाचं असतं. कधी कधी जेम्सला शीर्षक पुस्तकाच्या सुरुवातीलाच सुचतं आणि प्रश्न सुटतो. कधी कधी शीर्षक सुचत नाही, बराच काळ जातो आणि मोठ्या प्रयासानं शीर्षक मिळतं.

ज्यावेळी तू शीर्षकाच्या बाबतीत अडतेस त्यावेळी तुला कोण मदत करतं? तुझा संपादक मदत करतो का? मुलाखतकार.

जेम्स म्हणते, "नाही मला कोणी मदत करत नाही. पण याला एक अपवाद. एकदा मात्र असं घडलं होतं. 'इनोसंट ब्लड' या कादंबरीच्या बाबतीत. अमेरिकेत बेस्ट सेलर झालेली ही माझी पहिली कादंबरी. कादंबरी आहे एका दत्तक गेलेल्या मुलीची. ही मुलगी स्वत:च्या खऱ्या आई-वडिलांचा शोध घ्यायचं ठरवते. या पुस्तकाचं मूळचं शीर्षक होतं 'ब्लड रिलेशन' पण त्या शीर्षकाचं आणखी एक पुस्तक होतं. शीर्षकाकरता कॉपी राइट कायदा लागू नसतो. पण पुन्हा तेच शीर्षक वापरू नये असं वाटून माझ्या पुस्तकाचं शीर्षक बदलायचं ठरलं. पुस्तकाची प्रुफं तपासून झाली होती. आम्ही सर्व निकराचा प्रयत्न करत होतो. एकदा 'ब्लड टाय' माझ्या मनात आलं पण पसंत पडलं नाही. मग माझ्या एका कॅथॉलिक स्नेह्यांनी सांगितलं की जर काही हरवलं तर सेंट अँन्थनीची प्रार्थना केली की ते गवसतं. मी कॅथॉलिक नाही. पण मी सेंट

अॅन्थनीची प्रार्थना केली, करुणा भाकली आणि मी दुसऱ्या दिवशी सकाळी उठले तर माझ्या मनात पहिले शब्द उमटले 'इनोसंट ब्लड', आणि मला फार सुंदर शीर्षक मिळालं!"

"तू अगोदरच दुसऱ्या पुस्तकाचा विचार करायला लागली आहेस का?" मुलाखतकाराने विचारले.

जेम्स म्हणते,"नाही.अजून नाही.ते पुस्तक येईल किंवा येणारही नाही.मी नाही का सांगितले की मी त्याची काळजी करत नाही.कृपावंत ईश्वर माझ्याकडे स्फूर्तीच्या रूपानं ते पाठवेल.तोपर्यंत मी प्रुफं तपासण्यात,इंग्लंड-अमेरिकेत पुस्तकाची प्रसिद्धी करण्यात गढून आणि बुडून गेलेली आहे."

पूर्वी निर्देश केलेल्या गोष्टीबद्दल म्हणजे मृत्यूच्या तुझ्या कुतूहलाबद्दल काही मुद्दे स्पष्ट करायचे आहेत.मृत्यूबद्दलची तुझी व्यावसायिक निकड आपण बाजूला ठेवू.पण वैयक्तिक दृष्ट्या तू मृत्यूबद्दल किती विचार करतेस ? म्हणजे काही माणसं सतत मृत्यूच्या जाणीवेत जगतात तर काहीजण त्याबद्दल विचारही करत नाहीत – मुलाखतकार.

जेम्स म्हणते, "त्वचेखालची कवटी मला नेहमीच दिसते. माझ्या एका पुस्तकाचं शीर्षक आहे 'स्कल बिनीथ द स्किन'! मी कायम मृत्यूचा विचार करते पण आता तर मी बरेच वेळा माझ्या मृत्यूचा विचार करते. शेक्सपियरनं म्हटलं आहे, "सदैव तयारीत असावं हेचं खरं" मी मृत्यूला घाबरत नाही. मला भीती वाटते ती शारीरिक अपंगत्वाची,मानसिक भ्रष्टतेची आणि लांबण लावलेल्या वेदनाग्रस्त मरणाची.मी आज चौऱ्याहत्तर वर्षांची.बायबलनं माणसाला सत्तर वर्षांचं आयुष्य दिलं.मला वाटतं दीर्घायुष्याचा विशेष मान मला मिळाला.आमच्यापैकी जे दुसरं महायुद्ध जगले म्हणजे सहिसलामत सुटले,ज्यांनी आपल्या तरुण मित्रांना कर्करोगाचा, हृदयविकाराचा बळी होताना पाहिलं,त्यांना आपण किती नशीबवान आहोत याची जाणीव असते. माझे वडील म्हणायचे, "मी आता उसन्या दिवसांवर जगत आहे." मला मिळालेल्या प्रत्येक जास्त दिवसाबद्दल मी कृतज्ञ आहे. मी या जीवनावर निश्चित प्रेम करते आणि जोपर्यंत मी तंदुरुस्त आहे, तोपर्यंत मला असंच दीर्घ जीवन मिळेल अशी मला आशा आहे."

मुलाखतकार – आम्ही असं ऐकतो की तू धार्मिक आहेस. मग कदाचित तू मरणानंतरचं जीवन मानत असशील?

जेम्स म्हणते, "माझी ईश्वरावर श्रद्धा आहे. शेवटच्या न्यायाच्या दिवशी शरीराचे पुनरुत्थान होते यावर ख्रिश्चन असल्यामुळे विश्वास ठेवायचा अशी समजूत असते. पण मला नाही वाटत माझा यावर विश्वास आहे. आत्मा अमर आहे अशी मी आशा करते. बुद्धधर्मातील पुनर्जन्माच्या कल्पनेकडे मात्र मी आकर्षित होते. यात दरवेळेला आपल्याला बढती मिळणार असते."

मुलाखतकार – पुनर्जन्म हा शुद्धीकरणासाठी असतो. प्रत्येक पुढील जन्मात आपण चांगले होत 'निर्वाणाला' पोचतो. निर्वाण म्हणजे शून्यावस्था. मला हे कधीच समजलं नाही की याच्यात महत्त्वपूर्ण असं काय आहे. मला वाटतं निरीश्वरवादी यावर विश्वास ठेवतात नाही का?

जेम्स म्हणते, "पुनर्जन्म म्हणजे मरणानंतर सुधारत जाणारे पुढील जन्म असा त्याचा अर्थ असेल अशी मी आशा करते."

मुलाखतकार–विनोद बाजूला ठेऊ.सत्य हे आहे की मरणानंतर काय घडेल याचे आपल्याला ज्ञान नाही आणि ज्ञान होऊ शकणार नाही. पण हे गूढ (मिस्ट्री) स्वीकारण्यासाठी आणि त्या मिस्ट्रीसह जगण्याची आपली क्षमता आपण घालवून बसलो आहोत!

जेम्स– "मी या विचारांशी पूर्ण सहमत आहे. मला वाटतं हे आपल्याला समजण्यासाठी नाहीच. तू काय म्हणतेस ते अगदी बरोबर आहे. सुंदरता व गूढता याशिवायचा धर्म म्हणजे धर्मच नव्हे. या जगाच्या पलिकडलं जे आहे त्याची अंधुकशी,पुसटशी कल्पना येणं एवढंच, पण यापेक्षा जास्त समजण्यायोग्य आपण नाही. प्रेमातून विमोचनाचा मार्ग जातो यावर माझा विश्वास आहे. तोच माझा धर्म. ख्रिस्त आपल्याला प्रेमाकडे जाण्याचा मार्ग दाखवतो. भूतलावरील बहुसंख्य लोकांनी त्याचं नाव ऐकलेलं नाही. मानव जातीतील या बहुसंख्यांना धिक्कारणं अयोग्यच आहे. माझा दृष्टिकोन साधा सोपा. बहुविध आत्मिक किंवा अध्यात्मिक मार्ग म्हणजे एकाच पर्वतशिखराकडे जाणाऱ्या वाटा जेथे देव आहे. प्रत्येक जण आपआपली वाट निवडतो. मी निवडलेला ख्रिश्चन धर्म, बौद्ध किंवा इस्लाम धर्मापेक्षा निराळा असेल. या मार्गावरील दृश्ये निराळी असतील, पण शेवटी आपण सर्व त्या शिखरावर जाऊन पोहोचू अशी मला आशा आहे."

तिची लेखनपद्धती,ती केव्हा व कोठे लिहिते याबद्दल जेम्सने माहिती दिली आहे ती पुढीलप्रमाणे :

ज्यावेळी जेम्सनं लिहायला सुरुवात केली त्यावेळी तिला नोकरीवर जायचं असे. ती सकाळी लवकर उठे व सहा ते आठ लिहीत असे. आता मात्र ती सवयच तिला लागली आहे. अजून सुद्धा ती सकाळी लवकर उठून लिहायला बसते. जेव्हा पुस्तक लिहायचं असेल तेव्हा सातच्या आधी उठते. स्वयंपाकघरात जाऊन चहा करते,रेडिओवरच्या बातम्या ऐकते,स्नान करून मग लिहायला बसते. काही तास झाले मग पुढे लिहिता येत नाही. साधारण दुपारी बारा वाजता ती लिखाण बंद करते. उरलेला दिवस इतर कामं करण्यात जातो.

जेम्स एका विशिष्ट जागीच लिहिते असं नाही. ती कुठेही लिहू शकते. पण एकान्त व शांतता या दोन गोष्टी मात्र हव्याच. तिची लिहिण्याची आवडती जागा म्हणजे लंडनच्या घरातील स्वयंपाकघर. मागेच बगीचा आहे. कंटाळा आला की पाय मोकळे करायला, तिथं झटकन जाता येतं. स्वयंपाकघरातलं टेबल मोठे. त्यावर तिची टिपणं, शब्दकोश, संदर्भग्रंथ ऐसपैस पसरलेले असताना ज्यावेळी ती कादंबरी लिहीत असते, त्यावेळी नोंदवहीशिवाय जेम्स बाहेर पडत नाही. जागेची वर्णनं,भेटलेल्या लोकांचे मनात उमटलेले ठसे,त्यांच्या गप्पातून सापडलेले संवाद, कथानकाचा नवा पैलू, अश गोष्टींची टिपणं नोंदवहीत असतात. जेम्सला लिहायला आवडतं पण तिचं हस्ताक्षर भयंकर असल्यामुळे तिचं तिलाच दुसऱ्या दिवशी वाचता येत नाही. म्हणून



अनुक्रमणिका

लिहिल्याबरोबर ती टेपरेकॉर्डरवर टेप करते. टेप सचीवाला देणे, त्या टेपवरून सचीव टाईप करून पहिला मसुदा तयार करतो. तिचं सुरुवातीचं लिखाण विस्कळीत असतं. मग कथेची जुळवाजुळव व व्यवस्थीत मांडणी आणि तयार होतं हस्तलिखित– टंकलिखित. ते टंकलिखित जेम्स व्यावसायिक वर्डप्रोसेसिंग अेजन्सीकडे पाठवते, तेथे त्याची डिस्क बनते आणि कादंबरी तयार होते.

*　　　*　　　*　　　*

**उद्देश**

इनोसंट ब्लड ही पी.डी. जेम्सची आठवी कादंबरी. ही कादंबरी अमेरिकेत बेस्ट सेलर झाली व जेम्सला जागतिक प्रसिद्धी मिळाली. या कादंबरीच्या शीर्षकाची जन्मकथा जेम्सच्या मुलाखतीत आहे. ती वाचल्यानंतर वाचकांना या कादंबरीबद्दल उत्सुकता निर्माण होईल म्हणून या कादंबरीचे कथानक आराखड्याच्या स्वरूपात दिले आहे. हा कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद नाही. फार तर याला झलक म्हणता येईल. कादंबरीतील कितीतरी पदर यामध्ये आलेले नाहीत. पण यातून कादंबरी मुळातून वाचावी किंवा या लेखिकेच्या आणखी काही कादंबऱ्या वाचाव्या अशी उत्सुकता तपशीलच्या वाचकांना निर्माण होईल व एका अपरिचित लेखिकेची भेट कलाकृतीतून घडल्याचा आनंद मिळेल.

इनोसंट ब्लडमधील सर्वच व्यक्तिरेखा स्खलनशील आहेत. परंतु त्यांच्यातसुद्धा चांगुलपणाचा एखादा धागा आहे. प्रत्येक जण आपल्या संस्कृती संस्कारांचा बंदी असतो. ही कथा घडते पश्चिमात्य समाजात म्हणून ही कथा त्या संस्कृतीच्या चौकटीत पाहिली पाहिजे. यातील सर्वच व्यक्तिरेखा मराठी वाचकाला परक्या वाटणे स्वाभाविक आहे. पण त्यातील दत्तक मुलाचा स्वत:च्या रक्ताचा शोध घेण्याचा प्रयत्न हा प्रश्न मात्र वैश्विक आहे. स्वत:च्या रक्ताच्या नात्याचा शोध घेणं ही ऊर्मी मात्र निरागस आहे. कारण ती नैसर्गिक आहे. दत्तक मूल हे घडलेल्या घटनांचं साक्षीदार असतं पण त्या घटनांना स्वत: जबाबदार नसतं, या अर्थानेही 'इनोसंट' हा शब्द समर्पक व सार्थ आहे.

व्यक्तीच्या गतकाळातील घटनांचा तिच्या वर्तमानातील वर्तणुकीवर होणारा परिणाम व वर्तमानाचा झटकन होणारा गतकाळ यातून होणारी मानवी मनाची जडण–घडण याचं विलोभनीय दर्शन जेम्सच्या डिटेक्टिव कादंबरीत घडतं म्हणून वाचक चकित होतो. मार्टीन डक्टन मनोदुर्बल व विकृत, तर त्याची मेरी डक्टन ही चलाख आणि विकृत. दोघांनी केलेल्या गुन्ह्यामुळे निर्माण झालेली भीती त्या दोघांवर निरनिराळा परिणाम करते. भीतीमुळे मार्टीन आणखी दुबळा व परावलंबी होतो तर भीतीमुळे मेरीची चलाखी आणखी धारदार होते. तिचा बेरडपणा वाढतो. त्यामुळे मार्टीनचा तुरुंगात अंत, तर मेरी तुरुंगाला पुरून उरते. मॉरिस पॉल फ्रे, ज्यांनी फिलीपाला दत्तक घेतलं तो, सुशिक्षित प्राध्यापक, बनेल व पाताळयंत्री. नॉर्मन स्केस खून झालेल्या मुलीचा बाप अशिक्षित पण पापभीरू. लहानपणी चोऱ्या करणारा; पण बुद्धिबळासारखा

खेळ योग्य वयात, योग्य वेळी मिळावा म्हणून चोरीच्या सवयीतून सुटलेला! फिलीपा हुशार, निर्भय, फटाकडी आणि स्खलनशील ! या सर्व व्यक्तिरेखांच्या जीवन प्रवाहातील भोवऱ्यात वाचक सापडतो आणि मग्न होऊन जातो.

इनोसंट ब्लडमधील वळणं वाचकाला थक्क करतात. जेम्सनं अभिजात इंग्लिश वाङ्मयातील अवतरणांचा केलेला उपयोग मनोहारी आहे. भाषेचं सौंदर्य, वातावरण निर्मिती, मानवी मनाच्या विविध पैलूंचं लेखिकेनं घडवलेलं दर्शन, कायम स्मरणात रहावी अशी लेखिकेची वाक्यं यासाठी ही कादंबरी मुळातूलन वाचण्याशिवाय पर्याय नाही.

**इनोसंट ब्लड –पी. डी. जेम्स.**

फिलीपा अठरावं वर्ष गाठण्याची वाटच बघत होती. फिलीपा रोज् पॉल फ्रे –दत्तक गेलेली मुलगी. फिलीपा आठ वर्षांची असताना मॉरिस पॉल फ्रे व त्याची दुसरी बायको हिल्डा यांनी तिला दत्तक घेतली. मॉरिस विद्यापीठात समाजशास्त्राचा प्राध्यापक, तर हिल्डा ज्युवेनाइल कोर्टात मॅजिस्ट्रेट. मॉरिसची पहिली बायको व मुलगा मोटार अपघातात ठार होतात. हिल्डा–मॉरिसला मूल नसतं म्हणून फिलीपाला दत्तक घ्यायचं ठरतं.

ब्रिटिश कायद्याप्रमाणे दत्तक मूल अठरा वर्षांचं झालं की त्याला त्याचे नैसर्गिक आईबाप कोण हे समजण्याचा अधिकार प्राप्त होतो. आज फिलीपा रजिस्ट्रारच्या ऑफिसमध्ये तोच हक्क वापरण्यासाठी आली होती. लहानपणच्या पेनिंग्टन हाउन्सच्या अंधुक आठवणी तिला कधी मधी आठवायच्या. मोठं घरं, भोवतीचा बगीचा, घरातलं ग्रंथालय, होमर, दान्ते, शेक्सपियर, मिल्टन, यांचे संगमरवरी अर्धपुतळे. त्या घरामधलं पुरुष माणूस तिचे वडील असावेत असं फिलीपाला वाटायचं. तिची सख्खी आई मेल्याचं हिल्डानं तिला सांगितलं होतं. आता ती खऱ्या वडिलांना भेटायला उत्सुक होती. वडील जिवंत असतील तर, ... ती काही रिकाम्या हातानं त्यांना भेटायला जाणार नव्हती. तिला नुकतीच केंब्रिजची शिष्यवृत्ती मिळाली होती. फिलीपाला वडिलांना सादर करायला जवळ काहीतरी आहे याचा आनंद होता. तिला माहीत होतं ती अनौरस मुलगी आहे. फिलीपाची आई पेनिंग्टन हाउसमध्ये काम करणारी बाई होती. तिला कोणीतरी वापरली होती असा फिलीपाचा समज होता.

नॅसर्गिक आईवडिलांची माहिती मिळवण्याचा फिलीपाचा अर्ज मंजूर झाला होता. तिचं बर्थ सर्टिफिकेट पोस्टानं येणार होतं. मॉरिसच्या हातात ते पडू नये म्हणून ती रोज पोस्ट येण्याच्या वेळेला दरवाजावर नजर ठेवून बसायची. एके दिवशी तो सरकारी लखोटा दरवाजात येऊन पडला धपकन! तिनं तो उचलला. "डॅडी आज तुमच्यासाठी काही पत्रं नाहीत" असं ओरडत तिनं स्वत:च्या खोलीकडे धूम ठोकली. लखोटा तिनं रपकन उघडला. पिवळा सरकारी कागद. तिचं नवं, खरं म्हणजे जुनं बर्थ सर्टिफिकेट तिच्यासमोर आलं होतं. ते वाचताना तिला वाटलं 'याच्याशी माझा काय संबंध? याच्यात माझ्याबद्दल काहीच नाही'. हो, बर्थ सर्टिफिकेट असंच असतं !

मार्टिन जॉन डक्टन कारकून, मेरी डक्टन गृहिणी. यांना झालेलं स्त्रीलिंगी मूल रोज डक्टन २२ मे १९६०, ४१ बॅंक्रॉफ्ट गार्डन्स, सेवन किंग्ज् , इसेक्स् ! म्हणजे फिलीपाची आई मेरी गर्भार असतानाच तिचं लग्न लावून दिलं होतं की काय ? मार्टीन डक्टन तिचा खरा बाप नाही. पडलेलं कोडं उलगडण्यासाठी इसेक्सला जाऊन ४१ बॅंक्रॉफ्ट गार्डन्समध्ये डोकावणं फिलीपाला जरुरीचं वाटू लागलं.

मध्यम वर्गातल्या तळातल्या थराची, बैठ्या घराची कॉलनी होती. बॅंक्रॉफ्ट गार्डन्स ! फिलीपानं ४१ नंबरच्या घराची बेल वाजवली. आतून काहीच प्रतिसाद आला नाही. घर रिकामं होतं. तिनं शेजारच्या घरी जाऊन चौकशी करण्याचं ठरवलं. घराला बेल नव्हती. तिनं कडी वाजवली. घसपटणाऱ्या पावलांचा आवाज मोठा होत गेला. साखळी लावून दरवाजा किलकिला झाला. थकलेले संशयित डोळे न्याहाळत होते.

"माफ करा त्रास दिल्यावद्दल, पण तुमचा शेजारी मार्टीन डक्टन त्याचं घर" फिलीपा विचारत होती.

"कोण आहे आई?" आतून तरुण पुरुषी आवाज.

"अरे शेजारच्या मार्टीन डक्टनची चौकशी करत आलीय एक मुलगी," म्हातारी बोलत होती.

दमदार पावलांचा आवाज झाला आणि दरवाजा सताड उघडला.

"मार्टीन डक्टन तो मेला बॅन्डस्वर्थच्या तुरुंगात काही वर्षांपूर्वी " तरुण –

"फाशीच द्यायला हवा होता. बारा वर्षाच्या मुलीवर बलात्कार केलान. मग त्या पोरीचा गळा घोटला त्यानं आणि त्याच्या बायकोनं मेरीनं. प्रेत गाडीच्या डिक्कीत टाकून नेताना पकडलं दोघांना. जन्मठेपेची शिक्षा झाली. तो तुरुंगात मेला. मेरी सुटली असेल कदाचित् . सटवी कुठं राहाते कुणास ठाऊक! पण, तुला कशाला हव्यात चौकशा? तू काय पत्रकार आहेस?" तो तरुण.

"माफ करा मला जो मार्टीन डक्टन हवा आहे तो हा नव्हे," असं म्हणत फिलीपा पटकन निघाली.

रस्त्याच्या वळणापर्यंत चार डोळे तिचां पाठलाग करत होते, तिला जाणवत होतं. वळण पार करून ती जेमतेम पलीकडे गेली आणि तिचे पायच जड झाले. मटकन बसली ती रस्त्यात. आजूबाजूचं सगळं गरगरत होतं. दोन गुढघ्यात तिनं डोकं टेकवलं. हळूहळू चक्कर कमी झाली. पोटात खड्डा पडला. उलटी होईल असं वाटत होतं. गार घाम फुटला. आपण काय ऐकलं याचा विचार करत ती काही काळ स्वस्थ बसून राहिली.

फिलीपा सात तास लंडनभर भटकत तंगडतोड करत संध्याकाळी परतली. तिला हिल्डा आणि मॉरिसबद्दल प्रेम नव्हतं आणि हिल्डा–मॉरिसला तिच्याबद्दल ! कर्तव्यबुद्धीनं त्यांनी तिला वाढवलं. फिलीपा घरात शिरत होती. स्वयंपाकघर दिव्यांनी उजळलं होतं. हिल्डा स्वयंपाकात

मग्न होती. संध्याकाळी महत्त्वाचे पाहुणे जेवायला यायचे होते. फिलीपा स्वयंपाकघरात जाऊन उभी राहिली. हिल्डा अंड्याचा खोका घेऊन येत होती. ''माझी आई खुनी होती, तू मला सांगितलं नाहीस'' फिलीपा म्हणाली. हिल्डाच्या हातातून अंड्याचा खोका पडला. ती फिलीपाकडे आ वासून बघत होती. ''तुला कसं कळलं'' हिल्डा म्हणाली. ''मी अठरा वर्षांची झाले माहीत आहे ना तुला? मला माझं मूळ बर्थ सर्टिफिकेट मिळालं. मी बँक्रॉफ्ट गार्डनमध्ये जाऊन आले,'' फिलीपा फुटलेल्या अंड्यावर पाय देत म्हणाली.

''हे बघ फिलीपा तुला जे आज कळलं ते आधी सांगण्यात काहीच अर्थ नव्हता आणि तशी वेळही आली नाही'' हिल्डा जमीन फडक्यानं पुसत म्हणाली.

''मेरी म्हणजे माझी खुनी आई कामवालीबाई होती आणि मोठ्या घरी कामाला होती, तिचा कोणी तरी गैरफायदा घेतला. मला जन्म देताना ती मेली या सगळ्या गोष्टी तूच रचल्यास तर'' फिलीपा.

''हो या सर्व गोष्टी मीच रचल्या. एकदा एक गोष्ट रचल्यानंतर पुढच्या गोष्टी सांगत राहाणं यावर माझ्याजवळ इलाज नव्हता'' हिल्डाचे डोळे भरून आले. तेवढ्यात मॉरिस आला. हिल्डानं त्याला फिलीपाला सगळं समजल्याचं सांगितलं.

''कोणत्याही दिवशी फिलीपा तुला हे कळलं असतं तरी तो दिवस त्रासदायकच ठरला असता'' मॉरिस ब्रिफकेस टेबलावर ठेवत म्हणाला.

''कुठं आहे माझी आई? सध्या कोणत्या तुरुंगाची हवा खात्येय''? फिलीपा.

''मेलकॉम्ब ग्रेंजच्या खुल्या तुरुंगात. साधारण महिन्याभरात सुटेल'' मॉरिस.

''मी माझ्या युरोपच्या ट्रिपचे पैसे साठवले आहेत. केंब्रिजला जायला अजून दोन महिने आहेत. आई तुरुंगातून सुटल्यानंतर मी आईला घेऊन लंडनमध्ये फ्लॅट भाड्याने घेऊन राहीन'' फिलीपा मॉरिसकडे बघत म्हणाली.

''असा मूर्खपणा तू करू नकोस. धोक्याचं आहे ते! मेरी डक्टन आणि तुझं काही घेणं देणं नाही'' मॉरिस कणखर आवाजात बोलत होता.

''देण्या घेण्याचा प्रश्नच नाही. ती माझी आई आहे हे मी पुसू शकत नाही. तिनं जे काय केलं हे पण पुसलं जाणार नाही. ती जिवंत आहे हे कळूनसुद्धा तिला भेटायचं नाही? आजचा दिवस उगवलाच नाही असं समजून जगायचं? रोज नवीन परिकल्पना करत जगण्यापेक्षा मी कोण आहे या प्रश्नाचं उत्तर शोधून काढणं मला महत्त्वाचं वाटतं. तेच मला माझ्या आईकडून हवं आहे.'' फिलीपा तावातावानं बोलत होती.

''फिलीपा तुझी आई नऊ-दहा वर्षं तुरुंगात होती. जन्मठेपेची शिक्षा झालेल्यांपैकी फार थोडे जण बाहेर येतात. तुझी आई तुरुंगातल्या जीवनाला पुरून उरली, ती बेरड असल्याशिवाय नाही'' मॉरिस म्हणाला.



अनुक्रमणिका

फिलीपानं आईला पत्र पाठवायचं ठरवलं. मायना शोधण्यात दोन तास गेले. केंब्रिजची स्कॉलरशिप मिळवणाऱ्या फिलीपाला चार ओळी लिहिणं कठीण जातं होत. आईला केव्हा भेटायला यावं याबद्दलची विचारणा तिनं त्या पत्रात केली होती.

नॉर्मन स्केस, एक म्युनिसिपालटीला कारकून, त्याची बायको मावीस. यांची मुलगी ज्युली स्केस ! वय वर्षं बारा. या ज्युली स्केसवर मार्टीन डक्टनने बलात्कार केला व मेरी डक्टनने तिचा गळा घोटला. नॉर्मन स्केस आता अठ्ठावन वर्षाचा झाला आहे. [illegible] वर्षापूर्वी त्याच्या लेकीचा, ज्युलीचा खून झाला. नंतर काही वर्षात मावीस – नॉर्मनची बायको म्हणजे ज्युलीची आई, कर्करोगाने आजारी पडली व मेली. मावीस व नॉर्मनने जीवनाचं एकच ध्येय ठेवलेलं होतं. मेरी डक्टन तुरुंगातून सुटल्यानंतर तिचा खून करायचा. पण नॉर्मन स्केसच्या बायकोचा मृत्यू झाला. "मी मेरी डक्टनचा खून करीन" असं वचन मावीस मृत्यूशय्येवर असताना नॉर्मनने तिला दिलं. मेरी डक्टन कोणत्या तुरुंगात आहे, तिचा एका तुरुंगातून दुसऱ्या तुरुंगात प्रवास कधी होतोय यावर एका खाजगी डिटेक्टिवमार्फत नॉर्मन स्केसने पाळत ठेवली. मेरी डक्टनची मेलकॉम्ब ग्रेंज तुरुंगातून सुटण्याची तारीख त्याला कळल्यावर त्याने तडकाफडकी स्वेच्छानिवृत्ती घेतली. ऑफिसातले लोक चकित झाले. त्याने घर विकले. खुनाचा आराखडा तयार केला. मेरी डक्टन कोणत्या वारी सुटणार याची वाट तो पाहात होता पण सुटल्यानंतर ती कुठं जाणार याचा थांगपत्ता त्याला लागला नाही. तिची भेट घेऊन मावीसनं मेरीला क्षमा केल्याचं पत्र देण्याचा बहाणा त्याला करायचा होता. नॉर्मन ते पत्र जवळ बाळगून असतो. खून सुरीनं कर असं मावीसनं नॉर्मनला सांगितलेलं असतं.

काही दिवसात फिलीपाला आईचं पत्र आलं. त्यानंतर तुरुंगाधिकाऱ्याकडून भेटण्याची परवानगी. परवानगीचा कागद घेऊन फिलीपा यॉर्क स्टेशनवर उतरली. मेलकॉम्ब ग्रेंजची बस तिने पकडली. बस तुडुंब भरलेली, तुरुंगातल्यांना भेटायला जाणाऱ्यांनी. प्रत्येकाच्या हातात, खाकोटीला पुडकी, पुस्तकांचे गठ्ठे. फळांच्या, पदार्थांच्या, आणि घामाच्या वासानं बस कुंद झालेली. कितीतरी वर्ष याच बसमधून माणसं खेपा करत असतील. बस थांबली. माणसं भराभर उतरली. समोर उंच भिंती. लोखंडी दरवाजे सताड उघडे. डोळ्यात भरावी अशी ठळक पाटी 'मेलकॉम्ब ग्रेंज प्रिझन.' फिलीपा पाटी बघून क्षणभर थबकली. मेरी व तिची मुलगी फिलीपा यांची पहिली भेट म्हणून एक स्वतंत्र खोली दोघींसाठी दिलेली असते. फिलीपा त्या खोलीत बसते. प्रत्येक क्षण जड पावलानं येतो. किती वेळ लावलाय या बाईनं. फिलीपा थोडी कावली होती. इतक्यात दरवाजा उघडतो. गव्हाळ केस, राखाडी होत चाललेले, सुकलेले आणि कापलेले. वरचा उपरा ओठ. मधाळ त्वचा पण आता पांढरी पडलेली. घारसट डोळे. उतार वयाकडे झुकलेली बाई समोर उभी राहिली. दृष्टभेट झाली. पण दोघींनी एकमेकींना स्पर्श मात्र केला नाही. आपण याच शरीराचा एक भाग आहोत असं फिलीपाला वाटलं. मेरी डक्टनने तिची जीवनकथा फिलीपाला सांगितली. फिलीपाचा बाप मार्टिन डक्टन प्रथम

मास्तर होता. नंतर मास्तरकी सोडून त्यानं गॅस कंपनीत नोकरी धरली.

तो एक दुवळा मनुष्य होता. लहान मुलीचं आकर्षण ही त्याची विकृती होती. एका संध्याकाळी ज्युली स्केस गर्ल गाईडच्या शाखेतून परत येत होती. मार्टिनचा उजवा हात बँडेजमध्ये होता. त्यानं तिला रस्त्यावरून जाताना पाहिलं. 'मला चहा करून देशील का' असं विचारून मार्टिननं तिला घरात घेतलं. आणि जे घडायचं ते घडलं. तांत्रिकदृष्ट्या तो बलात्कार होता. मेरी घरी परतली. तो त्या मुलीचा रडण्याचा आवाज, आणि मार्टिनचा शरमिंदा चेहरा. ती काय झालं ते समजली. आता तिचे आईवडील आयुष्यभर मार्टिनला दोष देतील. ज्युलीचं वैवाहिक जीवन सुखाचं झालं नाही तर ते खापर मार्टिनवर फोडलं जाईल. मेरी डक्टननं या सर्व प्रश्नाला उत्तर म्हणून ज्युली स्केसचा खून केला. खरं तर तिचा खून करण्याचा इरादा नव्हता तिला वाटत होतं आपण ज्युलीला शांत करू पण घडलं भलतंच.

फिलीपा अवाक् झाली. तिला काय करावं ते कळेना. मॉरिस पॉल फ्रेचे (तिचा दत्तक बाप) परखड शब्द तिला आठवले. "फिलीपा वास्तव प्रखर असतं, कोणीच पूर्णपणे वास्तव सहन करू शकत नाही. प्रत्येकजण सुसह्य असं कल्पनाविश्व निर्माण करून जगत असतो. तू तुझं कल्पनाविश्व मोठ्या परिश्रमानं तयार केलंस, ते स्वत:च्या हातानी कशाला मोडतेस ?"

भेटण्याची वेळ संपली. फिलीपा घरी परतली. काही दिवसात तिनं लंडनमध्ये फ्लॅट शोधला. खुनी आईबरोबर राहाण्याची तजवीज केली. प्रोबेशन महिला अधिकारी थेडन जागा पाहून गेली. पहिल्या दोन महिन्याच्या प्रोबेशन काळासाठी त्या दोघींना एकत्र राहण्यायोग्य ही जागा आहे असा रिपोर्ट तिनं तुरुंगाधिकाऱ्यांकडे पाठवला.

अखेर सुटकेचा दिवस झाला. फिलीपा मेरी डक्टनला आणायला जाते. मेरी डक्टनच्या सुटकेची आतुरतेने वाट पाहाणारी आणखी एक व्यक्ती म्हणजे खून झालेल्या ज्युलीचा बाप नॉर्मन स्केस ! तुरुंगातून सुटण्याच्या दिवशी नॉर्मन स्केस यॉर्क स्टेशनवर भल्या पहाटे जाऊन उभा राहिला. मेरी डक्टन व एक तरुणी अशी जोडगोळी त्याला दिसली. मेरी डक्टनला बघितल्याबरोबर त्याला तिचा आरोपीच्या पिंजऱ्यातला चेहरा आठवतो. सगळा खटलाच त्याच्या डोळ्यासमोर उभा राहिला. जन्मठेपेचा निकाल देऊन कोर्ट उठतं. मागे राहतात दोन तळमळत्या व्यक्ती, ज्युलीचे आई-बाप, नॉर्मन स्केस, मावीस स्केस. ज्युली मेली व खुनीबाई मागे जिवंत हे पाहून त्याच्या अंगाचा तिळपापड झाला.

तिच्याबरोबर असलेली तरुणी म्हणजे मेरीची मुलगी असावी असा त्याला दाट संशय येतो. स्टेशनातून ट्रेनमध्ये असा त्याचा पाठलाग चालू असतो. लंडनला उतरताना डब्याच्या दारात तो त्या तरुणीच्या सुटकेसवरचं लेबल पाहातो, 'फिलीपा पॉल फ्रे.' पॉल फ्रे म्हणजे मेरीची मुलगी कोणीतरी दत्तक घेतलेली दिसते, असं त्याला वाटतं. पॉल फ्रे हे आडनाव आगळं वेगळं असतं. लंडनच्या गर्दीत त्याची व त्या दोघींची चुकामूक होते. तो टेलिफोन डिरेक्टरीत पॉल फ्रे आडनावाचे नंबर शोधतो. फक्त सात आठ पॉल फ्रे डिरेक्टरीत

असतात.

तो फोन करून फिलीपा पॉल फ्रेचं एक नवं कोरं पुस्तक सापडलं आहे ती घरी आहे का? असं विचारतो. कोठेच प्रतिसाद मिळत नाही. तो निराश होतो. शेवटचा फोन नंबरावर एक बाई सांगते. "फिलीपा सध्या येथे राहात नाही. ती मैत्रिणीबरोबर दुसरीकडे राहावयास गेली आहे." तो हिल्डाचा आवाज असतो. हीच बाई आपल्याला फिलीपा पॉल फ्रे आणि तिची खुनी आई मेरी डक्टन यांच्या घराकडे नेईल अशी त्याची खात्री पटते. हिल्डाच्या घरावर तो रात्रंदिवस पाळत ठेवतो. तिचा पाठलाग करतो आणि एक दिवस त्याला तिच्या पाठोपाठ जाऊन त्या दोघींचा पत्ता लागतो.

खाली फळंभाजीवाल्याचं दुकान, वर एक छोटासा दोन खोल्यांचा फ्लॅट. येथे फिलीपा व मेरी डक्टन यांनी आपला वाडबिस्तरा पसरला. एका उपहारगृहात भांडी विसळण्याची व वेटरची नोकरी दोघींनी घेतली. फिलीपाच्या वयाच्या सातआठ मुली तिघं कामाला होत्या त्या फिलीपला तू इतकं पॉश इंग्लिश कसं बोलतेस असं विचारायच्या. पॉश इंग्लिश बोलणारी फिलीपा व तिची आई मेरी त्यांच्या कुतूहलाचा विषय होता. पण फिलीपानं लोणकढ्या थापा देत वेळ मारून नेली होती. दोघींचे दिवस आनंदात चालले होते.

एके दिवशी फिलीपा व मेरी डक्टन यांनी मेरीचे तुरुंगात वापरलेले कपडे बॅगेसकट लंडनच्या कॅनॉलमध्ये भिरकावून दिले व तुरुंगाच्या ढोबळ स्मृती नष्ट करण्याचा प्रयत्न केला. फिलीपाला मेरीनं स्वत:च्या कहाणीचा एक लिफाफा दिला होता. त्यात तिच्या दृष्टीनं काय घडलं, त्याचं स्पष्टीकरण तिनं दिलं होतं. फिलीपानं ते सर्व वाचलं होतं. ज्या रात्री ज्युलीचा खून झाला त्या रात्री आपण कुठे होतो हा प्रश्न फिलीपाला पडला होता व त्याचं उत्तर मेरीच्या लिखाणात नव्हतं.

फिलीपा व मेरी डक्टन यांच्या फ्लॅटवर पाळत ठेवून नॉर्मन स्केसनं त्यांच्या जाण्यायेण्याच्या वेळा, रात्री झोपण्याची वेळ हे सर्व पाहून खुनाचा आराखडा तयार केला होता. रात्री घरात शिरण्यासाठी,त्यानं फळवाल्याच्या दुकानात शिरून दुकानदाराच्या खिशातल्या किल्ल्या चोरल्या होत्या. लहानपणी त्याने जे चोऱ्यांचे हस्तकौशल्य अवगत केले होते, त्याचा त्याला आज पुन्हा उपयोग झाला. कोणत्या रात्री मेरी डक्टनच्या घरात घुसायचे व खून करायचा, ज्यूलीच्या खुनाचा बदला कसा घ्यायचा याचा रात्रंदिवस विचार नॉर्मन करत होता.

त्या दोघींना एकत्र राहून जवळ जवळ पाच आठवडे झाले होते. दोघींच्या सुटीच्या दिवशी सकाळी एक वार्ताहर त्यांच्याकडे आला. जन्मठेपेची शिक्षा भोगून आलेली खुनी आई व तिची मुलगी यावर त्याला वार्ताकथा लिहावयाची होती. फिलीपाला याचे काय परिणाम होतील याची पूर्ण जाणीव होती. तिने त्या वार्ताहाराला धक्के मारून बाहेर घालवले. आता काही दिवस लंडन सोडून दोघींनी दूरवर कुठे तरी जाऊन राहिलं पाहिजे असं

फिलीपाला वाटलं. प्रवास करायचा म्हणजे पैसे हवेत. खिशात दमडी नाही. मॉरिस पॉल फ्रेच्या घरी जाऊन चांदीचे चमचे चोरून आणावे या विचाराने फिलीपा निघाली.

आईला घराबाहेर पडू नकोस असं तिनं बजावले. दुपारची निवांत वेळ. आता घरी कोणी नसेल. मॉरिस विद्यापीठात. हिल्डा ज्युव्हेनाईल कोर्टात. घराची किल्ली फिलीपाजवळ असतेच. घर उघडून ती दबत्या पावलानं आत गेली. मॉरिसच्या बेडरूममध्ये कोणीतरी आहे असं वाटून तिने त्या खोलीचा दरवाजा उघडला. पलंगावर मॉरिस व त्याची एक विद्यार्थिनी! ती विद्यार्थिनी मॉरिसला शिव्या घालत घराबाहेर पडते. मॉरिस अविचलित. फिलिपाने मॉरिसला घरी येण्याच कारण सांगितलं. "म्हणजे तू आता तुझ्या आईजवळ कायम रहाण्याचा निर्णय घेतलास तर ! हो, रक्ताचं नातं तुला जास्त महत्त्वाचं वाटतं! त्याकरता तुझं घर, केंब्रिजची शिष्यवृत्ती सर्व सोडून द्यायला तू तयार आहेस तर फिलीपा" मॉरिसने थंडपणे विचारलं.

"मॉरिस एका खुनी बाईची मुलगी वाढवण्याचा प्रयोग करण्यासाठी तू मला दत्तक घेतलंस. मी प्रयोगासाठी पाळलेला प्राणी म्हणून जगू इच्छित नाही." फिलीपा फणकाऱ्यानं म्हणाली.

"फिलीपा, तुझ्या आईच्या खटल्याची तारीख आणि तुझ्या दत्तकविधानाची तारीख तू तपासून पाहा म्हणजे तुला कळेल की तुझ्या आईनं ज्युलीचा खून करण्याआधीच तुला मी दत्तक घेतलं होतं. लहानपणापासून तुझ्या आईला तू नको होतीस. पेनिंग्टन हाऊसमध्ये काम करण्याऱ्या बाईनं तुला पाळलं होतं. ज्या ज्यावेळी ती तुला तुझ्या आईकडे पाठवायचो त्या त्यावेळी तू मार खाऊन परत यायचीस. वयाच्या आठव्या वर्षी तुला तुझ्या आईनं इतकं मारलं की, तुझी कवटी फ्रॅक्चर झाली. तू बेशुद्धावस्थेत रुग्णालयात होतीस. शुद्धीवर आल्यानंतर तुझी स्मृती जवळ जवळ गेली होती. तू अत्यंत ढालगज, हट्टी पण हुषार मुलगी होतीस. पेनिंग्टन हाऊसमधील त्या आयाबाईबरोबर मी तुला पाहिली. त्या आयाबाईला तुला सांभाळणं कठीण झालं होतं. तुझ्या आईला तू नको होतीस. हिल्डाला व मला तुझ्या हुशारीचं कौतुक होतं. ती हुशारी फुकट जाऊ नये म्हणून आम्ही तुला दत्तक घेतलं. ज्युलीचा खून झाला त्यावेळी तू तुझ्या आईच्या घरी नव्हतीस" इतकं बोलून मॉरिस थांबला.

फिलीपाला हुंदका आवरेना. ती घरातून जी धावत बाहेर पडली ती थेट फ्लॅटवर येऊन पोचली. दिवेलागणी झाली होती. मेरी डक्टन स्वयंपाकघरात होती. फिलीपा तिच्यासमोर जाऊन उभी राहिली. "आई लहानपणी मी तुला नको होते. तू मला डोक्याचं हाड फुटेपर्यंत मारलंस. मी बेशुद्ध पडले. खरं आहे हे सर्व ?" फिलीपानं आईला सवाल केला.

"हो, हे सर्व खरं आहे" फिलीपाची आई म्हणाली.

"आता मला तुझं तोंड ही पाहायचं नाही. रहा एकटी तू या फ्लॅटवर. दोन महिन्यांचं भाडं मी आधीच भरलं आहे,मी चालले. मला इथलं काहीही नको. राहीन मी कोणाकडे तरी", असं म्हणून फिलीपा बाहेर पडणार येवढ्यात मेरी म्हणाली, "फिलीपा, मी ज्युलीचा

खून केला त्याबद्दल तू मला क्षमा करतेस. पण मी तुला लहानपणी मारहाण केली याबद्दल तू मला क्षमा करत नाहीस?''

फिलीपानं धाडकन दरवाजा लावून घेतला. ती घराबाहेर पडली. बाहेर ओंगळवाणा पाऊस पडत होता. गार वारा वाहात होता. फिलीपा चालत होती. ती कुठे जात आहे, याचा तिलासुद्धा पत्ता नव्हता. वाहनांच्या वर्दळीला ओहोटी लागली होती. रस्त्यावरच्या दिव्यांनी प्रकाशाची गोल रिंगणं टाकली होती. उपहारगृहांच्या व बारच्या दिव्यांची व दरवाजांची उघडमीट चालू होती. ओलीचिंब फिलीपा रस्त्यावर फिरत होती. माणसांची वर्दळ ओसरली. मध्यरात्र सरली. दारू पिऊन तर्र झालेले उनाड तरुण फिलीपाच्या मागे लागले. फिलीपा त्यांना चुकवत धावत सुटली व एका पडक्या घराच्या आवारात कचऱ्याच्या पिंपात लपली.

तिची त्या तरुणांच्या टोळक्यापासून सुटका झाली. काय करावं, कुठं जावं, या विचारात ती पडली होती. परत फ्लॅटवर जावं, आईच्या कुशीत शिरावं. आईला सांगावं आई तू मला हवी आहेस. तिचे पाय घराकडे वळले. बरंच चालल्यानंतर ती घराजवळ येऊन पोचली. आईच्या खोलीतील दिव्याचा मंद प्रकाश खिडकीतून दिसत होता. भराभर जिना चढत ती वर पोचली. तिनं फ्लॅटचा दरवाजा उघडला, व ती आईच्या खोलीत गेली. टेबललँप लावलेला होता. आई पलंगावर निपचीत पडली होती. कोपऱ्यात एक पुरुष होता. हातमोजे घातलेल्या त्याच्या हातात सुरी होती. आईच्या गळ्यावर सुरीचा वार होता पण त्यातून रक्ताची धार लागलेली नव्हती.

मेरी डक्टननं झोपेच्या गोळ्या खाऊन जीव दिला होता. तिच्या उशाशी एक चिठ्ठी होती फिलीपासाठी. ''ईश्वरानं मला तिच्या मृत्यूबद्दल क्षमा केली तर तो मला आत्महत्येसाठी क्षमा करेल. तुरुंगात घालवलेल्या दहा वर्षातील प्रत्येक दिवसाची किंमत मी या पाच आठवड्यासाठी मोजली. हे पाच आठवडे माझ्या आयुष्यातील अत्यंत आनंदाचे. तुझा काहीही दोष नाही. मी जे करत आहे ते फक्त तुझ्यासाठीच नव्हे, तर माझ्यासाठीही उत्तम आहे. तू जिवंत आहेस म्हणून मी आनंदाने मरत आहे. माझं तुझ्यावर प्रेम आहे. तू निर्भय राहा.'' फिलीपानं चिठ्ठी वाचली.

तो पुरुष म्हणजे नॉर्मन स्केस, ज्युलीचा बाप हे फिलीपाला कळलं. फिलीपा त्याला म्हणाली, ''तू आता येथून निघून जा. मी पोलिसांना बोलावणार आहे. ती सुरी इथेच ठेव त्यावर माझ्या बोटांचे ठसे असतील. मीच आईवर वार केला असं सांगणार आहे. ती जिवंत आहे का मेली याबद्दल चौकशी करणार कोणी नाही. तिच्या चिठ्ठीवरून तिनं आत्महत्या केली हे स्पष्ट आहे. पोलीस जास्त चौकशी करणार नाहीत. तू मात्र येथे उभा राहू नकोस, उगाच पोलिसांच्या जाळ्यात अडकू नकोस.''

नॉर्मन सुरी ठेवून निघून गेला. फिलीपानं खाली जाऊन प्रथम मॉरिस पॉल फ्रेला फोन केला. मॉरिस ताबडतोब गाडी घेऊन आला. पोलिसांना कळवलं. पोलिसांनी येऊन मेरी

डक्टनच्या प्रेताचा ताबा घेतला. पुढल्या सगळ्या गोष्टी मॉरिसनं निपटल्या. फिलीपा मॉरिसबरोबर परत घरी आली. तिची खोली तिच्यासाठी तयारच होती. काही दिवसानंतर फिलीपाचा ताण हलका करण्यासाठी मॉरिस तिला घेऊन इटलीला सुटीवर गेला. तिथं फिलीपाचा व मॉरिसचा शरीरसंबंध आलं. लंडनला परतल्यावर परत बाप व मुलीचं नातं राहाणं कसं शक्य होतं? दोघंही अपराधीपणाच्या भावनेनं जगू लागली.

मधे काही वर्ष गेली. फिलीपा आता फिलीपा डक्टन या नावाने नवोदित कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध झालेली होती.

संध्याकाळची प्रार्थनासभा आटोपून फिलीपा चर्चमधून बाहेर पडताना तिला नॉर्मन स्केस भेटला. तो व्हायॉलेट या अंध महिलेशी विवाह करणार होता. त्याचं तिच्यावर प्रेम असतं. त्यानी मेरी डक्टनवर केलेला वार व त्यामागचा हेतू व्हायोलेटला सांगितलेला नसतो. ज्या माणसावर प्रेम करायचं त्याच्यापासून गोष्ट लपवून ठेवायची ! याची त्याला खंत वाटत होती. हे कसलं प्रेम असं त्याला वाटतं. त्याने फिलीपाला हे सर्व सांगितलं. त्याच्या होणाऱ्या बायकोला फिलीपा हे सांगेल किंवा लेखक असल्यामुळे त्याचा उपयोग करेल अशी त्याची भीती. फिलीपाने त्याला निश्चिंत राहा असं सांगितलं. प्रत्येकजण काहीतरी गिल्ट घेऊन जगत असतो, याची तिला नुसती जाणीव नाही तर अनुभव असतो. नॉर्मन स्केस तिच्याशी हस्तांदोलन करून निघून गेला. फिलीपा त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात होती. दुसऱ्यावर प्रेम करायला शिकून, त्यातून स्वतःचं व्यक्तित्व शोधण्याची संधी जशी त्याला मिळाली तशी ती आपल्यालाही मिळेल अशी फिलीपाला आशा होती.

**डॉ. आनंद जोशी**

---

**अविश्वसनीय सत्ये**

१९६० मध्ये ॲमस्टरडॅमच्या व्यापाऱ्यांनी दुसऱ्या चार्लस् राजाला जगाचा भव्य ॲटलास भेट दिला. आता तो ॲटलास (नकाशांचे पुस्तक) ब्रिटिश म्युझियममध्ये आहे. त्याची उंची ५ फूट १० इंच असून रुंदी ३ फूट ६ इंच आहे. ज्यावेळी तो उघडायचा असतो त्यावेळी त्याला चाकांवर चढवावं लागतं.

* *

जॅकोपो सॅनझरो हा इटालियन कवी १४५८ मध्ये नेपल्स इथे मृत्यू पावला. त्याने लिहिलेल्या सहा ओळींबद्दल त्याला सहा हजार सुवर्णमुद्रा मिळाल्या. एखाद्या काव्यरचनेबद्दल मिळालेला हा सर्वाधिक मोबदला होता. हा मोबदला व्हेनिसच्या नागरिकांनी दिला होता. कारण त्या सहा ओळी जॅकोपोने त्यांच्या शहराबद्दल लिहिलेल्या प्रशंसापर ओळी होत्या.

# लेखमाला

## पुस्तक कसे वाचावे ?

**–डॉ. मीना वैशंपायन**

(व्हर्जिनिया वुल्फ हिच्या भाषणाचा एक मुक्त अनुवाद)

प्रिय श्रोतेहो,

माझ्या व्याख्यानाच्या शीर्षकाकडे मी तुमचे लक्ष वेधून घेऊ इच्छिते. मी जरी या प्रश्नाचे उत्तर देऊ शकत असले तरी ते उत्तर माझ्यापुरतेच असेल. तुम्हाला ते लागू पडेल असे नाही. खरं म्हणजे वाचनाबाबतीत दुसऱ्याला सल्ला द्यायचाच झाला तर, तो एवढाच की 'कोणताच सल्ला देऊ नये.' प्रत्येकाने आपल्या वृत्तीनुसार, आवडीनुसार वाचावे आणि त्यापासून बोध घ्यावा. एकदा आपल्यामध्ये अशी परस्पर समजूत असली की मग माझ्या कल्पना, सूचना मी मोकळेपणाने तुमच्यापुढे मांडेन, कारण त्यावेळी मला खात्री असेल की, वाचकाला अत्यंत आवश्यक असणाऱ्या स्वातंत्र्याचं महत्त्व तुम्ही जाणलं आहे आणि माझ्या बोलण्याचा विचार तुम्ही तारतम्यानं कराल. वस्तुत: पुस्तकांबाबत नियम तरी कोणते लावायचे? वॉटर्लूच्या लढाईच्या तारखेबद्दल आपण काहीतरी निश्चित विधान करू शकतो, पण 'हॅम्लेट' हे नाटक 'राजा लिअर' या नाटकापेक्षा चांगले की वाईट याबाबत निश्चित विधान करणे कठीण ! कारण प्रत्येकाने ते स्वत:पुरतं स्वत:च ठरवावं लागतं. आपल्या ग्रंथालयात विद्वज्जड चेहऱ्यांचे तज्ज्ञ अधिकारी बोलावून त्यांच्याकडून कसे वाचावे, काय वाचावे, आपण वाचलेल्या पुस्तकाचे मूल्य किती याविषयी मार्गदर्शन घेणे म्हणजे आपल्या स्वातंत्र्याच्या मुळावरच घाला घालण्यासारखे आहे. कारण या बाबतीतले व्यक्तिगत स्वातंत्र्य म्हणजे या पवित्र वास्तूंचा प्राण असतो. इतर सर्व ठिकाणी आपण नियम, परंपरा यांनी बद्ध असतो. पण वाचनाच्या बाबतीत मात्र असा नियम वा परंपरा नाही.

माफ करा, पण मला वाटते की, स्वातंत्र्य उपभोगताना आपले स्वत:वर नियंत्रण असणे आवश्यक आहे. आपले हक्क आपण अडाणीपणाने आणि असहायपणे वाया घालवता कामा नयेत. नाहीतर एखाद्या गुलाबाच्या रोपाला पाणी घालण्यासाठी अर्ध्या घरात पाण्याचं तळं करून ठेवल्यासारखी गत होईल. आपण त्यांना आताच समर्थपणे काटेकोर प्रशिक्षण दिलं पाहिजे. वाचनालयात जाणवणारी ही पहिली मोठी अडचण आहे. याच ठिकाणी..... तेथल्या तेथे... आताच म्हणजे काय ? या सर्वातून नुसता गोंधळ आणि पसारा होण्याचीच शक्यता आहे. या वाचनालयातील कपाटांमध्ये काव्यसंग्रह, कादंबऱ्या, इतिहास, आठवणी, कोश आणि

'अश्लील' पुस्तके, विविधभाषिक पुस्तके, भिन्न जातीच्या, भिन्न वयाच्या, भिन्न स्वभावाच्या स्त्रीपुरुषांनी लिहिलेली पुस्तके एकमेकांशेजारी गुण्यागोविंदाने नांदताहेत आणि वाचनालयाच्या बाहेर गाढवं ओरडताहेत, बायका नळावर कुचाळक्या करताहेत, घोडे शेतांमधून दौडताहेत. मग आपण सुरुवात तरी कुठून कशी करायची? या सगळ्या कोलाहलातून निवांतपणा कसा मिळवायचा आणि जे आपण वाचतो त्याच्यापासून सखोल, व्यापक आनंद कसा मिळवायचा?

पुस्तकांमध्ये चरित्रे, काव्ये, कादंबऱ्या असे विभाग असल्याने त्यांचे वर्गीकरण करणे सोपे आहे. आणि प्रत्येकाकडून आपली अपेक्षा कोणती हे ठरवणे सोपे आहे असे आपल्याला वाटते. पण फारच थोड्या लोकांना पुस्तकांमधील दडलेलं काहीतरी शोधता येतं, मिळवता येतं. पुस्तकांकडे जेव्हा आपण वळतो तेव्हा आपल्या मनातील विचार अस्पष्ट असतात. मन:स्थिती द्विधा असू शकते, त्यामुळे काल्पनिक पुस्तकांकडून आपण वास्तवाची अपेक्षा करतो; कविता खोटी असते असंच आपल्याला वाटतं. चरित्रं म्हणजे केवळ स्तुतिपाठ असतात असंही वाटतं आणि आपल्या मनातल्या समजुतीनुसारच इतिहास लिहिला गेलाय असं वाटतं. जर आपण आपल्या मनातल्या अशा सगळ्या पूर्वग्रहांना बाजूला सारून वाचायला लागलो तर ती खरी कौतुकास्पद सुरुवात असते. आपल्या समोरच्या (पुस्तकाच्या) लेखकाला आपण हुकूम सोडू नये तर आपण त्याच्याशी समरस व्हावं. त्याच्याबरोबरचा सहकारी व्हावे आणि त्याच्या चुकांमध्येही सामील होण्याचा आपण प्रयत्न करावा. जर तुम्ही मागेच राहिलात, सुरुवातीपासूनच स्वत:ला दूर ठेवत टीका करीत राहिलात तर तुम्ही वाचत असलेल्या पुस्तकापासून संपूर्ण फायदा तुम्हाला मिळू शकत नाही. त्या फायद्याची प्राप्ती करून घेण्यात तुम्ही स्वत:च एक घोंड ठरता. त्याऐवजी शक्य तेवढ्या खुल्या मनाने, व्यापक दृष्टीने त्या पुस्तकाला सामोरे जा. मग अगदी पहिल्या वाक्यापासून सूक्ष्म बारकावे, छोट्यां छोट्या आनंददायी जागाही तुम्हाला खुणावतील आणि एका संपूर्णपणे वेगळ्या, इतरांपासून भिन्न अशा व्यक्तिमत्वाच्या सहवासात आपण आहोत असे तुम्हाला जाणवेल. तुम्ही त्या पुस्तकात स्वत:ला बुडवून घ्या, स्वत: त्याच्याशी ओळख करून घ्या, मग लौकरच तुमच्या लक्षात येईल की आपल्या हातातल्या पुस्तकाचा लेखक आपल्याला निश्चितपणे काहीतरी भरीव देतोय, देण्याचा निदान प्रयत्न तरी करतोय. एखादी कादंबरी कशी वाचावी याचा विचार करताना लक्षात येतं की, कादंबरीची रचना एखाद्या इमारतीसारखी असते. तिची अनेक प्रकरणं म्हणजे एकावर एक रचलेल्यां विटाच असतात. अर्थात विटांपेक्षा शब्द हे अधिक सूक्ष्म असतात, समजायला कठीण असतात. एखादी गोष्ट पाहाण्यापेक्षा ती गोष्ट 'वाचणं' ही अधिक गुंतागुंतीची, दीर्घ प्रक्रिया असते. एखादा कादंबरीकार नेमकं काय करतो, त्याच्या लेखनाचे घटक कोणते हे समजून घेण्यासाठीचा चटकन दिसणारा मार्ग म्हणजे वाचण्यापेक्षा 'लिहिणे.' त्या शब्दांमुळे हे निर्माण होणारे धोके, येणाऱ्या अडचणी याबाबतीत आपणच आपले प्रयोग करीत राहाणे. एखाद्या घटनेचा आपल्या मनावर उमटलेला वैशिष्ट्यपूर्ण ठसा आठवून पाहा. समजा एखाद्या रस्त्याच्या कोपऱ्यावरून वळताना तुम्हांला दोन

माणसं बोलत असलेली दिसली. झाड जरासं हलत होतं. रस्त्यावरच्या दिव्याचा प्रकाश कमीजास्त होत होता, त्या दोघांच्या बोलण्याचा सूर तसा विनोदी असला तरी त्यात कारुण्याची छटा मिसळलेली होती. हे सारं दृश्य, संपूर्ण चित्र त्या एका क्षणात एकवटलेलं होतं जणू !

पण ज्यावेळी तुम्ही हे चित्र शब्दांमध्ये पकडायला जाता तेव्हा तुमच्या लक्षात येतं की त्या चित्राचे असंख्य ठसे एकमेकांना छेद देताहेत. त्यातले काही आपल्याला महत्त्वाचे वाटतात, काही धूसर असतात. लेखनप्रक्रियेत कदाचित काही ठसे तुम्ही हरवून टाकाल किंवा त्या भावनेला चिमटीत पकडूही शकाल. मग आता तुमच्या या चितारलेल्या, खाडाखोड केलेल्या कागदांवरून तुमची नजर तुम्ही एखाद्या श्रेष्ठ कादंबरीकाराच्या आरंभीच्या पानांकडे वळवा. उदा. डॅनियल डिफो, जेन ऑस्टिन किंवा थॉमस हार्डी. आता त्यांच्या कसबाची जाणीव तुम्हाला अधिक चांगल्या प्रकारे होईल. ह्या कादंबऱ्या वाचताना आपण केवळ एका वेगळ्या व्यक्तिमत्वाच्या सान्निध्यात असतो असे नाही, तर आपण एका निराळ्या जगातच वावरत असतो. म्हणूनच रॉबिन्सन क्रूसो वाचताना सरळ रस्त्याने जात असलो तरी दमछाक झाली असं वाटतं. एका पाठोपाठ एक गोष्टी घडत असतात. त्या घटना आणि त्यांचा क्रमच ही दमछाक करायला पुरेसा असतो.

खुली हवा आणि साहस हे डॅनियल डिफोच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचं असतं, तर जेन ऑस्टिनला मात्र या गोष्टीचं मुळीच महत्त्व वाटत नाही. तिची कादंबरी वाचताना आपण दिवाणखान्यात शिरतो, माणसं गप्पा मारत असतात, त्यांच्या संवादरूपी लोलकातून त्यांच्या व्यक्तिमत्वाचे विविध पैलू प्रकाशित होत असतात. दिवाणखान्यातल्या या गप्पांशी, त्यातल्या प्रतिबिंबांशी जुळवून घेत असतानाच जर आपण हार्डीची कादंबरी हातात घेतली तर पुन्हा एकदा कोलांटी उडी घेतल्यासारखं सगळं जग फिरतं. आपल्या आजूबाजूला वैराण प्रदेश असतो आणि माथ्यावर तारे असतात. आता आपल्या मनाच्या तळचा भाग वर येतो. केवळ एकांतात आपलं स्वरूप उघड करणारी मनाची काळीकुट्ट बाजू आपल्यासमोर प्रकटते. लोकांच्या सान्निध्यात असताना धारण केलेला, आपल्या उजळ प्रतिमेचा मुखवटा गळून पडतो. आता आपलं नातं माणसांशी न राहाता निसर्ग, नियती यांच्याशी जडतं. जरी ही सारी मनोविश्वं एकमेकांपासून अलग असली तरी प्रत्येक विश्वाची आपली अशी एक अंतर्गत संगती असते. या प्रत्येक विश्वाचा निर्माता स्वतःच्या दृष्टिकोनाशी, आपणच निर्माण केलेल्या नियमांशी प्रामाणिक असतो. हे श्रेष्ठ कादंबरीकार आपल्यावर कितीही मानसिक ताण आणत असले तरी ते आपल्याला गोंधळवून टाकीत नाहीत. पण कनिष्ठ दर्जाचे लेखक मात्र एकाच पुस्तकात भिन्न प्रकारची वास्तवं एकत्रित करून आपल्याला गोंधळवून टाकतात. अशाप्रकारे एका थोर कादंबरीकाराकडून दुसऱ्याकडे वळणं–(उदा० जेन ऑस्टिननंतर हार्डी वाचणं किंवा पिकॉकनंतर ट्रॉलॉप, स्कॉटनंतर मेरेडिथ) म्हणजे स्वतःला समूळ उपटून दुसरीकडे फेकणं, आपल्या मनाला दोन टोकांच्या परिस्थितीमध्ये सामावून घेण्याचा प्रयत्न करणं असतं. त्यामुळेच कादंबरीवाचन ही एक गुंतागुंतीची, कष्टसाध्य

अशी कला आहे असं वाटतं. त्यासाठी तुमच्याजवळ अत्यंत सूक्ष्म असं संवेदनक्षम मन हवं, शिवाय धीट अशी, कुठेही पोचू शकणारी, निर्भय कल्पनाशक्ती हवी. तरच तो थोर कलावंत तुम्हाला जे काही देतोय त्याचा तुम्ही पूर्ण उपयोग करू शकाल.

एकजिनसीपणाचा अभाव असणारी, कपाटात एकमेकांशेजारी हारीने मांडलेली अनेक पुस्तकं पाहिली की, तुमच्या लक्षात येईल, यापैकी कुणाला क्वचितच 'श्रेष्ठ कलावंत' असं संबोधता येईल. क्वचितच त्यातील एखाद्या पुस्तकाला 'कलाकृती' असं म्हणता येईल. उदा० 'ही पाहा चरित्रं- आत्मचरित्रं ! ती आहेत मोठमोठ्या लोकांची, ज्यांची स्मृतीही आता विस्मृतीत गेली आहे. ज्यावेळी अशी पुस्तके कादंबऱ्यांच्या आणि काव्यसंग्रहांच्या खांद्याला खांदा घासत उभी आहेत असं लक्षात येतं, तेव्हा ती 'कलाकृती' नाहीत म्हणून केवळ आपण त्याचं वाचन करायचं नाही का? का ती वाचत असताना आपण वेगळ्याच अपेक्षा ठेवून वेगळ्याच प्रकारे ती वाचायची? एखाद्या संध्याकाळी आपण एखाद्या घरासमोरून जात असतो. त्या घरात दिवेलागण झालेली असते. पण पडदे सरकवलेले नसल्याने घरातील लोकांच्या हालचाली सहज नजरेस पडतात. मानवी जीवनाबद्दल मनी उद्भवणारं सहज कुतूहल आपल्या मनात त्यावेळी जागं होतं. असं कुतूहल शमविण्यासाठी आपण ही चरित्रं, आत्मचरित्रं वाचावीत का? मग आपण त्या घरातील लोकांच्या आयुष्यांचा अंदाज घेत राहातो. तिथं नोकरांमधील कुजबूज चालू असते. घरातील गृहस्थ जेवताना दिसतो. घरातील तरुण मुलगी मेजवानीला जाण्याची तयारी करीत असते. एखादी वृद्धा खिडकीजवळ बसून विणकाम करीत असते. ते पाहून मनात येतं, कोण असतील ही माणसं? त्यांची नावं काय असतील? कोणता व्यवसाय करत असतील? त्यांच्या आयुष्यातले चढउतार कोणते कसे असतील? काय विचार करीत असतील ते?

चरित्रं-आत्मचरित्रं या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरं देतात,अशा ओझरत्या दिसलेल्या अपरिचित घरांवर, व्यक्तींवर प्रकाश टाकतात. चरित्रं, आत्मचरित्रं आपल्याला अशा माणसांची आयुष्यं उलगडून दाखवतात, त्यांचं दैनंदिन जीवनं, त्यांचं खाणंपिणं, त्यांचे कष्ट, संघर्ष, हर्षामर्ष, त्यांची यशापयशं या साऱ्याचं दर्शन घडवतात. कधीकधी हे सारं पाहात असतानाच ते घराचं दृश्य धूसर होतं. घराच्या लोखंडी जाळ्या दृष्टीला दिसेनाशा होतात आणि आपण समुद्रावर उभे असतो. कशाचा तरी शोध घेत मुशाफिरीला निघालेले, संघर्ष करीत असणारे आदिमानवाचे वंशज किंवा सैनिक असतो, आणि मोठमोठ्या मोहिमांमध्ये भाग घेत असतो. जरी आपण इथे इंग्लंडमध्ये, अगदी लंडनमध्ये राहायचं ठरवलं तरी दृश्य बदलतं, रस्ते अरुंद होतात,घरं लहान होतात- आक्रसतात; त्या घरांची तावदानं चौकोनांसारखी असतात, आजूबाजूला दुर्गंधी असते. डोने नावाच्या कवीला अशाच एका घरातून बाहेर हाकलून दिले गेल्याचे आपल्याला आठवते. त्या घराच्या भिंती इतक्या पातळ होत्या की त्या घरातल्या मुलांचा रडण्याचा आवाज आरपार जाई. त्या डोनेबरोबर आपण त्याच्या पुस्तकात वर्णन केलेल्या रस्त्यावरून चालू लागतो. तो रस्ता ट्विकनहॅमकडून, लेडी बेडफोर्ड पार्ककडे वळतो. हे उद्यान प्रतिष्ठितांची, कवींची

भेटण्याची जागा म्हणून प्रसिद्ध होतं. मग खालच्या बाजूला असणाऱ्या विल्टन या भल्याथोरल्या घराकडे, उपनगराकडे वळताना तिथे आपल्याला सिडने त्याच्या बहिणीला 'अर्काडिया' वाचून दाखवताना ऐकू येतो. आपण त्या प्रसिद्ध प्रणयकथेतील गुंत्यात अडकतो. त्या कथेत मौन धारण करून बसलेल्या धूर्त लोकांशी आपली भेट होते. मग पुन्हा उत्तरेकडे वळून आपण लेडी पेमब्रोक, अॅन क्लिफोर्ड यांच्यासमवेत शुष्क, रुक्ष प्रदेशात प्रवास करू लागतो. एखाद्या वेळी शहरातून हिंडताना, काळसर, मखमली पोषाख केलेला गॅब्रिएल हार्वे, स्पेन्सरशी काव्याबद्दल वाद घालताना आपल्याला दिसतो आणि मग त्यातच बुडून आपण आपल्या आनंदाला जरासा आवर घालतो. एलिझाबेथकालीन लंडनमध्ये चाचपडत चालणे, त्यातील अंधाराशी अडखळणे, वैभवाने दिपून जाणे यासारखी दुसरी आकर्षक, मोहक गोष्ट कोणती? पण आपल्याला तिथेच थांबायचं नाहीये. टेंपल, स्विफ्ट, सेंट जॉन यांच्या कलाकृती आपल्याला खुणावताहेत. त्यांच्या कलाकृतीतील पात्रांच्या स्वभाववैशिष्ट्यांचा मागोवा घेण्यात, त्यांची गुंतागुंत सोडवण्यात आपले तासन्तास निघून जातात. असं करताना जेव्हा आपली दमछाक होते तेव्हा आपण थोडासा पाय मोकळा करू शकतो. हिरेजडित आभूषणं ल्यालेल्या, काळी वस्त्रं परिधान केलेल्या या स्त्रीला ओलांडून आपण सॅम्युएल जॉन्सन, गोल्डस्मिथ, गॅरिक यांच्याकडे वळू शकतो. त्याचाही कंटाळा आला तर आपण एकदम आपली विचारवाहिनी बदलून वॉल्टेअर, दिदेरो, मॅडम-द-डिफन्द यांच्याकडे वळावं आणि पुन्हा इंग्लंड, ट्विकनहॅमला यावं- कधीकधी तीच स्थळं, तीच नावं कशी पुनरावृत्त होतात नाही? याच ट्विकनहॅमला आधी लेडी बेडफोर्डचं तें उद्यान होतं. नंतर तिथेच कवी पोप राहिले होते. मग आपण 'स्ट्रॉबेरी हिल्समधील' 'वॉलपोल'च्या घरापाशी येतो. 'वॉलपोल' आपल्याला अनेक नव्या ओळखी करून देत असतं. इथे भेट देण्यासारखी कितीतरी घरं आहेत आणि ज्यांची दारं ठोठावण्यापूर्वी आपण जरा घुटमळावं अशीही कितीतरी घरं आहेत. उदा; मिस बेरीचं घर पाहाता पाहाता थॅकरे दिसू लागतो. वॉलपोलनं जिच्यावर प्रेम केलं त्या स्त्रीचा थॅकरे मित्र आहे. इंग्लिश साहित्यात अशाप्रकारे विहार करताना एका मित्राकडून आपण दुसऱ्यापर्यंत पोचतो, एका उद्यानातून जाताना दुसरं उद्यान भेटतं. एखादं घर परिचित होता होताच दुसरंही त्यामुळे ओळखीचं होतं आणि आपण एका टोकाकडून दुसऱ्या टोकापर्यंत पोचतो. मग आपल्याला वर्तमानाची जाणीव होते- अर्थात आतापर्यंत घालवलेल्या क्षणांपासून हे आताचे, वर्तमानकालीन क्षण आपण अलग करू शकलो तर !

ह्या अशा व्यक्तींची आयुष्यं जाणून घेण्याचा, त्यांचा पत्रव्यवहार आकलन करून घेण्याचा हा एक मार्ग आहे. भूतकालातील अनेक दालनांच्या खिडक्या ते आपल्यापुढे उघडतात. त्या प्रसिद्ध पण मृत व्यक्तींच्या परिचित सवयी, आपण पुन्हा जाणून घेऊ शकतो. असा भास होतो की आपण त्या सर्वांच्या निकट उभे आहोत, त्यांची रहस्ये जाणून घेऊ शकतोय आणि मग नकळत आपण त्या लेखकाचं एखादं नाटक किंवा काव्य उघडतो आणि पाहातो की, या लेखकाच्या सहवासात त्या नाटकाचा, काव्याचा काही वेगळा अर्थ आपल्याला प्रतीत होतोय





का? अर्थात यामुळे इतर काही प्रश्न उभे राहातात. एखाद्या पुस्तकावर लेखकाच्या जीवनाचा कितपत परिणाम होतो? त्या व्यक्तिमत्त्वाने आपल्या मनात जी सहसंवेदना, करुणा जागृत केलेली दिसते, तिचा प्रवाह आपण तसाच वाहू द्यायचा की अडवायचा? कारण त्या लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाबद्दलचे शब्द अतिशय भावनापूर्ण, परिणामकारक असतात.

जेव्हा आपण पत्रं, चरित्रं वाचतो तेव्हा हे असे प्रश्न मनावर दडपण आणतात. पण त्यांची उत्तरं आपली आपल्यालाच द्यावी लागतात. कारण संपूर्णपणे वैयक्तिक अशी ही गोष्ट असते. इतक्या खाजगी गोष्टीत इतरांच्या अग्रक्रमांनुसार आपण चालत राहणं अनेकदा धोकादायक असतं.

पण ही पुस्तकं आपण दुसऱ्याही एका हेतूने वाचू शकतो. साहित्यिक दृष्टिकोनातून किंवा प्रसिद्ध व्यक्तींशी ओळख करून घेण्याच्या, त्यांना जाणून घेण्याच्या इच्छेनेच ही पुस्तकं वाचली पाहिजेत असं नाही. त्याऐवजी स्वत:ची निर्माणशक्ती जरा ताजीतवानी व्हावी, तिचा थोडासा उपयोग व्हावा म्हणून सुद्धा अशी पुस्तकं वाचावीत.

त्या पुस्तकांच्या रांगेच्या उजव्या हाताला एक खिडकी आहे ना ? मग जरा वेळ वाचन थांबवून त्या खिडकीतून बाहेर बघताना मजा नाही का वाटणार ? बाहेर दिसणारं दृश्य आपल्या संदर्भाशी कदाचित विसंगत असेल, त्यातील हालचाली स्थायी स्वरूपाच्या पण अजाणता होत असतील. तिथे शेतातून उड्या मारणारं तट्टू असेल, विहिरीवर पाणी शेंदणारी स्त्री असेल, आपल्या मानेला झटके देऊन, तीव्र सुरात ओरडणारं गाढव असेल. कोणत्याही ग्रंथसंग्रहालयाचा बहुतांश भाग म्हणजे स्त्री– पुरुषांच्या, प्राण्यांच्या आयुष्यातील प्रवाही क्षणांच्या केवळ नोंदी असतात. साहित्य जितकं पुरातन होत जातं, त्याचं वय वाढत जातं, तितका त्याच्यातील हा कचऱ्याचा ढीग वाढत जातो. विनाश पावलेल्या, अदृश्य क्षणांची ती नोंद असते. इथे नष्टप्राय, विस्मृत आयुष्याची कहाणी अगदी चाचरत, अडखळत आणि क्षीण सुरात सांगितलेली असते, पण तरीही तुम्ही या कचऱ्यातून आनंद शोधायचा ठरवला तर मानवी जीवन घडवणारे, काही अवशेष सापडतील आणि तुम्हाला चकित करून सोडतील. एखादंच पत्र आपल्यासमोर केवढा व्यापक पट उभा करेल ! काही वाक्यं मोठा आशय सूचित करतील. कधीतरी एखादी कहाणी पुढे येईल पण तिच्यात अप्रतिम विनोद, कारुण्य आणि जीवनाची समग्रताही व्यक्त होत असेल. ती वाचताना असं वाटेल की एखादा श्रेष्ठ कादंबरीकारच ही कथा लिहितोय. पण प्रत्यक्षात तो टेट विल्किन्सनसारखा एखादा जुना नट असेल, आणि त्याला कॅप्टन जोन्सची विलक्षण गोष्ट आठवत असेल. कदाचित तो आर्थर वेल्स्लीच्या हाताखाली काम करणारा, लिस्बनमधील एखाद्या सुंदर पोरीच्या प्रेमात पडणारा एखादा कनिष्ठ दर्जाचा सेनाधिकारी असेल. एखाद्या वेळेस आपल्या भकास दिवाणखान्यात बसून शिवणकाम करीत असलेली ती मरिया ॲलन असेल. आपण ऱ्हिस (Rishy) बरोबर पळून जाण्याऐवजी डॉ. बर्नींचा सल्ला ऐकला असता तर ? अशा विचाराने (शिवताशिवता) ती सुस्कारत असेल. यातील कोणत्याही गोष्टीला तसं काहीच

मूल्य नाही, त्या अगदी पूर्णपणे दुर्लक्षणीय गोष्टी आहेत. पण तरीही मधूनच असा फालतू लेखनाचा ढीग उपसताना आपण कितीतरी वेळा त्यात गुंतून जातो हे खरंच ! त्यातच आपल्याला भूतकाळात गाडल्या गेलेल्या अंगठ्या, कात्र्या आणि तुटकी नाकंही सापडतात, आपण ते सारे तुकडे जुळवण्याचा प्रयत्न करतो. बाहेर ते शेतातील तट्टू चौखूर उधळलेलंच असतं, ती स्त्री विहिरीवर पाणी शेंदतच असते आणि गाढवही ओरडतच असतं.

हे फालतू लेखन वाचण्याचा आपल्याला शेवटी कंटाळा येतोच. त्या विल्किन्सनला, मरिया ॲलनला किंवा बनबेरीला जे सत्य सांगायचं असतं आणि त्यांना जे पूर्णपणे सांगता येत नाही, ते शोधून काढताना आपल्याला कंटाळा येतो. कलावंताजवळ आवश्यक असणारी निवडशक्ती, कसब त्यांच्याजवळ नसतं. त्यामुळे स्वत:च्या आयुष्यातलं पूर्ण सत्यही ह्या माणसांना नीट सांगता येत नाही. एरवी सुबक होऊ शकणारी आपली स्वत:चीच गोष्ट ही माणसं विरूप करून टाकतात. ते आपल्याला फक्त वस्तुस्थिती सांगतात, पण केवळ वस्तुस्थिती हे ललित वाङ्मयाचं अगदी ओबडधोबड, आकारहीन, कनिष्ठ दर्जाचं रूप आहे. मग अशी अर्धवट विधाने, सर्वसाधारण गोष्टी आपल्याला नकोशा वाटू लागतात. त्यातून दिसणाऱ्या मानवी स्वभावाच्या ओझरत्या छटा शोधायचा प्रयत्न सोडून द्यावासा वाटतो आणि त्याऐवजी ललित वाङ्मयातील शुद्ध सत्याचा, सर्वव्यापी अमूर्ततेचा आस्वाद घ्यावासा वाटू लागतो. अशा प्रकारे आपली मन:स्थिती तयार होते. तिला आता तपशीलांची जाण नसते, ती तीव्र, खोल आणि तरीही सर्वसाधारण होते. तिच्यावर एक नियमित, पुनरावर्ती ठेक्याचा दाब असतो आणि अशा मन:स्थितीचा नैसर्गिक आविष्कार म्हणजे कविता असते. अशावेळी कविताच वाचावीशी वाटते. कधी कधी अशावेळी आपण कविता लिहूही शकतो.

पश्चिमी वाऱ्या, तू येशील केव्हा?
पावसाचे तुषार येतील तेव्हा?
असेल तेव्हा सजण माझ्या मिठीत तर?
मीही असेन माझ्या शय्येवर तर?

कवितेचा परिणाम इतका पक्का आणि थेट असतो की त्याक्षणी त्या कवितेखेरीज दुसरी कोणतीच भावना खरी वाटत नाही. केवढी अथांगता आपल्याला तेव्हा जाणवते! त्यात आपण संपूर्णतया बुडून जाणंही किती आकस्मिक असतं! इथे चिमटीत पकडता येण्याजोगं काही नसतं; आपल्या मनोवारूला अडविणारं काही नसतं. गद्य ललित वाङ्मयाचा परिणाम हळूहळू होतो. त्याचा परिणाम पूर्वनियोजित असतो, पण या चार ओळींचा परिणाम एवढा असतो की, त्या वाचल्यावर त्या कवीचं नाव कळून घेण्याचीही गरज वाटत नाही. डॉनेच्या घराचा किंवा सिडनेच्या सेक्रेटरीचा विचार करावासा वाटतो का? पिढ्यानपिढ्यांमधील सातत्य आणि भूतकाळातील गुंतागुंत यांच्यात त्यावेळी कुणाला गुंतावंसं वाटेल? कवी हा नेहमीच आपला समकालीन असतो. एखाद्या हिंसक आघातानं आपली वैयक्तिक भावना जशी त्याभोवती केंद्रित





होते तसं कविता वाचताना त्याक्षणीचं आपलं अस्तित्व केंद्रित होतं आणि बद्ध होऊन राहातं

हे खरं आहे की, नंतर ती जाणीव आपल्या मनात गोलगोल पसरत जाते. आपल्या मनातील कोपऱ्याकोपऱ्यात असणाऱ्या संवेदनापर्यंत ती कविता पोचते, त्यांना जाग येते, त्या संवेदना प्रतिसाद देऊ लागतात, त्याचे प्रतिध्वनी ऐकू येतात, अन् प्रतिबिंबं मनात उमटू लागतात. कवितेतील तीव्रता भावनांचा मोठा पल्ला गाठू शकते. आपण त्यातील थेटपणा आणि ताकद फक्त अजमावायची.

मी वृक्षासारखा उन्मळेन
माझीच कबर शोधेन
आणि तेव्हा आठवेन,
"मी फक्त दु:खच केले."
याची तुलना या थरथरत्या भावांदोलनाबरोबर करावी.

घटिकापात्रातील वालुकाकणांनी होते गणना पळांची
जसा तासाचा टोल करतो गणना काळाची
कालपट पळापळाने नेतो आम्हाला थडग्यापाशी
आमचं चैतन्य कणाकणानं हिरावून घेतं.
आम्ही मात्र नुसते बघे!
शेवटी सुखाचा काळ आला घरी
ज्याचा शेवट आहे दु:ख.
हे जीवन संघर्षामुळे थकलेलं,
मोजतंय प्रत्येक वालुकाकण,
सुस्कारतंय शेवटच्या कणापर्यंत.
संकटं कधीतरी संपतील असं म्हणत !
कधी कधी आम्ही आमचंच आध्यात्मिक समाधान करू पाहतो.

आम्ही असू वृद्ध वा युवा
आमची नियती आमचं घर
अस्तित्वदर्शक आमचं हृदय
सारंच सोपवलंय अनंता हाती.
त्या हृदयात आहे अमर आशा
प्रयत्न, अपेक्षा अन् इच्छा.
आणि आमच्या अस्तित्वाची खूण.

कवीची शक्ती आपल्याला एकाचवेळी नट बनविते आणि प्रेक्षकही बनवते. एखाद्या पात्राचं चित्रण करताना कवीचा हात इतका सहज आणि सफाईदार असतो की जणूकाही आपल्या हातमोज्यातच आपण नकळत पंजाची हालचाल करावी. मग तो लिअर असो किंवा फॉलस्टॅफ असो. आपला पसारा हवा तेव्हा आवरून घेण्याची, हवा तेव्हा विस्तृत करण्यची, आशय मांडण्याची त्याची शक्ती अफाट असते.

'आपण फक्त तुलना करायची.' पाहा, या शब्दांसरशी ते गुपित उघड झाले आणि वाचनातील खरी गुंतागुंत मान्य केली गेली. पूर्ण आकलनासह आपल्या मनावर होणारा संस्कार फक्त आपला आपण ग्रहण करणे,ही वाचनाच्या प्रक्रियेतील फक्त अर्धीच क्रिया आहे. आपल्याला त्या पुस्तकापासून जर संपूर्ण आनंद मिळवायचा असेल तर या क्रियेला दुसरीची जोड द्यावी लागते.

आपल्या मनावरील या बहुमुखी संस्कारांना आपण न्याय द्यायला हवा. या सगळ्या तरल,प्रवाही संस्कारठशांना आपण नेमका आणि चिरस्थायी आकार द्यायला हवा. पण अर्थातच लगेच,थेटपणे नाही. वाचल्यानंतर मनात उठलेला हा धुरळा जरा खाली बसू दे. मनात चाललेला संघर्ष,उठलेले प्रश्न यांची धार जरा बोथट होऊ दे. तुम्ही चाला, बोला,एखाद्या गुलाबाच्या कोमेजलेल्या पाकळ्या काढून टाका किंवा चक्क झोप काढा. नंतर कधीतरी,अचानकपणे आपली इच्छाही नसताना ते पुस्तक तुमच्याजवळ येईल पण वेगळ्या रूपात. नैसर्गिक संक्रमण असेच होत असते. आता तुमच्या मनाच्या जलाशयाच्या पृष्ठभागावर ते समग्रपणाने तरंगत राहील. हे संपूर्ण पुस्तक आधीच्या तुकड्यातुकड्यांनी वाचलेल्या पुस्तकापेक्षाही निराळे असेल. त्यातला तपशील आता नेमक्या ठिकाणी जाऊन बसलेला असेल. आता त्याचा आरंभापासून अंतापर्यंतचा आकार तुमच्या डोळ्यांपुढे येईल. तो वैराण माळ आहे,एखादा डुक्करखाना आहे की एखादे कॅथिड्रल आहे हे तेव्हाच कळेल. मग आपण त्या पुस्तकाची दुसऱ्या पुस्तकाशी तुलना करू शकू– जशी आपण एका इमारतीची दुसरीशी करतो तशी. पण ही तुलनेची कृती आपल्याला सांगते की तुमचा दृष्टिकोन आता बदललाय. आता आपण त्या लेखकाचे मित्र नाही तर त्याच्या कृतीचे परीक्षक आहोत. मित्राच्या नात्याने आपण त्या कृतीकडे फक्त सहानुभूतीपूर्वक पाहू शकत नाही;तसेच अतिकठोर असे परीक्षक होऊ शकत नाही. पण आपला वेळ खाणारी,आपल्या सहानुभूतीची मागणी करणारी पुस्तकं दोषी नाहीत का? भ्रष्टाचारी,अफरातफर करणाऱ्यांप्रमाणेच खोटी,विकृत पुस्तके लिहिणारे लेखक,आपल्या लेखनाने सारं वातावरण दूषित,दुर्गंधीमय करणारे लेखक समाजविघातक नव्हेत काय? मग आपण आपल्या परीक्षणात कठोर व्हायलाच हवं. प्रत्येक पुस्तकाला आपण त्या प्रकारच्या (कथा,कादंबरी,काव्य यासारख्या) श्रेष्ठ कलाकृतीच्या मानदंडावर घासून पाहिलं पहिजे. मनातल्या मनात आपण वाचलेल्या पुस्तकांवर कठोर टीका करून आपण त्यांची तुलना 'रॉबिन्सन क्रूसो', 'एम्मा','द रिटर्न ऑफ द नेटिव्ह' अशा पुस्तकांशी करावी आणि त्यांना फाशीची शिक्षा द्यावी. नवीन आलेल्या प्रत्येक कादंबरीची तुलना या श्रेष्ठ कादंबऱ्यांशी झाली पाहिजे; तसा त्यांचा अधिकार आहे. तीच अवस्था कवितांबाबत.





आपल्या मनावरील लयीची गुंगी उतरली,शब्दांची जादू कमी झाली की एक संपूर्ण,विस्तृत आकार पुढे येईल.मग त्यांची तुलना 'लिअरशी','फिदरे' किंवा 'प्रिल्यूड'शी करता येईल.अगदी त्यांच्याशीच केली नाही तरी त्या प्रकारच्या दुसऱ्या श्रेष्ठ कृतींशी करता येईल. आधुनिक कवितांमधील,ललित गद्यातील नावीन्य हे वरवरचे असते हे पक्के लक्षात ठेवा. त्यामुळे त्यांचे मूल्यमापन करताना आपण जुन्या कृती ज्या मानदंडाने मापल्या त्यांच्यात थोडासाच फरक करावा लागतो, संपूर्ण बदल करण्याची गरज नसते.

अशा प्रकारे तुलना करणं,परीक्षण करणं हे सोपं असतं असं म्हणणं ढोंगीपणाचं ठरेल. आरंभीच्या वाचनात आपण मनात उमटणाऱ्या असंख्य,गतिमान संस्कारांना मनाची दारं उघडून सहजपणे आत घेतलेलं असतं. पण आता पुन्हा विचार करताना,समोर पुस्तक नसताना वाचणं,मनातील वेगवेगळ्या छायाकृती एकमेकांशेजारी उभ्या करणं,पूर्वीचं विस्तृत वाचन लक्षात ठेवणं आणि मोठ्या जाणकारीनं अशा प्रकारची तुलना जिवंत वाटावी,मार्गदर्शक ठरावी असा प्रयत्न करणं फार कठीण असतं.त्याहीपुढे जाऊन असं म्हणणं कठीण असतं की,"या प्रकारचं हे एकच पुस्तक नाही,पण यात अमूक मूल्ये आहेत, अमूक ठिकाणी ते अयशस्वी झालंय,इथे ते यशस्वी झालंय.हे चांगलं आहे अन् ते वाईट आहे." वाचकाचं हे कर्तव्य पार पाडण्यासाठी आपल्याजवळ कल्पनाशक्ती असावी लागते; अंतर्दृष्टी असावी लागते, अभ्यास असावा लागतो. अशी जाणीव असावी लागते की,आपण अपेक्षित असलेल्या सर्व गोष्टी एकाच मनात सामावणं कठीण आहे. एखाद्या अतिआत्मविश्वासी माणसाजवळ देखील या सामर्थ्याची बीजं सापडणं कठीण आहे.

मग वाचनातला हा भाग,ही तुलनेची क्रिया वगळणं शहाणपणाचं नाही का? पायघोळ अंगरखे आणि लोकरीचे टोप डोक्यावर चढवणाऱ्या,न्यायाधीशांप्रमाणे वागणाऱ्या संग्रहालय–समीक्षकांनाच या पुस्तकाचे संपूर्ण मोल काय हे आपल्याला सांगू देत. पण तेही कठीण! आपण कदाचित् 'करुणा' हे मूल्य अधिक महत्त्वाचं मानू. वाचताना आपण स्वत:चं अस्तित्व त्यात विरघळून टाकण्याचा प्रयत्न करू असं म्हटलं तरी ते सर्वार्थानं खरं नसतं. आपल्या मनात सतत एक सैतान असतो आणि तो कुजबुजतो– "मला हे आवडत नाही,मला ते आवडतं." आणि आपण काही त्याला गप्प करू शकत नाही.यामुळेच आपलं आणि त्या लेखकाचं,कवीचं नातं इतकं जवळचं असतं की त्यात तिसऱ्या कुणाचं अस्तित्व आपल्याला असह्य होतं. जरी ती कलाकृती आपल्याला किळसवाणी वाटली किंवा आपला निकाल चुकीचा असला तरी आपली अभिरुची,आपली जाणीव आपल्याला मार्ग दाखवते.जाणीवेतून आपण शिकतो.आपली विचारशक्ती (वापरल्याशिवाय) आपण दडपून ठेवू शकत नाही. पण जसजसे दिवस जातात तसतशी आपली अभिरुची आपण वळवू शकतो, तिच्यावर नियंत्रण आणू शकतो. काव्ये,ललित,इतिहास,चरित्रं अशा भिन्न साहित्यप्रकारांचं मुक्तपणे वाचन करून जर आपण आपली अभिरुची तृप्त केली असेल, आणि आता वाचन थांबवल्यावर जीवनातील

वैविध्याकडे, विसंगतीकडे लक्षपूर्वक पाहिलं असेल, तर आपल्याला कळेल की आपली आवड थोडीशी बदलतेय. आपल्याला आता वाचनाचा हावरटपणा करण्याची गरज नाही. आपली रुची आता आपल्याला प्रतिसाद देतेय. आता ती विशिष्ट पुस्तकांवर केवळ आपला अभिप्रायच देईल असं नाही तर ती आपल्याला काही पुस्तकांमधील समान वैशिष्ट्यंही जाणवून देईल. ती म्हणेल, "ऐक. याला आपण काय म्हणायचं?" आणि मग ती तुम्हाला 'लिअर' आणि Agamemnon मधील साम्यस्थळे दाखवील. या आपल्या पुस्तकांचा गट तयार करण्याचं साहसदेखील आपण करू शकू. त्याला नाव देऊ शकू आणि आपल्या आकलनाला वळण लावणारा एखादा नियमही बनवू शकू. या निवडीतून आपल्याला दुर्मिळ असा आनंद मिळेल हा मोठाच लाभ होईल. पण तरीही या सामान्य पुस्तकांकडून मुद्दामहून वा आपोआप मोडला जाईल असा नियम करण्यात काय अर्थ? एखाद्या निर्वात पोकळीत राहून वास्तवाशी संपर्क नसणारे नियम करणं नेहमीच सोपं नसतं का? अशा कठीण स्थितीत आपलं मन स्थिर करण्यासाठी, साहित्य या कलेचं मूल्य आपल्यासमोर उजळवून टाकणाऱ्या थोर लेखकांकडे वळणंच उपयुक्त ठरतं. कोलरीज, ड्रायडन किंवा जॉन्सन आपल्या समीक्षेतून, कवी आणि कादंबरीकार आपल्या आशयातून विस्मयजनक रीतीने आनंद देत असतात. आपल्या मनातील अस्पष्ट, धूसर कल्पनांना ते निश्चित रूप देतात. पण ही सारी मंडळी आपल्याला केव्हा मदत करतात? जेव्हा आपल्या वाचनातून प्रश्न उभे राहातात, कोणीतरी सूचना कराव्याशा वाटतात आणि आपण त्यांच्याकडे जातो तेव्हाच! जर आपण त्यांच्या छत्राखाली नुसता घोळका करून राहिलो आणि झोपणाऱ्या बकऱ्यांप्रमाणे आळसावलो तर ते लोक आपल्याला मदत करीत नाहीत. त्यांच्याशी जेव्हा संघर्ष उभा राहील, तेव्हाच त्यांचा अधिकार, कायदा आपल्याला समजेल आणि आपल्याला जिंकेलही.

एखादं पुस्तक वाचताना एवढ्या गोष्टींची गरज आहे असं मी म्हटलं. ते ऐकून तुम्हाला नक्की वाटेल की साहित्य ही फार गुंतागुंतीचीच कला आहे अणि त्यामुळे आयुष्यभर वाचन करून सुद्धा साहित्यसमीक्षेत आपण काही मौल्यवान भर टाकू शकू असं नाही. आपण आपलं वाचक म्हणूनच राहावं. त्यापुढे जाऊन समीक्षक म्हणून मिरविण्याचं दुर्मिळ भाग्य आपल्या नशिबी नाही. पण तरीही आपली वाचक म्हणून काही जबाबदारी आहे. आपली भूमिकाही महत्त्वाची आहे. आपण जे मानदंड निर्माण करतो, जे निर्णय देत असतो, ते आपल्या आजूबाजूला पसरतात आणि लेखकमंडळीपर्यंत पोचतात, कारण लेखक त्याच वातावरणात असतात. एखादा अभिप्राय छापील अक्षरांद्वारा जनतेपुढे आला नाही तरी त्याचा परिणाम होतच असतो. तुमचा अभिप्राय जर सच्चा असेल, त्याला भक्कम बैठक असेल, त्यात तर्कसुसंगती असेल तर तो अभिप्राय फार मौल्यवान ठरतो. विशेषत: सद्यकालीन स्थितीत तो महत्त्वाचा आहे, कारण आता समीक्षा जवळजवळ संपलीच आहे. वधस्तंभाकडे जाणाऱ्या मुक्या जनावरांप्रमाणे पुस्तके आपल्यावरील अभिप्रायांची वाट पाहात रांगेत उभी आहेत. परीक्षणकर्त्यांजवळ आपल्या बंदुकीत

गोळी भरून चाप ओढण्याएवढाच वेळ आहे. त्याचमुळे त्याने सशाऐवजी वाघावर गोळी झाडली, ससाण्याऐवजी एखाद्या पारव्यावर नेम धरला किंवा त्याचा नेम अजिबातच चुकला आणि पलीकडील कुंपणात शांतपणे चरणाऱ्या गरीब गायीला त्याची गोळी लागली, तरी त्या परीक्षणकर्त्याला माफ केले जाईल. वृत्तपत्रातील या अशा बेताल परीक्षणांव्यतिरिक्त जर त्या कलाकृतीबद्दल वेगळा अभिप्राय मिळाला, वेगळी समीक्षा केली गेली तर त्यामुळे लेखनदर्जा सुधारायला मदत नाही का होणार? ती समीक्षा वाचनावर प्रेम करणाऱ्यांनी, हळू आवाजात, अव्यावसायिक पद्धतीने, लेखकाचा सहानुभूतीपूर्वक विचार करून, पण तरीही वस्तुनिष्ठतेने केलेली असेल. जर अशा साधनांनी पुस्तके अधिक सशक्त, अधिक समृद्ध होणार असली, त्यांच्यात वैविध्य येणार असले तर त्या टोकापर्यंत जायलाही काय हरकत आहे?

तरीही प्रश्न उरतोच की हवासा वाटणारा शेवट गाठण्यासाठीच केवळ आपण वाचतो का? काही चांगल्या गोष्टींचा पाठपुरावा त्यांच्यातील चांगलेपणासाठी सुद्धा आपण करीत नाही का? अंतिम सुखासाठी आपण त्यांच्या मागे जात नाही का? वाचन ही गोष्ट अशाच गोष्टींपैकी एक नव्हे का? मला कधीतरी असं स्वप्न पडलं होतं की, आपल्या पापपुण्याचा निवाडा करणाऱ्या त्या चित्रगुप्तापुढे आपण उभे आहोत. मोठमोठे जेते, न्यायाधीश, वकील, मुत्सद्दी आपापली बक्षिसे घेण्यासाठी जमले आहेत. त्यांना मिळालेले मानाचे तुरे, त्यांच्या सन्माननीय पदव्या, चिरस्थायी संगमरवरावर कोरलेली, न पुसता येण्याजोगी त्यांची नावे! आम्ही जेव्हा आपापली पुस्तके खाकेत घट्ट धरून त्याच्यासमोर उभे राहू तेव्हा आम्हाला पाहून, आमचा थोडासा हेवा करीतच चित्रगुप्त आपल्या सहाय्यकाला म्हणेल, ''पाहा. यांना कोणत्याही पुरस्काराची गरज नाही. त्यांना देण्यासाठी इथे आपल्या जवळ काहीच नाही. कारण त्यांनी वाचनावर प्रेम केलंय.''

---

**ऐकलंत का?**

१) पुस्तकाचे परीक्षण केल्याशिवाय मी कोणतेच पुस्तक वाचीत नाही. कारण नाहीतर आपलं मन उगीचच पूर्वग्रह दूषित बनतं.

**–सिडनी स्मिथ.**

२) मला लेखक होणं आवडतं. फक्त अडचण एकच आहे. मला कागद पुढे ओढून लिहिण्याचा कंटाळा आहे.

**– पीटर डी. रायस.**

३) एखाद्या पुस्तकाच्या रचनेबद्दल, लेखनाच्या आकृतीबंधाच्या योजनेविषयी विचार करण्याचा उत्तम वेळ म्हणजे स्वयंपाकघरातील काम करणं. आणि तेही भांडी घासणं.

**–ॲगाथा ख्रिस्ती**

# लेखकाचा परिचय

## प्रेमपुजारी डी. एच्. लॉरेन्स

### श्रीकृष्ण कामत

**एक**

डी. एच्. लॉरेन्सच्या व्यक्तिमत्त्वावर आपला ठसा ठसठसशीतपणे उमटवणारी पहिली स्त्री, लिडीया, लॉरेन्सची जन्मदात्री. मोटक्या चणीची ही बाई स्वाभिमानी होती, निग्रही होती, भोवतालचं जग चाणाक्षपणे जोखून होती. तिच्या बोलण्यात आत्मविश्वास पुरेपूर. त्यात गांवढळ बोलीतला शब्द चुकूनही कधी आढळायचा नाही. नापसंती दर्शवताना तिच्या शब्दांना उपरोधाची धार चढायची. आपल्या दोन्ही बहिणी सुस्थळी पडल्या, आपण मात्र खाणकामगारांच्या खातेऱ्यात येऊन पडलो याची खंत लिडीयाला होती. आपल्या अपेक्षांची पूर्ती आपण करू शकलो नाही याबद्दलचा विषाद तिच्या मनी होता. परिणामी, तिच्या स्वभावात कडवटपणा झिरपत गेला. अवतीभवतीच्या माणसांपेक्षा आपला दर्जा वरचा आहे ही तिची ठाम समजूत तिच्या वागण्याबोलण्यामधून प्रत्यही जाणवत असे आणि तिचा हा शिष्टपणा तिच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना रुचत नसे. तथापि, घरकामातला तिचा नीटस उरक, आपल्या मुलांच्या स्वास्थ्याविषयीची तिची आस्था याबद्दल मात्र त्यांना तिच्याबद्दल आदर वाटत असे.

लिडीयाचं माहेर बीअर्डसॉल. बीअर्डसॉल एकेकाळी सुस्थितीत होते. परंतु, १८३७ च्या मंदीमध्ये लेसचा धंदा डबघाईला आल्यानं त्यांची आर्थिक परिस्थिती जी खालावत गेली ती पुढं कधीच सावरली गेली नाही. लिडीयाचे वडील जॉर्ज हे एक कुशल इंजिनीयर होते. प्रथम कापड गिरण्यात त्यांनी नोकरी केली. नंतर रेल्वेत व केंट परगण्यामधील शीअरनेस येथील गोदीत काम केलं. १८७० मध्ये त्यांना अपघात झाला. ते पांगळे बनले आणि सावरू लागलेल्या बीअर्डसॉलांवर आकाशीची कुऱ्हाड कोसळली. १८७१ मध्ये एकोणीस वर्षांची लिडीया आपल्या दोन बहिणींबरोबर 'नॉटिंगहॅम लेस इंडस्ट्री'चं काम घरी आणून करू लागली. परंतु ही कमाई तुटपुंजी होती. घरखर्च चालवण्यासाठी काही भाडेकरू आपल्या घरात घेणं त्यांना भाग पडलं. परिस्थिती डबघाईला आल्यानं लिडीयाचे वडील निराश झाले, चिडचिडे बनले, स्वत:ची तैनात राखण्याच्या कामी आपल्या लेकींना अष्टौप्रहर राबवू लागले. त्यांच्या या मनमानी वागण्यानं गांजून लिडीयानं मनाशी निश्चय केला, कुठल्याही पुरुषाची मर्जी सांभाळण्यासाठी त्याच्या तालावर नाचानाच करायची नाही आणि या निश्चयाबरहुकूम ती पुढं वागलीही.







शीअरनेसमध्ये असताना वयाच्या तेराव्या वर्षी लिडीयानं विद्यार्थी-शिक्षिकेची नोकरी केली. पण अल्प काळातच तिच्या पदरी अपयश आलं. त्यानंतर तिनं स्वत:च्या घरी शाळा चालवण्याचा प्रयत्न केला. त्यातही तिला यश लाभलं नाही. आपण शिक्षिका होतो याचा अभिमान मात्र तिनं सदैव बाळगला. फक्त आपल्या हुशारीचं चीज होऊ शकलं नाही याचं वैषम्य तिला अखेरपर्यंत सलत राहिलं. तिचं वाचन दांडगं होतं. ती कविता करत असे. तिच्या काही कविता स्थानिक वर्तमानपत्रात प्रसिद्धही झाल्या होत्या. पुरुषांच्या बरोबरीनं बौद्धिक चर्चेत भाग घेणं तिला आवडत असे.

आर्थर लॉरेन्सची भेट होण्यापूर्वी लिडीया नॉटिंगहॅममधील एका सुखवस्तू व्यापाऱ्याच्या मुलाच्या प्रेमात पडली. तिला आशा होती, तो लग्नाची मागणी घालील. पण तसं काही घडलं नाही. पण आपला नवरा कसा असावा याचं चित्र तिनं मनाशी रेखाटलं होतं ते त्या व्यापाऱ्याच्या मुलाबरहुकूम आणि त्याबरहुकूम आर्थर लॉरेन्स तर निश्चितच नव्हता.

आर्थरचे वडील शिंपी होते. खाणकामगारांसाठी ते विजारी शिवत. देहानं आडदांड असलेला हा माणूस 'ॲथलेट' होता. खेळांची त्याला भारी आवड. नाव उत्तमपैकी वल्हवणारा अशी त्याची ख्याती होती. आर्थरचा जन्म १८४६ मधला. नीट लिहिता वाचता यायच्या आधीच त्यानं शाळेला रामराम ठोकला आणि वयाच्या सातव्या वर्षी कोळशाच्या खाणीत कामाला लागला. त्याच्या तिघा भावांनीही त्याचाच मार्ग अनुसरला.

आर्थर लिडीयाला भेटला त्याच्या आत्याच्या घरच्या ख्रिसमस पार्टीला. लाल बुंद गालांचा, दिलखुलास हसणारा, ऐटबाज पोषाखातील रुबाबदार आर्थर लिडीयाच्या मनात भरला. आपल्या वडिलांच्या घरच्या रामरगाड्यातून स्वत:ची सुटका करून घेण्याची ओढ तिला लागली होतीच. तिनं आर्थरशी परिचय करून घेतला. तिच्या सुसंस्कृतपणावर आर्थरही फिदा झाला. वर्षभरानं, २७ डिसेंबर १८७५ रोजी दोघंही विवाहबद्ध झाली. विवाहसमयी त्याचं वय होतं एकोणतीस आणि तिचं चोवीस. त्यांच्या वैवाहिक जीवनाची सुरुवात ईस्टवूडच्या उत्तरेस आठेक मैलावर असलेल्या 'सटन-इन-ॲशफील्ड' येथे झाली. प्रारंभीचे सहा महिने अतिशय सुखाचे होते. त्यानंतर लिडीयाला कळून चुकलं की नवरा म्हणून आपण चुकीच्या माणसाची निवड केली.

लिडीया धार्मिक वृत्तीची होती, नित्यनेमाने चर्चमध्ये जाणारी होती, ख्रिश्चन नीतिमूल्यं जपणारी होती. खाणीच्या खातेऱ्यात उभं आयुष्य सडू देणं तिच्या मध्यमवर्गीय प्रकृतीला मानवण्याजोगं नव्हतं. समाजात प्रतिष्ठा मिळवणं, मानानं जगणं हे तिचं स्वप्न होतं आणि हे स्वप्न प्रत्यक्षात साकार करण्याची तिची जिद्द होती. आणि या साऱ्या प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या गोष्टींबाबत पूर्णपणे बेफिकीर असणाऱ्या पुरुषाशी तिची लग्नगाठ बांधली गेली होती. त्याच्या लेखी पुस्तकं, नीतिमूल्यं, धार्मिक निष्ठा म्हणजे निव्वळ बकवास. खाण, खाणीतले त्याचे सहकारी, त्या सहकाऱ्यांसोबत गुत्यात दारू पिणं, हसणं-खिदळणं, मौज-मजा करणं यातच जीवनाची इतिकर्तव्यता आहे अशी त्याची धारणा होती.

हिवाळ्यात आठवड्याकाठी आर्थरला पाच पौंड मिळत. उन्हाळ्यात कामाची मंदी असल्यामुळं कमाई घटली तरी वर्षात सरासरी दर आठवड्याला पन्नास पंचावन्न शिलींग एवढी त्याची प्राप्ती. त्यातील घरखर्चासाठी तीस शिलींग तो बायकोच्या हाती ठेवत होता. एखाद्या सप्ताहात त्याची कमाई जादा झाली तरी त्यातली एखादी कपर्दिकही बायकोला न देता तो ती उधळून टाकत होता. भविष्यासाठी बचत करणं त्यानं कधी हिशेबात घेतलं नाही, तशी गरज असते हा विचारही त्याच्या मनाला कधी स्पर्शून गेला नाही.

आर्थरची भाषा, त्याचं वागणं रांगडं असलं तरी तो प्रेमळ होता. नवऱ्याला काय हवं नको ते बायकोनं पाहायला हवं ही त्या जमान्यातली सर्वसाधारण अपेक्षा आर्थरनं कधी बाळगली नाही. पहाटे पाचाच्या आधीच तो उठायचा. स्वत:चा नाश्ता स्वत: बनवायचा विस्तव पेटवायचा, त्यावर किटली उकळवत ठेवायचा. मीठ लावून खारवलेल्या डुकराच्या मासाचेच तुकडे हुलपावणं आणि पावाच्या स्लाइसबरोबर ते खाणं ही त्याची मेजवानी होती. ही कामं तो अगदी मन लावून करायचा. ईस्टवूडमधला दुकानदार विली हॉपकीनचं म्हणणं होतं, लिडीयानं आपल्या मुलांवर जेवढी माया केली त्यातली कणभर माया जरी आर्थरच्या वाट्याला आली असती, त्याला जाणून घेण्याचे थोडेसे श्रम तिनं घेतले असते तर त्यांचा संसार खचितच सुखाचा झाला असता.

सटन-इन-ॲशफील्डमधून लॉरेन्स कुटुंब ब्रिन्सलेमध्ये राहायला आले. इथं १८७६-७७ च्या आसपास त्यांचा पहिला मुलगा जॉर्ज जन्मला. अर्नेस्ट आणि एमिली यांचा अनुक्रमे १८७८ आणि १८८२ मध्ये न्यू क्रॉसमध्ये जन्म झाला. त्यानंतर लॉरेन्सांनी ईस्टवूडमधील व्हिक्टोरिया स्ट्रीटवर लाल विटांच्या छोट्या घरात आपलं बिऱ्हाड थाटलं. हे घर हवेशीर होतं. घरातल्या माणसांना पुरेसं होतं. स्वयंपाकघरात सुविधा होत्या. फर्निचर मजबूत आणि देखणं होतं. या घरात डेव्हिड हर्बट लॉरेन्स ११ सप्टेंबर १८८५ रोजी जन्माला आला. त्यानंतर दोन वर्षांनी लॉरेन्सांनी 'द ब्रीच' मध्ये स्थलांतर केलं. खाणकामगारांच्या कुटुंबांसाठी बांधण्यात आलेल्या टेनेमेंटचा तो एक भाग होता. दर आठवड्याला जादा सहा पेन्स देऊन लॉरेन्सांनी घरालगत त्यातल्या त्यात एक मोठी बाग मिळवली होती. परंतु हा व्यवहार फारसा समाधानकारक नव्हता. बागेला एक कुंपण होतं. त्यापल्याड राखेचे डबरे होते. तिथं बाया चकाट्या पिटत बसलेल्या असत, मुलांचं खेळणं-कुदणं चालत असे. पुढल्या खोल्या व बाग अगदी स्वच्छ ठेवण्यात येत असली तरी त्यांचा वापर क्वचितच होत असे. पुढल्या खोलीच्या दारात लहान मुलांचे कपडे, रिबिनी आदी गोष्टी विकण्याचं दुकान थाटलं होतं. परंतु शेजाऱ्यापाजाऱ्यांहून आपण सुसंस्कृत आहोत ही गोष्ट लिडीया विसरू शकत नव्हती, त्यांच्याशी गोडीगुलाबीनं वागणं म्हणूनच तिला जमत नव्हतं. परिणामी, गिऱ्हाइकां-अभावी आपलं दुकान तिला बंद करावं लागलं. आर्थरच्या पगाराव्यतिरिक्त थोडेसे का होईनात पैसे हाती येतील ही तिची आशा धुळीला मिळाली. या घरात ॲडाचा जन्म झाला. लिडीयाचं हे कुसधुणं अपत्य.

खाणकामगाराच्या बायकोला किती कष्ट उपसावे लागतात, कोणते भोग भोगणं तिच्या

शीअरनेसमध्ये असताना वयाच्या तेराव्या वर्षी लिडीयानं विद्यार्थी-शिक्षिकेची नोकरी केली. पण अल्प काळातच तिच्या पदरी अपयश आलं. त्यानंतर तिनं स्वत:च्या घरी शाळा चालवण्याचा प्रयत्न केला. त्यातही तिला यश लाभलं नाही. आपण शिक्षिका होतो याचा अभिमान मात्र तिनं सदैव बाळगला. फक्त आपल्या हुशारीचं चीज होऊ शकलं नाही याचं वैषम्य तिला अखेरपर्यंत सलत राहिलं. तिचं वाचन दांडगं होतं. ती कविता करत असे. तिच्या काही कविता स्थानिक वर्तमानपत्रात प्रसिद्धही झाल्या होत्या. पुरुषांच्या बरोबरीनं बौद्धिक चर्चेत भाग घेणं तिला आवडत असे.

आर्थर लॉरेन्सची भेट होण्यापूर्वी लिडीया नॉटिंगहॅममधील एका सुखवस्तू व्यापाऱ्याच्या मुलाच्या प्रेमात पडली. तिला आशा होती, तो लग्नाची मागणी घालील. पण तसं काही घडलं नाही. पण आपला नवरा कसा असावा याचं चित्र तिनं मनाशी रेखाटलं होतं ते त्या व्यापाऱ्याच्या मुलाबरहुकूम आणि त्याबरहुकूम आर्थर लॉरेन्स तर निश्चितच नव्हता.

आर्थरचे वडील शिंपी होते. खाणकामगारांसाठी ते विजारी शिवत. देहानं आडदांड असलेला हा माणूस 'ॲथलेट' होता. खेळांची त्याला भारी आवड. नाव उत्तमपैकी वल्हवणारा अशी त्याची ख्याती होती. आर्थरचा जन्म १८४६ मधला. नीट लिहिता वाचता यायच्या आधीच त्यानं शाळेला रामराम ठोकला आणि वयाच्या सातव्या वर्षी कोळशाच्या खाणीत कामाला लागला. त्याच्या तिघा भावांनीही त्याचाच मार्ग अनुसरला.

आर्थर लिडीयाला भेटला त्याच्या आत्याच्या घरच्या ख्रिसमस पार्टीला. लाल बुंद गालांचा, दिलखुलास हसणारा, ऐटबाज पोषाखातील रुबाबदार आर्थर लिडीयाच्या मनात भरला. आपल्या वडिलांच्या घरच्या रामरगाड्यातून स्वत:ची सुटका करून घेण्याची ओढ तिला लागली होतीच. तिनं आर्थरशी परिचय करून घेतला. तिच्या सुसंस्कृतपणावर आर्थरही फिदा झाला. वर्षभरानं, २७ डिसेंबर १८७५ रोजी दोघंही विवाहबद्ध झाली. विवाहसमयी त्याचं वय होतं एकोणतीस आणि तिचं चोवीस. त्यांच्या वैवाहिक जीवनाची सुरुवात ईस्टवूडच्या उत्तरेस आठेक मैलावर असलेल्या 'सटन-इन-ॲशफील्ड' येथे झाली. प्रारंभीचे सहा महिने अतिशय सुखाचे होते. त्यानंतर लिडीयाला कळून चुकलं की नवरा म्हणून आपण चुकीच्या माणसाची निवड केली.

लिडीया धार्मिक वृत्तीची होती, नित्यनेमाने चर्चमध्ये जाणारी होती, ख्रिश्चन नीतिमूल्यं जपणारी होती. खाणीच्या खातेऱ्यात उभं आयुष्य सडू देणं तिच्या मध्यमवर्गीय प्रकृतीला मानवण्याजोगं नव्हतं. समाजात प्रतिष्ठा मिळवणं, मानानं जगणं हे तिचं स्वप्न होतं आणि हे स्वप्न प्रत्यक्षात साकार करण्याची तिची जिद्द होती. आणि या साऱ्या प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या गोष्टींबाबत पूर्णपणे बेफिकीर असणाऱ्या पुरुषाशी तिची लग्नगाठ बांधली गेली होती. त्याच्या लेखी पुस्तकं, नीतिमूल्यं, धार्मिक निष्ठा म्हणजे निव्वळ बकवास. खाण, खाणीतले त्याचे सहकारी, त्या सहकाऱ्यांसोबत गुत्यात दारू पिणं, हसणं-खिदळणं, मौज-मजा करणं यातच जीवनाची इतिकर्तव्यता आहे अशी त्याची धारणा होती.

हिवाळ्यात आठवड्याकाठी आर्थरला पाच पौंड मिळत. उन्हाळ्यात कामाची मंदी असल्यामुळं कमाई घटली तरी वर्षात सरासरी दर आठवड्याला पन्नास पंचावन्न शिलींग एवढी त्याची प्राप्ती. त्यातील घरखर्चासाठी तीस शिलींग तो बायकोच्या हाती ठेवत होता. एखाद्या सप्ताहात त्याची कमाई जादा झाली तरी त्यातली एखादी कपर्दिकही बायकोला न देता तो ती उधळून टाकत होता. भविष्यासाठी बचत करणं त्यानं कधी हिशेबात घेतलं नाही, तशी गरज असते हा विचारही त्याच्या मनाला कधी स्पर्शून गेला नाही.

आर्थरची भाषा, त्याचं वागणं रांगडं असलं तरी तो प्रेमळ होता. नवऱ्याला काय हवं नको ते बायकोनं पाहायला हवं ही त्या जमान्यातली सर्वसाधारण अपेक्षा आर्थरनं कधी बाळगली नाही. पहाटे पाचाच्या आधीच तो उठायचा. स्वत:चा नाश्ता स्वत: बनवायचा विस्तव पेटवायचा, त्यावर किटली उकळवत ठेवायचा. मीठ लावून खारवलेल्या डुकराच्या मासाचे तुकडे हुलपावणं आणि पावाच्या स्लाइसबरोबर ते खाणं ही त्याची मेजवानी होती. ही कामं तो अगदी मन लावून करायचा. ईस्टवूडमधला दुकानदार विली हॉपकीनचं म्हणणं होतं, लिडीयानं आपल्या मुलांवर जेवढी माया केली त्यातली कणभर माया जरी आर्थरच्या वाट्याला आली असती, त्याला जाणून घेण्याचे थोडेसे श्रम तिनं घेतले असते तर त्यांचा संसार खचितच सुखाचा झाला असता.

सटन-इन-अ‍ॅशफील्डमधून लॉरेन्स कुटुंब ब्रिन्सलेमध्ये राहायला आले. इथं १८७६-७७ च्या आसपास त्यांचा पहिला मुलगा जॉर्ज जन्मला. अर्नेस्ट आणि एमिली यांचा अनुक्रमे १८७८ आणि १८८२ मध्ये न्यू क्रॉसमध्ये जन्म झाला. त्यानंतर लॉरेन्सांनी ईस्टवूडमधील व्हिक्टोरिया स्ट्रीटवर लाल विटांच्या छोट्या घरात आपलं बिऱ्हाड थाटलं. हे घर हवेशीर होतं. घरातल्या माणसांना पुरेसं होतं. स्वयंपाकघरात सुविधा होत्या. फर्निचर मजबूत आणि देखणं होतं. या घरात डेव्हिड हर्बट लॉरेन्स ११ सप्टेंबर १८८५ रोजी जन्माला आला. त्यानंतर दोन वर्षांनी लॉरेन्सांनी 'द ब्रीच' मध्ये स्थलांतर केलं. खाणकामगारांच्या कुटुंबांसाठी बांधण्यात आलेल्या टेनेमेंटचा तो एक भाग होता. दर आठवड्याला जादा सहा पेन्स देऊन लॉरेन्सांनी घरालगत त्यातल्या त्यात एक मोठी बाग मिळवली होती. परंतु हा व्यवहार फारसा समाधानकारक नव्हता. बागेला एक कुंपण होतं. त्यापल्याड राखेचे डबरे होते. तिथं बाया चकाट्या पिटत बसलेल्या असत, मुलांचं खेळणं-कुदणं चालत असे. पुढल्या खोल्या व बाग अगदी स्वच्छ ठेवण्यात येत असली तरी त्यांचा वापर क्वचितच होत असे. पुढल्या खोलीच्या दारात लहान मुलांचे कपडे, रिबिनी आदी गोष्टी विकण्याचं दुकान थाटलं होतं. परंतु शेजाऱ्यापाजाऱ्यांहून आपण सुसंस्कृत आहोत ही गोष्ट लिडीया विसरू शकत नव्हती, त्यांच्याशी गोडीगुलाबीनं वागणं म्हणूनच तिला जमत नव्हतं. परिणामी, गिऱ्हाइकां-अभावी आपलं दुकान तिला बंद करावं लागलं. आर्थरच्या पगाराव्यतिरिक्त थोडेसे का होईनात पैसे हाती येतील ही तिची आशा धुळीला मिळाली. या घरात अ‍ॅडाचा जन्म झाला. लिडीयाचं हे कुसधुणं अपत्य.

खाणकामगाराच्या बायकोला किती कष्ट उपसावे लागतात, कोणते भोग भोगणं तिच्या

नशिबी असतं याची पुरेपूर कल्पना एव्हाना लिडीयाला आलेली होती. परंतु प्रतिकूल परिस्थितीनं ती डगमगून गेली नाही. रांगड्या नवऱ्यासमोरही तिनं कधी नमतं घेतलं नाही.

आर्थर कामावरून घरी यायचा तो कोळशाच्या भुग्यानं माखून. घरात पाऊल टाकलं की तो हात तेवढे धुवायचा आणि जेवायला बसायचा. त्याची ही अस्वच्छता पाहून लिडीया सणकायची. पण तिच्या अंगाचा रागानं तिळपापड व्हायचा जेव्हा दारू पिऊन तो घरात प्रवेश करायचा तेव्हा. लग्न करतेसमयी दारूला स्पर्श न करण्याची शपथ त्यानं लिडीया-समोर घेतली होती. पण ती शपथ फार दिवस जाऊ न देता त्यानं बिनदिक्कतपणे मोडली होती. पैशांची चणचण सदाची असूनही त्यानं पैशाची दारूपायी उधळपट्टी करावी याची तिला मनस्वी चीड होती. तिच्या जिभेचा पट्टा सुरू व्हायचा. पबमध्ये जाऊन मित्रांच्या संगतीत, गप्पांची मैफल जमवत दारूचे घुटके घेणं हा आर्थरचा षौक असला तरी तो दारुड्या नव्हता. आपल्या पगाराचं पाकीट इमाने इतबारे तो घरी घेऊन यायचा. घरच्या कामातही तो कधी टंगळमंगळ करत नसे. बायकोच्या असल्या तिखट सरबत्तीमुळं त्याच्या-मधल्या हिंसक वृत्तीला जागं केलं. ही वृत्ती वर्षावर्षागणिक अधिकाधिक निर्दय बनत गेली. ॲडा सांगते, 'झोकांड्या खात जरी तिचे वडील घरी कधी आले तरी त्यांच्यात नरमाई असायची, अपराध घडल्याची जाणीवही असायची. राग अनावर होऊन आपल्या बायकोवर हात टाकण्यास तो प्रवृत्त होत होता याला कारणीभूत होती त्याच्या बायकोची उपरोधिक वाणी.'

आपल्या नवऱ्याला नीट मार्गी लावणं केवळ अशक्य आहे याची पुरती खात्री झाल्या-नंतर लिडीयानं आपली सारी शक्ती आपल्या मुलांच्या संगोपनाच्या कामी खर्ची घातली. त्यांचं जेवणखाण, कपडालत्ता याकडे नीट लक्ष पुरवू लागली. दारिद्र्याचे चटके त्यांना लागू न देण्यासाठी धडपडू लागली. त्यांच्यावर चांगले संस्कार व्हावेत यासाठी झटू लागली. त्यांना लिहावाचायची गोडी लावता लावता आत्मप्रतिष्ठेने जगण्याचे पाठ त्यांना देऊ लागली. आपल्या मुलांनी चांगलं शिकावं,बकाल ईस्टवूड सोडून मोठ्या शहरी जावं, पैसा कमवावा, सामाजिक प्रतिष्ठा मिळवावी, मानानं जगावं हे सातत्यानं त्यांच्या मनावर ठसवू लागली. त्यांनी आपल्या बरोबरीनं खाणीत उतरून काम करावं या आर्थरच्या दुराग्रहला तिनं सातत्यानं कडवा विरोध केला, त्याची इच्छा फलद्रूप होऊ दिली नाही. हळूहळू आई मुलांचं दैवत बनलं. जन्मदात्यापासून मुलं दुरावत गेली.

कामाच्या वेळामुळंही आर्थर आपल्या कुटुंबियांपासून अलग पडत होता. दिवसपाळीला तो पहाटे पावणेपाच वाजता उठायचा. साडेपाचपर्यंत घर सोडायचा. संध्याकाळी आठ साडेआठच्या सुमारास घरी परतायचा. रात्रपाळी असली की मुलांच्या नाश्त्याच्या वेळी तो घरी यायचा. दिवसभर झोपा काढायचा. संध्याकाळी साडेआठला कामाला बाहेर पडायचा. त्याच्या या कामाच्या वेळा लिडीयाच्या अगदी मनाजोगत्या होत्या. त्यामुळं तिची मुलं त्याच्यापासून आपसूक दूर राहात होती. आर्थर त्या घरात एकाकीच होता. आपल्याकडे दुर्लक्ष करून मुलांच्या गरजांना घरात प्राधान्य दिलं जात आहे ही गोष्ट त्याच्या नजरेतून निसटली

नव्हती. तो संतापायचा. त्याची ही चीड, हेवा बऱ्याच वेळा वादंगाला कारणीभूत होत असे. लॉरेन्सच्या 'अ कोलिएर्स फ्रायडे नाईट' या नाटकात आई मुलांसाठी टिनमधली फळं घेऊन येते आणि नवऱ्याला तंबी देते की त्यातली थोडीशीच त्यानं उचलावीत. त्यावर तो गरजतो, 'माझ्यासाठी काहीच आणलेलं नाही. त्यांच्यासाठी तुला वस्तू आणता येतात. पण मी तोंडात घातलेल्या प्रत्येक घासागणिक तुझी कुरबूर चालू असते.' त्याच्या या उद्गारात क्षोभापेक्षा मनोव्यथाच प्रकर्षानं जाणवते. मुलांप्रमाणेच आपल्याकडेही लिडीयानं मायेनं पाहायला हवं ही त्याची भावनिक गरज होती. परंतु त्याच्या घरात ही गरज भागवली जात नव्हती. यामुळं त्याची होणारी मानसिक तडफड, 'जिमी अँड द डेस्परेट वूमन' या लॉरेन्सच्या कथेतील एका पात्राच्या तोंडून व्यक्त होते : 'प्रत्येक दिवशी आठआठ तास मी गुलामागत खाणीत राबतो, माझ्याकडे कुणी पाहील की नाही?' आपल्या नवऱ्याला काय वाटतं हे लिडीया कधी खिजगणतीत घेत नव्हती. रागानं बेभान होऊन एखाद दिवशी त्यानं धमकावलं, ''माझ्या बुटाच्या नुसत्या आवाजानंच तुला थरथरायला लावीन'; तर ती नुसती कुत्सितपणे हसायची, छद्मीपणानं विचारायची; ''कुठले बूट घालणार आहेस?'' तो पिऊन घरी आला की बऱ्याच वेळा त्या दोघांचं भांडण जुंपायचं. कैकदा तो तिच्यावर हात टाकायचा, हाती लागेल ती वस्तू तिच्यावर फेकून मारायचा. पण त्याच्या या मारहाणीलाही तिनं कधी भीक घातली नाही. नवऱ्याबरोबरच्या लढ्यात खात्रीनं यशस्वी होण्याचा सर्वोत्तम मार्ग तिनं शोधून काढला होता. ती मुलांच्या जाणीवपूर्वक निदर्शनास आणून द्यायची की त्यांचा प्रतिपाळ करताना किती कष्ट, यातना तिला सहन कराव्या लागतात, कोणत्या खडतर प्रसंगांना तिला सामोरं जावं लागतं.

लॉरेन्स सहा वर्षांचा असताना लॉरेन्स कुटुंब वॉकर स्ट्रीटवर राहायला गेले. त्यांच्या घरालगत एक अँश वृक्ष होता. खालच्या मजल्यावरील आईवडिलांची जीवाचा थरकाप उडवणारी रात्रीची भांडणं, वरच्या मजल्यावर जीव मुठीत धरून थरथरणारी मुलं आणि अंगणात कण्हल्यागत सळसळणारा अॅश वृक्ष यांची सांगड लॉरेन्सच्या बालमनात घातली गेली आणि त्याच्या त्या भावस्थितीचा आविष्कार पुढं त्याच्या 'डिस्कॉर्ड इन चाईल्डहूड' या कवितेत झाला तो असा :

Outside the house an ash-tree hung its terrible whips,
And at night when the wind arose, the lash of the tree
Shrieked and slashed the wind, as a ship's
Weird rigging in a storm shrieks hideously.

Within the house two voices arose in anger, a slender lash
Whistling delirious rage, and the dreadful sound
Of a thick lash booming and bruising, until it drowned
The other voice in silence of blood, 'neath the noise of the ash.

आपली आई म्हणजे जंगली नवऱ्याच्या तावडीत सापडलेला बळी आहे असाच छोट्या लॉरेन्सचा ठाम समज झाला होता. वस्तुतः आर्थरनं आपल्या पत्नीशी कधीच बेइमानी केलेली नव्हती आणि तिच्यावर त्याचं उत्कट प्रेम होतं. त्याला आपण राक्षस समजत होतो आणि आईला देवता,ही चूक लॉरेन्सच्या ध्यानी आली. पण तोवर बरीच वर्षं पुढं सरकलेली होती.

## दोन

डेव्हिड हर्बट लॉरेन्स हा लिडीयाचा सर्वात धाकटा आणि अशक्त मुलगा. तो काही जगणार नाही ही भीती तिला सतत वाटायची. त्याची प्रकृती एवढी नाजूक होती की इतर मुलांकडे दुर्लक्ष करून त्याचीच काळजी तिला घ्यावी लागत असे, त्याला डोळ्यात तेल घालून जपावं लागत असे. तो सतत आजारी. त्याचं नाक सदाचं शेंबडानं भरलेलं. कुठल्या भावंडांना मिळाली नसेल एवढी आईची माया त्याच्या नाजूक प्रकृतीमुळं त्याला लाभली. तथापि, तिचा लाडका मुलगा मात्र तो नव्हता. तिचा जीव होता अर्नेस्टवर. अर्नेस्ट देखणा होता. बापासारखेच लुकलुकणारे डोळे आणि दाट पिंगट केस. त्याचा आत्मविश्वास वाखाण्ण्याजोगा. शाळेच्या अभ्यासातही तो हुशार होता. आई त्याला झुकतं माप देते याचं वैषम्य लॉरेन्सच्या बालमनाला न वाटतं तरच नवल !

पाचव्या वर्षी मुलांची नावं शाळेत घातली जात. पण दुबळ्या प्रकृतीमुळं लॉरेन्सचं शाळेत जाणं लांबलं. वयाच्या सातव्या वर्षी तो शाळेत दाखल झाला. शाळा त्याला अजिबात आवडत नसे. त्याला शाळेत घेऊन जाण्याची कामगिरी मेबल कॉलीशा हिच्यावर सोपवण्यात आली होती. मेबल त्याच्याहून वर्षानं मोठी होती. त्याच्याच शाळेत जाणारी. त्याची संरक्षणकर्ती. लॉरेन्स शाळेत जायला लागल्याला आठवडाही झाला नसेल. एक दिवस सकाळी शाळेत जाण्याच्या वेळेला तो मेबलच्या दृष्टीला पडला नाही. शोधाशोध केल्यावर तिला तो आढळला. एका पायरीवर तो रडत बसला होता. बाबापुता करूनही तो जागचा हलायला तयार नव्हता. शेवटी त्याला ओढत शाळेत न्यावं लागलं. त्या दिवशी दुपारी ती वर्गातून बाहेर पडली तेव्हा तो तिची वाट पाहात उभा असलेला तिला दिसला. घरच्या वाटेवर काही मुलं त्याची टोपी मागून येऊन उडवू लागली. त्याला चिडवू लागली. मेबल आणि तिची मैत्रीण गर्ट्रुड कूपर यांना त्याला संरक्षण देत घरापर्यंत पोचवावं लागलं. त्यानंतर काही आठवड्यांनी त्यानं मेबलला सुचवलं की त्या दोघांनी शाळेला बुट्टी मारावी, कुरणात बागडावं, फुलं वेचावी. अर्थात् त्याची ही सूचना मेबलला मान्य होण्याजोगी नव्हती. मेबल त्याच्या जिवाभावाची मैत्रिण बनली. नवव्या वर्षी त्यानं तिच्यावर कविता लिहिली. तिला त्यात आपली 'स्वीटहार्ट' म्हटलं. तिला कवितेत तितपतच गम्य. पण त्या कागदाचे कपटे होईपर्यंत तिनं तो जपून ठेवला होता. एक दिवस त्यानं तिला सांगितलं की तो मोठा झाल्यावर एखाद्या देखण्या बाईशी लग्न करणार आहे. पुढं पुस्ती जोडली, तुझ्यासारख्या पोरीबरोबर

नाही. हे निर्दय उद्‌गार तिच्या जिव्हारी लागले.

मारकुट्या मास्तरांची दहशत वाटत असूनही लॉरेन्स हळूहळू शालेय जीवनात रुळला. शाळेत त्याच्या टापटीपीची प्रशंसा केली जात असे, परंतु अभ्यासात त्यानं शिक्षकांचं लक्ष स्वत:कडे वेधून घेतलेलं दिसत नाही. मुलांबरोबर मैदानावर जाऊन खेळण्यापेक्षा मुलींबरोबर खेळणं त्याला अधिक पसंत. त्यामुळे त्याच्या बरोबरचे मुलगे त्याला डरपोक, बायल्या म्हणून चिडवत, त्याची टर उडवत. त्याचा असा छळ करणाऱ्यांना रट्टे हाणून त्यांची तोंडं बंद करण्याइतपत ताकद त्याच्या दुबळ्या देहात नव्हती. पण तिची उणीव तो आपल्या धारधार वाक्‌बाणांनी भरून काढत असे. त्याच्या आईच्या या अमोघ अहिंसक अस्त्राचा तितक्याच सहजतेनं वापर करण्यात मात्र तो वाकबगार होता. त्याचा भाऊ जार्ज सांगतो, त्याच्या शब्दांना पात्याची धार असायची.

शाळेतल्या अभ्यासापेक्षा घरकामात आईला मदत करण्याची त्याला अतोनात आवड. काम स्वयंपाक घरातलं असो वा ब्रशानं लादी घासण्याचं असो, प्रत्येक काम तो तन्मयतेनं करायचा. बायकांची ही असली कामं करण्यात त्याला कधी कमीपणा वाटला नव्हता. प्रकृती वारंवार बिघडत असल्यामुळं बऱ्याच वेळा तो घरी असायचा. त्यामुळं आईच्या दैनंदिन जीवनात त्यानं चतुराईनं प्रवेश केला आणि बायकी समजल्या जाणाऱ्या बऱ्याचशा कामात प्राविण्य मिळवलं. घर कसं ठेवायचं याचे पाठ त्यानं आईकडून घेतले. म्हणूनच पुढील काळात तो जिथं जिथं राहिला त्या त्या जागेला तो घरपण देऊ शकला. वडिलांकडूनही तो काही गोष्टी शिकला, त्याच्याही नकळत:निसर्ग आणि प्राणी यांच्याबद्दलचं प्रेम, जगण्यातलं सौख्य अनुभवणं आणि रूढींचा धिक्कार करणं.

लॉरेन्सांच्या घरात हुकूमत चालायची ती लिडीयाची. जे काही घरात ठरत असे ते ती ठरवायची. छोट्या लॉरेन्सला आश्चर्य वाटायचं. परमेश्वर पुरुष कसा, स्त्री कशी नाही? कारण पृथ्वीतलावर उत्कृष्ट काय ते फक्त स्त्रियाच जाणतात. शिवाय पुरुषांना कशाची पर्वा नसते. भावंडात वडिलांवर सर्वात जास्त जळफळायचा तो लॉरेन्स. वडिलांकडून त्याला वाईट वागणूक मिळत होती म्हणून त्यांचा तो तिरस्कार करत नव्हता. त्यांनी क्वचितच आपल्या मुलांना मारझोड केली असेल. लॉरेन्स त्यांच्याशी उर्मटपणे वागत असूनही त्यांनी कधी त्याला ठोकून काढला नव्हता. त्याला मार द्यायची ती आईच. पुढील काळात त्यानं मेरी चेंबर्सपाशी कबुली दिली. आईखातिर त्याला वडिलांचा तिरस्कार करायलाच हवा होता. वडिलांना एकदा खाणीत अपघात झाला. त्यांना काही दिवस हॉस्पिटलमध्ये ठेवण्यात आलं. या काळात लॉरेन्स भलताच खूश होता. कारण आईवर अरेरावी करणारा पुरुष घराबाहेर होता.

बायकांचं वर्चस्व असलेल्या घरात लॉरेन्स वाढत होता. आर्थिक ओढगस्त थोडीतरी सुसह्य व्हावी म्हणून जॉर्ज लहान असतानाच त्याला वर्षभर नॉटिंगहॅममध्ये लिडीयाच्या आजोळी ठेवण्यात आलं होतं. दहाव्या वर्षी त्यानं घराला रामराम ठोकला आणि तो नॉटिंग-हॅममधील आपल्या एका काकाच्या हाताखाली मदतनीस म्हणून काम करू लागला. लॉरेन्स

तेव्हा होता दोनएक वर्षांचा. जॉर्जपेक्षा अर्नेस्ट आई-भावंडांना अधिक जवळचा असला तरी आपल्या सवंगड्यासोबत खेळण्या-कुदण्यासाठी बराचसा वेळ तो घराबाहेरच असायचा. लॉरेन्सचं आईच्या मायेनं संगोपन केलं त्याची थोरली वहीण एमिली हिनं. एमिली लॉरेन्स-पेक्षा तीन वर्षांनी मोठी होती. पण आई कामात व्यग्र असली की एमिली लॉरेन्सला पुस्तकातल्या कहाण्या मोठ्यानं वाचून दाखवत असे. परंतु त्याची घनिष्ठ मैत्री जुळून आली होती ती मात्र त्याची धाकटी बहीण ॲडा हिच्याशी. बालपणी लॉरेन्स हे ॲडाचं दैवत होतं. आईच्या गैरहजेरीत मना करण्यात आलेली टॉफी बनवण्यात, गावात स्वच्छंद भटकण्यात लॉरेन्सचा पुढाकार असे. तिला नाना तऱ्हांच्या रोपट्यांची नावं सांगणं, सशाची पिल्लं किंवा तीतर पक्षी तिला कौतुकानं दाखवणं या गोष्टी त्याला भारी प्रिय. ॲडा पियानो शिकत होती. लॉरेन्सला पियानो वाजवणं कधीच साध्य झालं नाही. तरी तिच्या शेजारी बसून तो तिला प्रोत्साहन द्यायचा, काही वेळेला दोघंही मिळून गाणी म्हणायचे.

आल्बर्ट स्ट्रीटवरील 'ब्रिटिश स्कूल' मध्ये फिरत्या नाटक मंडळींची नाटकं होत, वाचनाचे-बऱ्याचदा डिकन्सच्या कादंबऱ्यांचे- कार्यक्रम होत. लॉरेन्स अशा कार्यक्रमांना आवर्जून हजर राहात असे. बायबल व स्तोत्र त्याला आवडायची. धार्मिक सुधारणावाद्यांच्या सभांना तो चोरून जायचा. त्यांच्या विचारांनी तो प्रभावित झाला होता. अर्थात् त्याची ही पोरवयातली बंडखोरी होती. अर्नेस्टप्रमाणं आपलं स्वत:चं असं स्वतंत्र आयुष्य आहे असा दावा त्यानं कधी केला नाही. अर्नेस्ट चतुरस्त्र होता. अभ्यास, खेळ, नृत्य – प्रत्येक गोष्टीत तो प्रविण होता. खेळात आणि चांगल्या वर्तणुकीबद्दल त्यानं बक्षिसही पटकावली होती. मुलींमध्ये तो 'पॉप्युलर' होता. परंतु चौदाव्या वर्षी त्याला शाळा सोडावी लागली. आर्थरच्या पगारात संसाराचा गाडा रेटणं मुश्किल झालं होतं. अर्नेस्टला कारकुनी पत्करावी लागली. प्रथम ईस्टवूडजवळ, नंतर डर्बिशायरमधील 'शिप्ले कोलिएरी' मध्ये. फावल्या वेळात तो शॉर्टहॅन्ड-टायपिंग शिकला. पत्रव्यवहाराद्वारे फ्रेंच आणि जर्मन भाषा त्यानं आत्मसात केल्या. आणि एक दिवस त्याचं, पर्यायानं लॉरेन्सांचं भाग्य उदयाला आलं. लंडनमधील 'जॉन हॉलरायड अँड कंपनी' कडून त्याला नोकरीसाठी बोलावणं आलं. पगार वर्षाला १२० पौंड. तल्लख बुद्धीचा आपला हा लाडका मुलगा दूर जातो याचं दु:ख लिडीयाला झालं. परंतु आपलं दु:ख तिनं गिळलं. केवळ तो जवळ असावा म्हणून एवढ्या मोठ्या पगाराची नोकरी झिडकारणं म्हणजे स्वत:च्या पायावर धोंडा मारून घेण्यासारखं होतं. अर्नेस्टला काय हवं नको इथं जातीनं लक्ष देणं लिडीयाला आवडायचं. त्यानं चहा मागताच त्याला तो तात्काळ करून देणं, त्याच्या कॉलरींना इस्त्री करणं असल्या साध्यासुध्या गोष्टी करण्यामधूनही त्याच्याविषयीचं स्वत:चं प्रेम व्यक्त करण्याची संधी ती कधी दवडत नसे. परंतु स्वत: अर्नेस्टनं घरापासून दूर जाणं फारसं मनाला लावून घेतलं नव्हतं. लॉरेन्सप्रमाणं त्याला आईचं 'ऑब्सेशन' नव्हतं.

लॉरेन्सप्रमाणं त्याला स्वत:च्या कर्तव्याची जाणीवही नव्हती. लिडीयाला आशा होती की अर्नेस्ट घरखर्चाला आर्थिक साहाय्य करील. परंतु तिची आशा फलद्रूप होण्याची चिन्हे दिसत

नव्हती. वस्तुतः तिच्या दोन्ही थोरल्या मुलांनी तिचा अपेक्षाभंग केला होता. आपण मोठा झाल्यावर घरीच राहू आणि आईला सर्वतोपरी मदत करू असं आश्वासन जॉर्जनं एकेकाळी दिलं होतं. त्याऐवजी वयाच्या सतराव्या वर्षी तो गावातल्या पोरीला फिरवू लागला होता. लष्करात भरती होण्याचा उपद्व्यापही केला होता. त्यातून त्याला मुक्त करण्यासाठी अठरा पौंडाचा भुर्दंड लिडीयाला सोसावा लागला होता. पुढं एकोणिसाव्या वर्षी आपल्या मैत्रिणीला त्यानं पोटोशी केली, १८९७ च्या मेमध्ये तिच्याशी लग्न केलं. जॉर्ज नेव्हील या लॉरेन्सच्या शाळासोबत्याच्या मते, जॉर्जनं आपल्या दोघा भावांपेक्षा आर्थरचे बरेचसे गुण उचललेले होते, किंवहुना त्याच्या ते रक्तातच उतरलेले होते.

अर्नेस्टही जॉर्जहून काही फारसा वेगळा ठरला नाही. ईस्टवूडमध्ये असतानाच त्याच्यावर कैक पोरी भाळल्या होत्या. त्यात काही श्रीमंताघरच्या होत्या. त्याला प्रेमपत्रही येत होती. पण तो कुणाच्या प्रेमात पडला नव्हता. लंडनमध्ये मात्र जिप्सी डेनिसच्या प्रेमात तो अष्टांगी बुडाला. ती स्टेनोग्राफर होती. छानछोकीची तिला आवड, पार्ट्यांचा षौक. सून म्हणून ती लिडीयला बिलकुल पसंत नव्हती. परंतु तिच्या पसंती–नापसंतीचा प्रश्नच नव्हता. १९०१ मध्ये अर्नेस्ट-जिप्सी यांचा वाङ्निश्चय झाला. त्यावरील लॉरेन्सच्या प्रतिक्रिया : अर्नेस्टनं एका छचोर मुलीला प्रेम दिलं आहे.

दरम्यानच्या काळात लॉरेन्सचं शालेय शिक्षण चालू होतं. तो अर्नेस्टएवढा तल्लख बुद्धीचा नसला तरी अभ्यास मन लावून करायचा. १८९७ मध्ये त्यानं स्कॉलरशिपही मिळ-वली.

'नॉटिंगहॅम हायस्कूल' मधील त्याचा प्रवेश त्यायोगे सुकर झाला. या स्कॉलरशिपचे त्याला फक्त वर्षाला १४ पौंड मिळणार होते. पण शाळेचा युनिफॉर्म, १.११ पौडांचं सिझन तिकीट इत्यादी खर्च स्कॉलरशिपमध्ये भागण्याजोगा नव्हता. तरीही त्यानं पुढील शिक्षण घ्यायलाच हवं यावर लिडीया ठाम होती. १८९८ च्या सप्टेंबरमध्ये तो 'नॉटिंगहॅम हायस्कूल' मध्ये दाखल झाला. आता ईस्टवूडमध्ये त्याला कधी नव्हे एवढा एकटेपणा जाणवू लागला होता. कारण इतरांपेक्षा आपण वेगळे आहोत याचं भान त्याला एव्हाना आलं होतं. खाणीच्या ऑफिसमधून पगार आणायची त्याच्यावर कधी पाळी आलीच तर त्याला ते अपमानास्पद वाटू लागलं होतं. अशा प्रसंगी मेबल कॉलीशॉ त्याला बळजबरीनं ऑफीसकडे ढकलून नेत होती.

ईस्टवूड–नॉटिंगहॅम असा दररोजचा दोन तासांचा प्रवास लॉरेन्सची दमछाक करत होता. खाण – कामागाराचा मुलगा म्हणून वरिष्ठ वर्गातील विद्यार्थ्यांकडून त्याला अपमानास्पद वागणूक मिळत होती. त्याच्याकडे तुच्छतेने पाहिलं जात होतं. एका बुर्झ्वा पालकानं तर आपल्या मुलाला लॉरेन्सबरोबरची मैत्री तोडून टाकण्यास भाग पाडलं होतं. याचे क्लेश त्याला व्हायचे पण अशा प्रतिकूल परिस्थितीतही त्यानं आत्मप्रतिष्ठा जपली. एक आदर्श विद्यार्थी म्हणून नावलौकिक मिळवला. पण १९०० मध्ये त्याला कमी मार्क्स मिळू लागले. अभ्यासाकडे त्याचं दुर्लक्ष होत गेलं याला बरीच कारणं होती. घरातल्या मूळ तणावग्रस्त

वातावरणात अर्नेस्टच्या जिप्सीवरील प्रेमानं घातलेली भर, जेसी चेंबर्सशी नव्यानं झालेली ओळख इत्यादी. त्यात महत्त्वाचं असं आणखीनही एक कारण होतं. या वर्षीच्या फेब्रुवारीत त्याच्या दारुड्या काकानं, वॉल्टरनं केलेला आपल्या पंधरा वर्षाच्या मुलाचा अमानुष खून. या अघोरी कृत्याला वर्तमानपत्रातून प्रसिद्धी मिळाली होती. खाणकामगाराचा मुलगा असण्याहून खुन्याचा पुतण्या म्हणून ओळखलं जाणं ही बाब कितीतरी पटींनी लांच्छनास्पद होती.

१९०१ च्या जुलैमध्ये, वयाच्या पंधराव्या वर्षी लॉरेन्सनं 'नॉटिंगहॅम हायस्कूल' मधलं शिक्षण पुरं केलं. आता त्यानं नोकरी करावी असा लकडा लिडीयानं त्याच्या मागे लावला. लॉरेन्स कपाळाला आठ्या घालून वर्तमानपत्रातल्या जाहिराती वाचू लागला. त्यातील त्याला पसंत पडलेल्या तो टिपून घरी आणू लागला, अर्ज करू लागला. असाच एक अर्ज त्यानं अर्नेस्टच्या मदतीनं लिहिला. त्यात आधुनिक भाषांमधील आपल्या प्राविण्याची आवर्जून नोंद केली आणि तो अर्ज नॉटिंगहॅममधील 'हेवूड्स सर्जिकल गारमेंट्स फॅक्टरी'कडे पाठवला. त्याला इंटरव्ह्यूसाठी बोलावणं आलं. आईच्या सोबतीनं तो फॅक्टरीच्या ऑफिसात गेला. त्याची निवड झाली. पगार, आठवड्याला आठ शिलींग. तो पहाटे सहा वाजता उठायचा. दोन मैल चालून किंबर्लीला सव्वासातची ट्रेन पकडायचा. सकाळी आठपासून संध्याकाळी आठपर्यंत काम करायचा. त्यानंतर ट्रेन पकडून दमून भागून साडेनवाच्या सुमारास घरी परतायचा. दुपारी एक वाजता तासभर लंचटाईम. जेवणाचा डबा तो घरून न्यायचा. त्याचं काम होत,पत्रांच्या नकला करणं, पार्सलं बांधणं, पत्ते लिहिणं. या कामाचा त्याला आत्यंतिक तिटकारा होता. तशात आपल्याबरोबर काम करणाऱ्यांशी संबंध जोडणं त्याला त्रासदायक होत होतं. त्याला मदत करणाऱ्या काही कनवाळू वयस्कर बायकांशी त्याचं थोडंफार बोलणं व्हायचं. परंतु तरुण पोरींशी वागतांना मात्र तो पुरता गांगरून जायचा. त्याची आदबशीर वागणूक हा त्या पोरींचा टिंगलीचा विषय होता. ज्यांच्या वासवाऱ्यालाही चुकून उभं राहू नये अशा त्या पोरी होत्या. लॉरेन्सला कल्पना करता येणंही अशक्य एवढ्या त्या घाणेरड्या होत्या आणि सोवळ्या लॉरेन्सवर चिखलफेक करण्यात त्यांना मौज वाटत असे. आपलं हे नवं आयुष्य लॉरेन्सला आवडत नव्हतं, पण त्याला मिळणाऱ्या पगाराची गरज आपल्या आईला आहे ही जाणीव त्याला होती. शिवाय आईला खूश करणं हे तो आपले परम कर्तव्य मानत होता. म्हणूनच मनावर दगड ठेवून या नव्या जगाशी आपल्या परीनं जमवून घेत होता. काही आठवडे उलटले आणि काळानं अकस्मात अर्नेस्टवर झडप घातली.

ऑक्टोबरमध्ये अर्नेस्ट लंडनहून घरी आला होता तेव्हा त्याचा घसा थोडासा सुजल्या-सारखा झाला होता. 'सेंट अँथनीज फायर' या संसर्गजन्य रोगाची ही सुरुवात होती. आपल्या आजाराचा गंभीरपणा त्याच्या ध्यानी अर्थातच आला नाही. तब्येत ठीक नसतानाही सोमवारी सकाळची ट्रेन पकडून त्यानं लंडन गाठलं, कामावर गेला. पण दुसऱ्या दिवशी अंथरुणातून उठणंही त्याला अशक्य झालं. त्याला न्युमोनिया झाला. १०४ डिग्रीपर्यंत त्याचा ताप चढला. त्यानंतर तीन दिवस तो औषधोपचाराविना खोलीत पडून होता. तो गंभीर आजारी असल्याचं त्याच्या घरमालकीणीस समजताच तिनं ईस्टवूडला तार केली. तार मिळताच लिडीया

तत्काळ लंडनला गेली. ती अर्नेस्टच्या खोलीवर पोचली तेव्हा तो भ्रमात होता. त्यानं तिला ओळखलंही नव्हतं. त्याचा चेहरा भयानक लाल झाला होता, सुजला होता. त्याला वाचवणं आता डॉक्टरांच्या हाती राहिलेलं नव्हतं. ११ ऑक्टोबरला लिडीयाचा सर्वांत लाडका मुलगा इहलोक सोडून गेला. ती ईस्टवूडला परतली. अश्रू आटले होते. दु:खाच्या भारानं घरात फिरणंही तिला जमेनास झालं होतं. तरी अर्नेस्टच्या दफनविधीची पूर्वतयारी तिनं स्वत: केली, आर्थरकडून काडीचीही मदत न झाल्यामुळं तिला स्वत:ला ती कामं करावं लागली. अर्नेस्टच्या मृतदेह ईस्टवूडला आणण्यात आला. त्याचा दफनविधी पार पडला आणि त्यानंतर लिडीया निर्विकार चेहऱ्यानं मुकाट बसून राहू लागली, पुरती कोलमडून गेली, जगण्याचं प्रयोजन ती हरवून बसली. अर्नेस्ट यशस्वी झालेला पाहाणं यावर तिच्या साऱ्या आशा-आकांक्षा केंद्रित झाल्या होत्या. आता तो या जगातच नव्हता.

आपल्या भावाच्या तडकाफडकी निधनाचं दु:ख लॉरेन्सला झालं. पण त्याला व्यथित केलं, त्याच्या आईचं औदासिन्य दूर करण्यात आपलं प्रेम विफल ठरल्याच्या तीव्र जाणीवेनं. अर्नेस्टच्या मृत्यूनं या मायलेकामधील सलगी लुप्त झाली होती. ती पुनश्च निर्माण व्हावी, अतूट व्हावी ही आस मनी बाळगून लॉरेन्स नित्याची कामं करत होता. इच्छा नसूनही नोकरीचे कष्ट उपसत होता. ऑक्टोबर संपला. नोव्हेंबर मागे पडला. ख्रिसमस तोंडाशी आला. पुन्हा एकदा दैवानं लिडीयावर आघात केला. लॉरेन्स न्युमोनियानं आजारी पडला. लिडीया हतबुद्ध झाली. पण तिनं स्वत:ला सावरलं. लॉरेन्सची सेवाशुश्रूषा करताना अनेस्टच्या मृत्यूचं दु:ख तिनं गिळून टाकलं, लॉरेन्सला मृत्यूच्या दारातून माघारी फिरवलं. तो आजारातून उठला, घरातल्या घरात हिंडताफिरता झाला. या आजारानं त्याची फफ्फुसं कायमची कमकुवत केली, पण लिडीयाला औदासिन्यामधून बाहेर काढून तिची जीवनेच्छा जागवली. तारुण्यदशा प्राप्त झाल्यानंतर अर्नेस्टला आईच्या प्रेमाची गरज भासत नव्हती. उलट त्याच्या प्रेमाची ती भुकेली होती. आईनं आपल्यावर प्रेम करावं ही लॉरेन्सची उत्कट कामना, जोवर तिच्या सौख्याची आशा अर्नेस्टवर केंद्रित झाली होती तोवर फलद्रूप होण्याची शक्यता नव्हती. त्याबद्दलची तिची ओढ मर्यादित होती. आता तिचं अवघं प्रेम त्याच्याकडे वळलं होतं. आता ती त्याची एकट्याचीच होती. आता दोघंही परस्परावलंबी बनले. त्याच्या वयाच्या सोळाव्या वर्षी जुळून आलेल्या मायलेकामधल्या या प्रेमाचं स्वरूप व्यामिश्र होतं. त्यांच्या या विकारवश नात्यानं जेसी चेंबर्सच्या आयुष्याची मात्र फरफट केली.

## तीन

लॉरेन्सच्या आयुष्यात जेसीनं प्रवेश केला तेव्हा तो होता पंधरा वर्षांचा आणि ती होती चौदा वर्षांची. या दोघांचा परिचय होण्याला कारणीभूत ठरली लिडीया आणि या दोघांच्या प्रेमात बिब्बा घालायला कारणीभूत ठरली ती लिडीयाच.

लिडीया आणि जेसीची आई ॲन, दोघीही एकाच चॅपलमध्ये जात. तिथंच दोघींचा स्नेह

जुळून आला. ॲन ही एडमंड चेंबर्सची पत्नी. १८९७ च्या सुमारास चेंबर्स कुटुंब ईस्टवूडहून हॅग्ज फार्मवर राहायला आलं होतं. एडमंड कूळ म्हणून शेतीवाडी करत होता. त्यांना मे, ॲलन, जेसी, ह्युबर्ट, बर्नार्ड, एमिली, ऑली आणि डेव्हिड अशी आठ मुलं. आर्थिक स्थिती ओढगस्तीची. प्रपंचाचा गाडा सुरळीत रेटता यावा म्हणून एडमंड दुधाचा रतीब घालत असे. ॲन घरकाम सांभाळून शेतावर मदत करायला जायची. तिच्यामधील समर्पणाची भावना, तिची शांत वृत्ती, धार्मिक प्रवृत्ती लिडीयाला भावली होती. पण तिचं खानदान शेतकऱ्याचं म्हणून लिडीयाच्या लेखी तिचा सामाजिक स्तर लॉरेन्सांहून खाली होता. वस्तुत: चेंबर्स कुटुंब सुशिक्षित होतं. हार्डीसारख्या लेखकाची नवी कादंबरी बाजारात येताच ती विकत आणून एडमंड ती आपल्या बायकोला वाचवून दाखवत असे. आणि आर्थर लॉरेन्सला वर्तमानपत्र वाचायचं म्हटलं म्हणजे कोण यातायात करायला लागायची. ॲनच्या नवऱ्याप्रमाणं आपला नवरा ग्रंथप्रेमी नाही, सुशिक्षितही नाही ही बाब नाही म्हटली तरी लिडीयाला कमीपणाची वाटली. पण तिनं स्वत:चं समाधान करून घेतलं. ॲनप्रमाणं ती निव्वळ हुकूम झेलणारी नव्हती. तिच्या घरात हुकूमत तिची होती, तिची मुलं तिच्या सांगण्याबाहेर नव्हती.

मिसेस चेंबर्सच्या आग्रहाला मान देऊन लिडीया लॉरेन्सला बरोबर घेऊन एका सकाळी हॅग्ज फार्मकडे निघाली. ईस्टवूडहून हॅग्ज फार्म तीन मैलावर होतं. या तीन मैलांची वाटचाल लॉरेन्सला सुखद वाटली. शेतमळ्यातून जाणाऱ्या या वाटेच्या अवतीभवती बहरलेला निसर्ग पाहून त्याचा जीव हरखून गेला. ती दोघं हॅग्ज फार्मवर पोचली तेव्हा दुपार झाली होती. प्रथम भेटीतच तिथल्या निसर्गाबरोबर तिथल्या माणसांवरही त्याचा लोभ जडावला. बुधवारी त्याच्या शाळेला अर्ध्या दिवसाची सुट्टी झाली की तो जीवाच्या ओढीनं हॅग्ज फार्मवर जाऊ लागला. शेतीवाडीच्या कामात चेंबर्सांना उत्साहानं मदत करू लागला. आईला जशी घरकामात मदत करत असे तशी मदत मिसेस चेंबर्सला करू लागला. हळूहळू तो त्यांच्याच कुटुंबातला एक झाला.

या कुटुंबातील एक, जेसी. दाट पिंगट डोळे. कुरळे केस. तजेलदार चेहरा. तिच्या बरोबरच्या लॉरेन्सच्या सलगीची असूया असल्यामुळे असेल कदाचित त्याची बहीण ॲडा सांगते की डोकं आणि खांदे पुढं झुकवून चालू लागली की तिचा देह बेडौल दिसायचा. तरी जेसीचा चेहरा देखणा असल्याचं ती मान्य करते. मेबल कॉलीशा ही लॉरेन्सची बालमैत्रीण म्हणते, 'जेसी सुंदर नव्हती. तिच्या चेहऱ्यात आकर्षकपणा होता. पण तुम्ही देखणी मुलगी म्हणता तशी काही ती नव्हती!' जेसीबद्दल तिच्या मनात थोडीफार असूया असेलही.

जेसीच्या रूपाहूनही तिचं संवेदनाशील मन लॉरेन्सला विशेषत्वानं भावलं. काही वेळेला ती दुखावली गेली असल्याचं जाणवायचं. काही वेळेला ती मूडी दिसायची. दहाव्या वर्षी आपल्याला शाळा सोडायला लावण्यात आली या वैषम्यापोटीची तिची चीड तिच्या वागण्यातून प्रकट व्हायची. अवतीभवतीच्या सामान्य जनांपेक्षा आपण वेगळ्या आहोत ही तिची भावना, लॉरेन्सला आपल्या आईची आठवण करून द्यायची. प्रतिकूल दास्यात ढकलून

देण्यात आलेली आपण एक राजकन्या आहोत असं ती समजत होती. घरातली नित्याची कामं करणं तिला बिलकूल आवडत नसे आणि ती करावीच लागली तर त्यात ती काहीतरी गफलत करणार हे ठरलेलंच. काहीतरी कुरापत काढून तिला भडकवण्याची संधी तिचे भाऊ कधी दवडत नसत. एकदा त्यांनी तिची अशीच खिल्ली उडवली. तिचंही माथं भडकलं. का म्हणून भावांची दादागिरी सहन करायची! भांडण जुंपलं. त्यांनी तिच्या झिंज्या पकडल्या. तीही सर्व शक्तीनिशी त्यांच्यावर तुटून पडली. तिचं हे वर्तन मिसेस चेंबर्सला रुचलं नाही. बायकांच्या जातीला ते शोभणारं नव्हतं. ती जेसीला रागे भरली. आपला 'अहं' गाडून टाकायचा, अंगी नम्रता बाळगायची या ख्रिस्ती नीतिमूल्यांचे पाठ तिनं जेसीला दिले. आईची ही शिकवण तिनं स्वत:च्या अंगी बाणवल्यामुळंच तिला आपल्या तालावर नाचवता येणं लॉरेन्सला पुढं शक्य झालं होतं.

लॉरेन्स चेंबर्सकडे जाऊ लागला तेव्हा तो शाळेच्या अखेरच्या टर्मला होता. शाळेच्या पोषाखातच तो त्यांच्याकडे जात असे. त्या पोषाखात तो रुबाबदार दिसायचा. जेसीची थोरली बहीण मे हिला वाटायचं, आपलं जुनाट घर, साधंसुधं फर्निचर लॉरेन्सला एकदम गावंढळ वाटत असेल. परंतु असल्या गोष्टींना त्याच्या लेखी महत्त्व नव्हतं. त्याला घरातली माणसं, मनापासून आवडली होती. लॉरेन्सांच्या घरचं तणावग्रस्त वातावरण आणि चेंबर्सांच्या घरातलं मनमोकळं वातावरण! त्याला ही तफावत प्रकर्षानं जाणवली होती. त्यानं एकदा बोलूनही दाखवलं; 'तुम्ही मंडळी माझ्यामधलं चांगलं पाहाता.' लॉरेन्स म्हणजे गंमतीजमती असं समीकरणच चेंबर्स भावंडामध्ये मांडलं गेलं. तो लाजराबुजरा राहिला नव्हता. तो उखाणे घालायचा, नकला करून दाखवायचा. त्यानं मुलांना 'व्हिस्ट' हा पत्त्यांचा खेळ शिकवला, बुद्धीबळ शिकवलं, नाचगाण्याचे पाठ दिले. कधी चेंबर्सांबरोबर शेक्सपियरच्या नाटकाचं वाचन होई. कधी लॉरेन्सनं काढलेल्या चित्राचं मुक्तकंठानं कौतुक केलं जाई. त्यानं घरात पाऊल टाकलं की मुलांना वाटायचं आता काहीतरी रोमहर्षक असं अनुभवायला मिळणार. एखादे दिवशी त्याचं डोस्कं अचानक बिथरायचं. एकदा तर त्यानं रागाच्या भरात जेसीच्या एका भावाच्या थोबाडावर ठोसाच हाणला होता. नंतर तो शरमिंदा झाला. या प्रसंगानं कपाळफिऱ्या लॉरेन्सचं दर्शन चेंबर्सांना घडलं. पण त्या प्रसंगातला कडवटपणा मागं राहिला नाही. गंभीर आजारातून तो बरा झाल्यावर एडमंड चेंबर्सनं त्याला आपल्या मिल्क फ्लोटमध्ये घालून हॅग्ज फार्मवर आणला तेव्हा चेंबर्सांच्या घरी सोनियाचा दिस उगवला होता.

ॲलन चेंबर्स लॉरेन्सपेक्षा तीन वर्षांनी मोठा होता. त्याची आणि लॉरेन्सची एकदम गट्टी जमली. ते दोघंही एकत्र हिंडत, कैकदा ताऱ्यांकडे पाहात शेतात पडून राहात. त्यांच्या मैत्रीत समलिंगाकर्षणाचा अस्फुटसा अंश होता. 'माय लाईफ अँड टाइम्स' या आत्मचरित्रात कॉम्प्टन मेकॅन्झी दावा करतो की लॉरेन्स त्याला एकदा म्हणाला होता : 'मी सोळा एक वर्षांचा असताना जवळ जवळ परिणत प्रेम मी अनुभवलं ते एका तरण्या खाणकामगाराबरोबर असं मला वाटतं.' त्या काळात तरुण मुलांना समलिंगसंभोगाची ओढ वाटत असे आणि लॉरेन्सच्या 'द व्हाईट पिकॉक' मध्ये त्याची प्रचीती येते:

'त्यानं पाहिलं, अंगाला अंग घासत राहायचं मी विसरून गेलो आहे आणि हसत त्यानं माझा कब्जा घेतला आणि अंगाला अंग जोराजोरानं घासायला सुरुवात केली, जणू काही मी एखादं लहान मूल होतो, किंबहुना, जिच्यावर त्याचं प्रेम आहे आणि जिची भीती त्याला वाटत नाही अशी एखादी स्त्री. मी स्वत:ला बिचकत त्याच्या बाहूत सूपूर्द केलं, आणि माझ्यावर चांगली पकड मिळावी म्हणून, त्यानं आपले हात माझ्याभोवती लपेटले आणि मला आपल्या अंगाशी घट्ट कवटाळून धरलं, आणि एकमेकांना भिडलेल्या आमच्या नग्न देहाच्या स्पर्शाचं माधुर्य अप्रतिम होतं. या स्पर्शानं माझ्या आत्म्याची सुप्त,अनाकलनीय ओढ काही प्रमाणात भागवली; त्यालाही तसंच जाणवत होतं. घासून घासून माझं सर्वांग ऊबदार केल्यानंतर त्यानं मला जाऊ दिलं आणि निश्चल हास्यभऱ्या नजरेनं आम्ही एकमेकांकडे पाहिलं, आणि क्षणभर आमचं प्रेम सफलसंपूर्ण होतं, तोवर मला ठाऊक असलेल्या कुठल्याही प्रेमापेक्षा-पुरुषांवरील वा स्त्रियांवरील -अधिक परिपूर्ण होतं.'

पुढील काळात स्त्रियांबरोबरच्या देहसंगात अशी तृप्ती मिळवणं त्याला शक्य का होत नसे याविषयी अनुमान करणं वरील उताऱ्यावरून शक्य व्हावं.

चेंबर्स कुटुंबातील मुलींशी लॉरेन्स मनमोकळेपणानं वागत असे. सुरुवाती सुरुवातीला त्याचं बोलणं-चालणं व्हायचं ते मेबरोबर. जेसीकडे त्याची नजर फारशी वळत नसे. परंतु त्याच्या आजारानंतर मात्र जेसीचं सान्निध्य त्याला हवंहवसं वाटू लागलं. तीही त्याच्या सहवासात फुलून येऊ लागली. त्यानं तिला फुलं ओळखायला शिकवलं. शेतामध्ये बसून तो तिला कविता वाचवून दाखवू लागला, खास करून शेली, वर्डस्वर्थ आणि कीट्स यांच्या. पुस्तकातल्या विश्वात दोघंही समरस होऊन जाऊ लागले. एवढे की त्यातील प्रेमिकांचं जीवन त्यांच्या नावासकट काही काळापुरते का होईना, जगू लागले. त्याला आवडलेल्या नायिका तो तिच्यामध्ये पाहू लागला.

आपल्या मुलाची जेसीबरोबरची सलगी लिडीयाला अजिबात रुचत नव्हती, किंबहुना ती खुपत होती. त्या दोघांच्या शरीरसंबंध घडून येण्याची धास्ती निर्माण होण्यापूर्वीच जेसी–बद्दलच्या असूयेनं लिडीयाच्या मनात मूळ धरलं होतं. १९०२ च्या प्रारंभीच लॉरेन्सनं जेसीला सांगितलं होतं, "आई मला म्हणाली, तुझा बाडबिस्तरा घे, सगळे कपडेलत्ते घे आणि जा चेंबर्सांकडे, तिथंच बस्तान ठोक." लॉरेन्स घरी नसतो, बराचसा काळ तो हॅग्ज फार्मवर असतो, जणू काही चेंबर्स मंडळी त्याला त्याच्या आईपासून हिरावून नेत आहेत, असा प्रवाद ईस्टवूडमध्ये पसरलेला होता. हा विषय सार्वजनिक व्हावा याची खंत लिडीयाला होती. शिवाय इतरही विंवचना तिला होत्या. लॉरेन्स न्युमोनियाच्या आजारातून अजून पूर्णपणे बरा झाला नव्हता. आपली प्रकृती त्यानं नीट साभाळणं जरूरीचं होतं. आर्थर जे काही पैसे देत होता त्यातून घरखर्च भागवणं मुष्किल होत होतं. तिला बिलं भागवायची होती. अर्नेस्टच्या थडग्याचं, डॉक्टरांचं. लॉरेन्सच्या आर्थिक साहाय्याची कुटुंबाला आत्यांतिक गरज होती. पण फॅक्टरीच्या कामावर रुजू होण्याइतपत तो अद्याप सशक्त नव्हता. शेवटी असा

निर्णय घेण्यात आला की ईस्टवूड येथील 'आल्बर्ट स्ट्रीट स्कूल'च्या मुलांच्या विभागात त्यानं विद्यार्थी- शिक्षक म्हणून ट्रेनिंग घ्यावं. शिकवणी करून आपलं शिक्षण त्याला पुरं करावं लागणार होतं. आठवड्याला त्याच्या हाती पडणार होता फक्त एक शिलिंग. हे जिणं अर्थातच खडतर होतं. शिकवायचं असेल त्या दिवशी तो पाठ हेडमास्तरांकडून घेण्यासाठी एक तास आधी त्याला शाळेत जाणं भाग होतं. अंगात पुरतं त्राण नसतानाही वांड मुलांपुढं घसाफोड करावी लागणार होती.

खंडित झालेलं जेसीचं शिक्षण एव्हाना सुरू झालं. लॉरेन्सनं आपल्याला गणित व फ्रेंच शिकवावं अशी इच्छा तिनं व्यक्त केली. तो तयार झाला,तिला शिकवू लागला. गणित विषयात लॉरेन्सचा हातखंडा. तो धडाधड पाठ घेऊ लागला. आपण जे काही शिकवत आहोत हे जेसीला समजत आहे की नाही हे पडताळून पाहाण्याचा विचारही त्याच्या मनाला कधी स्पर्शून गेला नाही. तिला उत्तर देता आली नाहीत की त्याच्या रागाचा पारा चढायचा. अशा वेळी तो तिला टोचून बोलायचा, तिची निर्भत्सना करायचा, काहीच बोलणं सुचेनासं झालं तर हातातली पेन्सिल तिच्यावर भिरकावयचा. आणि त्याची बोलणी निमूट सहन करीत ती बापुडी पुस्तकात डोकं खुपसून मुकाट थरथरत राहायची, त्याची मर्जी पुन्हा संपादन करता येईल का या विचारानं बेचैन व्हायची. तिची चूक नसताही लॉरेन्स तिला टाकून बोलला तरी स्वत:चा अपराध असल्यागत ती शरमिंदी व्हायची, आपली बाजू कधी मांडायची नाही. थोड्या वेळानं त्याच्या मानगुटीवरचा आग्यावेताळ उतरायचा. पुन्हा शिकवणी सुरू व्हायची. आता त्याच्या आवाजात थोडसं मार्दव असायचं.

मास्तरकीचं शिक्षण घेऊन आयुष्यभर आपल्याला मास्तर एके मास्तर करावं लागणार, त्यातून सुटका नाही अशी खूणगाठ लॉरेन्सनं मनाशी बांधली तरी लेखक होण्याचं स्वप्नही तो पाहत होता. पुरुषाच्या मोठेपणाला स्त्रीचं अधिष्ठान पाहिजे यास्तव त्यानं जेसीला आपल्या साहित्याची अधिष्ठात्री बनवली. 'आल्बर्ट स्ट्रीट'च्या पहिल्या वर्षी १९०५-०६ च्या दरम्यान केव्हातरी लेखनक्षेत्रात त्यानं पाऊल टाकलं होतं. तो पावलोपावली अडखळत होता. यावेळी त्याला प्रोत्साहन, पाठबळ दिलं ते जेसीनं. 'खाणकामगाराचा मुलगा आणि कवी'ही कल्पनाच इतरांना किती हास्यास्पद वाटेल, आपल्याला ते वेड्यात काढतील अशी धास्ती त्यानं जेव्हा तिच्यापाशी व्यक्त केली, तेव्हा तत्काळ ती म्हणाली की ही धास्ती त्यानं बाळगू नये,कवी होण्याची त्याची इच्छा फलद्रूप निश्चितच होईल. लेखक म्हणून तिनं लॉरेन्सबद्दल जो गाढ विश्वास प्रकट केला त्याचं मोल फार होतं. कारण आपल्या लेकानं लेखक व्हावं हे लिडीयाला कधीच मान्य होण्याजोगं नव्हतं. वयाच्या तेराव्या वर्षी लेखिका होण्याचं स्वप्न तिनं रंगवलेलं होतं, कविता लिहिल्या होत्या. त्या प्रसिद्ध झालेल्या होत्या. तरीही 'लिहिणं म्हणजे भिकार जिणं' या बद्दल ती नि:संदेह होती. लेखनावर होणारी अर्थ प्राप्ती दोन वेळचं जेवण देऊ शकणार नाही याबद्दल ती नि:शंक होती. या काळात आणि पुढंही ' द व्हाईट पिकॉक'चा पहिला खर्डा वाचून तिनं कपाळाला आठ्या घातल्या होत्या. आपल्या मुलानं असं लिहावं याचाच तिला धक्का बसला होता. लॉरेन्सवर अश्लील

साहित्याचा जनक म्हणून झालेलं शिक्कामोर्तब पाहायला ती जगतीयाचती तर !

जेसीबरोबरचंच लॉरेन्सचं नातं बौद्धिक होतं, मित्रत्वाचं होतं आणि वयाची एकविशी गाठीपर्यंत पूर्णपणे अशारीरिक होतं. त्याची शारीरिक आणि मानसिक वाढ होण्याला विलंब लागला असावा. एक दिवस जेसीला शोपेनहॉर वाचून दाखवत असताना, 'अत्यंत देखण्या असणाऱ्यांनाच प्रत्येकजण पसंत करील आणि त्यांची उत्कट कामना बाळगील' हे वाक्य त्यानं उच्चारलं आणि क्षणभर थांबला. त्यानं वर पाहिलं आणि घाबराघुबरा होत तो म्हणाला, "मी उत्कट कामना बाळगत नाही."

त्या काळातील समाजाच्या शिष्टसंमत नीतिमूल्यांनी लॉरेन्स आणि जेसी यांच्या मनात प्रचंड धाक निर्माण केलेला होता. परंतु तिच्याविषयी त्याला शारीरिक आकर्षण वाटत नव्हतं याला हेच एकमेव कारण नव्हतं. या बाबतीत तो पूर्णपणे अनभिज्ञ होता हेही एक कारण होतं. स्त्रियांशी बोलताना तो अवघडत नव्हता परंतु शारीरिक संबंध ही बाब अलग होती.

हळूहळू निसर्गनियमानुसार लॉरेन्सच्या कामवासना जाग्या झाल्या, त्याला त्रस्त करू लागल्या आणि जेसीबरोबरचं त्याचं वागणं तिढं बनलं, क्वचित प्रसंगी निर्दयही. तिच्या वागण्यात दोष काढून तो तिला फैलावर घेऊ लागला. तिच्या आवडीच्या फुलाला ती हळूवार स्पर्श करू लागली की तो म्हणायचा: "आनंद भोगण्यासाठी स्पर्श करण्याची तुला गरजच का भासावी? डॅफोडिल्स किती मोहक दिसतात हे मीसुद्धा पाहू शकतो. त्यांना स्पर्श करण्याची इच्छा मी करत नाही. अलिप्त वृत्ती तू अंगात बाणवायला हवीस. एखाद्या गोष्टीचा आस्वाद तटस्थपणानं घेता आला पाहिजे. त्यासाठी स्पर्श करण्याची आवश्यकता भासता कामा नये." आपल्या धाकट्या भावाला ती कौतुकानं गोंजारू लागताच त्यानं नापसंतीच्या सुरात तिला सुनावलं. "अलिप्त वृत्ती अंगात बाणव." एकदा तर एमिली ब्रॉंटीशी तिचं साम्य आहे यावरून त्यानं तिला दोष दिला. अशावेळी जेसी रडकुंडीला यायची.

लॉरेन्स आणि जेसी यांच्यामधली मैत्री निष्पाप असली तरी ती ईस्टवूडमध्ये चर्चेचा विषय बनली होती. या गावगप्पांमध्ये कुचाळकी नव्हती, चिखलफेकही नव्हती. त्या दोघांचं लग्न होणार हे गृहीत धरूनच चकाट्या पिटल्या जात. नेमकी हीच गोष्ट लिडीयाला मंजूर नव्हती. जेसीव्यतिरिक्त अन्य बऱ्याच मुली लॉरेन्सच्या देखण्या व्यक्तिमत्वावर फिदा झालेल्या होत्या. त्याला भेटण्यासाठी काही तरी निमित्त काढून त्या त्याच्या घरी फेऱ्याही मारत असत. त्यांची धास्ती बाळगावी असं लिडीयाला कधी वाटलं नाही. पण जेसीची गोष्ट निराळी होती. ती निश्चयी होती. 'शक्य झाल्यास ती त्याला हातचा गमावू देणार नाही' याची जाणीव लिडीयाला होती. लॉरेन्सच्या हृदयातलं आपलं स्थान जेसी हिरावून घेईल ही धास्ती तिला सदैव छळत होती आणि जेसीबद्दलच्या तिच्या तिरस्काराला धार चढत होती. जेसीबरोबरचं आपल्या भावाचं सख्य ॲडालाही मान्य नव्हतं. त्यांच्या घरालाच जेसी पसंत नव्हती. आणि जेसी हे जाणून होती. शुक्रवारी शिकवणीला त्याच्या घरी गेलं की तिथली कुत्सित बोलणी तिनं ऐकलेली होती. लिडीयाच्या तिखट वाणीचा प्रसाद तिला कैकदा मिळालेला होता.

'नॉटिंगहॅम युनिव्हर्सिटी कॉलेज' मध्ये 'टीचर्स ट्रेनिंग कोर्स' साठी लॉरेन्सनं नाव दाखल केलं. १९०६ च्या सप्टेंबरमध्ये कॉलेज सुरू होणार होतं. तत्पूर्वी लिडीयानं त्याला सांगितलं की जेसीबद्दल विचारपूर्वक निर्णय घेण्याची वेळ आता आलेली आहे. या समयी त्याची बहीण एमिलीही तिथं होती, आईच्या सुरात सूर मिळवायला. आईनं निक्षून सांगितलं. त्यानं जेसीशी वाङ्‌निश्चय करायला हवा. अन्यथा त्या दोघांनी एकत्र हिंडणंफिरणं थांबवायला हवं. दोघंही आता पंधरा सोळा वर्षांचे राहिलेले नाहीत, दोघांनीही विशी ओलांडलेली आहे. कुणी सांगावं, जेसीला दुसरा कुणीतरी मनापासून आवडू लागेल. अशावेळी त्यांच्यामधली ही मैत्री आड येईल.

आईचं: हे म्हणणं हॅग्ज फार्मवर गेला असता जेसीला एकटीला गाठून लॉरेन्सनं तिच्या कानावर घातलं आणि पुढं म्हणाला, "मी माझ्या हृदयात डोकावून पाहिलं आणि मला आढळून आलं, पती आपल्या पत्नीवर जसं प्रेम करतो, तसं प्रेम तुझ्यावर माझं नाही. शक्यता आहे, कालांतरानं मी तसं प्रेम करू लागेनही. मला तसं आढळून आलं तर सांगेन मी तुला. तुला जर वाटत असेल, तुझं माझ्यावर प्रेम आहे, मला सांग, आपण वाङ्‌निश्चय करू. तुला काय वाटतं?"

जेसी सुन्न झाली. पण स्वत:ला सावरत म्हणाली, "प्रेमाचा विचार माझ्या मनात कधी डोकावला नव्हता. शिवाय आताच्या या अशा परिस्थितीत तुझ्याशी वाङ्‌निश्चय करणं मला शक्य नाही."

या दोन तरुण जीवामधले भावबंध या भेटीतच कायमचे तोडले गेले असते तर बरं झालं असतं. जेसीला मानसिक क्लेश पुढं भोगावे लागते ना . आपले संबंध आता संपुष्टात आले असं तिनं बोलूनही दाखवलं. पण ही मैत्री तोडून टाकण्याची लॉरेन्सची इच्छा नव्हती. ही मैत्री, त्याच्या आयुष्यात परिपक्व झालेली एकमेव गोष्ट आहे हे तो विसरू शकत नव्हता. संबंध तोडू नयेत अशी त्यानं विनंती केली. जेसीनं ती मानली. त्याला एवढंच सांगितलं की त्यांच्यामध्ये झालेल्या संभाषणाची वाच्यता त्यानं तिच्या आईपाशी करू नये.

त्यानंतर ऑगस्टमध्ये लिंकनशायर किनारपट्टीवरील मेबलथॉर्प या गावी लॉरेन्सनं पंधरा दिवसाची सहल आयोजित केली. खास आईसाठी. या सहलीत लॉरेन्स कुटुंबियांबरोबर त्यानं जेसीलाही सहभागी करून घेतलं. मित्रमैत्रिणींना घेऊन सुट्टीच्या दिवशी सहली काढणं हा त्याचा षौक जुनाच. अशा सहलींना जेसीही उत्साहानं जात असे. पण या सहलीची गोष्ट वेगळी होती. लॉरेन्सच्या आईच्या, बहिणीच्या सहवासात तिला दिवस काढावे लागणार होते. त्यांची कुजकट बोलणी ऐकावी लागणार होती आणि ती चुकवायची म्हटली तर त्यांच्यापासून दूर राहाणं भाग होतं. आणि याचं भान लॉरेन्सला होतं, जेसीलाही होतं, पण त्यानं आग्रह केला आणि जेसीनं होकार दिला. मेबलथॉर्पला पोचल्यानंतर व्हायचं तेच झालं. जेसी एकाकी पडली. लॉरेन्सचा सहवासही तिला लाभत नव्हता. तो लिडीयाला तिचा 'पुरुष' असल्यागत जपत होता.

रविवारचा दिवस होता. जेसीनं आपली हॅट हनुवटीखाली रुंद रेशमी स्कार्फनं बांधली होती. सुरेख दिसत होती. लॉरेन्स कौतुकानं, आईला म्हणाला. "बघ कशी दिसते, जेसी!" त्यावरील आईच्या प्रतिक्रिया ? मुलाकडे टाकलेला एक कडवट दृष्टिक्षेप. त्या दिवशी संध्याकाळी लॉरेन्सला इच्छा कशी झाली कुणास ठाऊक, जेसीला घेऊन तो समुद्र किनाऱ्यावर फिरायला बाहेर पडला.

त्या रविवारच्या सायंकाळी काय घडलं,का घडलं, ते 'सन्स अँड लव्हर्स' या लॉरेन्सच्या आत्मचरित्रात्मक कादंबरीमधून कळू शकतं. या कादंबरीतील पॉल हा स्वत: लॉरेन्स आणि मिरीयम ही जेसी.

'चालत चालत दोघं दूरवर पोचले. अवतीभोवती माणूसकाणूस कुणीही नव्हतं. फक्त समुद्राची गाज वातावरणात भरून होती. दोघं परतली तेव्हा काळोख दाट झाला होता. वाळूच्या टेकड्यांआडून समुद्राची कुजबूज कानी पडत होती. दोघंही निमूट पावलं उचलत होते. अकस्मात आपल्या रक्तामधून ज्वाला फुटल्याचा त्याला भास झाला. वाळूच्या टेकड्यांच्या कडावरून नारिंगी चंद्र त्या दोघांकडे टकटक बघू लागला. पॉल चंद्राकडे पाहात निश्चल उभा राहिला. मिरीयमचं लक्ष चंद्राकडे जाताच ती हर्षभरित झाली.

तो अगदी निश्चल राहिला, भल्या थोरल्या तांबूस चंद्राकडे एकटक पाहात, दूरवर पसर-लेल्या काळोखातील ती एकमेव गोष्ट. त्याची छाती जोरात धडधडू लागली. त्याच्या हाताचे स्नायू आखडले.

"काय आहे?" त्याची वाट पाहात असलेली मिरीयम पुटपुटली.

तो वळला, आणि त्यानं तिच्याकडे पाहिलं. ती त्याच्या शेजारी होती, कायमची छायेत. तिच्या हॅटच्या सावलीनं तिचा चेहरा झाकलेला होता. ती त्याच्याकडे पाहात होती हे त्याला दिसत नव्हतं. पण ती विचारात मग्न होती, थोडीफार घाबरलेली होती–अत्यंत भारावलेली आणि धार्मिकतेची पुतळी. ती तिची सर्वोत्तम अवस्था होती. आणि तो त्या अवस्थेपुढं कमजोर होता. त्याचं रक्त त्याच्या छातीत ज्योतीगत केंद्रित झालं होतं. पण तो तिच्या शेजारी जाऊ शकला नाही. त्याच्या रक्तात धुमारे फुटत होते. पण कसंबसं तिनं त्याच्याकडे दुर्लक्ष केलं. त्याच्यामध्ये कुठली तरी धार्मिक अवस्था ती अपेक्षित होती. त्याच्या वासनेची अस्फुट चाहूल तिला लागली, आणि धास्तावून तिनं त्याच्याकडे पाहिलं.

"काय आहे?" ती पुन्हा पुटपुटली.

"तो चंद्र आहे," कपाळावर आठ्या चढवून तो म्हणाला.

"हो," तिनं दुजोरा दिला. "किती छान आहे नाही?" ती त्याच्या बाबतीत सावध झाली होती. संकट टळलेलं होतं.

आपल्याला काय होतं आहे हे त्याचं त्यालाही कळत नव्हतं. तो एवढा तरुण होता, त्याची सलगी एवढी अमूर्त होती, त्याला ठाऊक नव्हतं, तिला स्वत:च्या छातीशी घट्ट कवटाळण्याची त्याची इच्छा होती, तिथला ठणका शांत करण्यासाठी. त्याला तिची भीती वाटली. पुरुषाला स्त्रीची गरज भासते तशीच तिची गरज आपल्याला भासली असावी ही

शरमेची बाब त्यानं दाबून टाकली. असल्या गोष्टींचा विचार मनी डोकावताच ती आखडली, वेदनेच्या वेटोळ्यामध्ये संकोचली, तेव्हा तोही त्याच्या अंतर्यामी संकोचला गेला. आणि या 'पावित्र्यानं' त्यांचं पाहिलंवहिलं प्रेमाचं चुंबन घेण्यास त्यांना मना केलं. जणू काही शारीरिक प्रेमाचा धक्का सहन करणं, भावनावेगानं घेतलेलं एखादं चुंबनही घेणं तिला शक्य नव्हतं, त्यामुळं ते चुंबन देण्यास तोसुद्धा कचरला.

आणि ते अंधारातून पावलं उचलू लागले. तो निमूट चंद्र पाहात होता. ती त्याच्या शेजारून पावलं खेचत चालली होती. तिचा त्याला तिटकारा आला, कारण स्वत:चा तिटकारा त्याला करायला लावण्याला काही प्रमाणात ती कारणीभूत होती असं तो समजत होता.'

'डी. एच्. लॉरेन्स : अ पर्सनल रेकार्ड ' या आपल्या आठवणीवजा पुस्तकात जेसीनं वरील घटना सांगितली आहे ती अशी :

चंद्रप्रकाशानं जणू काही त्याच्यामध्ये उद्रेक घडवून आणला. 'तो काय म्हणाला ते आत्ता या क्षणी मला आठवणं अवघड आहे, पण त्याचे शब्द जळजळीत होते, आणि मनाच्या,- आणि शक्यता आहे देहाच्याही-कसल्यातरी भयानक बेचैनीनं तो त्रस्त होता. यात दोष माझा असल्यागत त्यानं माझ्यावर यथेच्छ तोंडसुख घेतलं. मला अतिशय दु:ख झालं, मी अस्वस्थ झाले, कारण माझ्याकडून काय चूक घडली मला कळेना. नंतर त्यानं स्वत:कडे दोष घेतला आणि आर्जवी शब्दांचा त्यानं माझ्यावर वर्षाव केला.'

जेसीसारख्या तरुण, देखण्या मुलीच्या सान्निध्यात लॉरेन्सच्या कामवासना उफाळून येत होत्या, त्याला त्रस्त करत होत्या. पण त्या वासनांची तृप्ती करून घेण्याइतपत धारिष्ट्य त्याच्या अंगी नव्हतं. शिवाय जेसीपाशी तशी विचारणा करणं त्याच्या मनाला पटत नसावं. आपल्या मनीची इच्छा ओळखून जेसीनंच प्रतिसाद द्यावा अशी तर त्याची अपेक्षा नव्हती ना? या संदर्भात पुढील घटना विलक्षण बोलकी आहे.

एक दिवस जेसीला भेटायला आलेल्या लॉरेन्सच्या सायकलचे ब्रेक्स नादुरुस्त झाले. सायकल अतिशय सावधगिरीनं चालवणं जरुरीचं होतं. तशी सूचना काळजीभरल्या सुरात जेसीनं केली. जेसी आपल्या 'आठवणी' मध्ये सांगते की त्याच्या सुरक्षिततेबद्दल तिला किती चिंता वाटत आहे हे पाहून लॉरेन्स भारावून गेला. 'सन्स अँड लव्हर्स' मध्ये लॉरेन्स सांगतो की आपल्यावरील तिची माया त्याला जाणवली. पण हे मान्य करताना तो 'पुरुष' आहे हे ती ध्यानीही घेत नाही अशी खंतही तो चिडून व्यक्त करतो.

आणि ही खंत त्याच्या मनात सतत जागी असल्यामुळं इथून पुढं जेसीबरोबरचं त्याचं वागणं चिडचिडं बनलं. तिच्यावरील टिकेचा सूर कठोर बनला. तिच्यात दोष काढून तो तिला फैलावर घेऊ लागला, टोचून बोलू लागला. एक दिवस म्हणाला, "फारच थोड्या लोकांना तू आवडतेस."

तिनं उत्तर दिलं, "मी काही फारशा लोकांना ओळखत नाही."

"लोकांना तू आवडतेस की नाही याची पर्वाच तुला नाही."





"ते माझ्याविषयी बरंवाईट बोलतात त्याला मी काय करणार?"

"तसं नाही. हे बघ," एकदम नरमाईच्या सुरात तो म्हणाला, तू कुणालाच आवडत नाहीस त्या अर्थी तुझ्यामध्ये काहीतरी दोष असलेच पाहिजेत. सगळ्यांचंच काही चुकत नसणार."

"पण माझी ज्यांच्याशी चांगली ओळख आहे त्यांना मी आवडते." तिनं ठामपणे सांगितलं.

एकदा तर तिच्या जिव्हारी लागतील असे उद्‌गार त्यानं काढले: 'शारीरिक आकर्षण वाटण्याजोगं तुझ्यात काही, अगदी काहीही नाही.'

२८ जानेवारी १९०८ ला जेसीच्या वाढदिवसाला लॉरेन्सनं तिला एक लंबंचौडं पत्र पाठवलं, लिहिलं: 'जेव्हा मी तुझ्याकडे पाहातो तेव्हा चुंबन घेण्यायोग्य आणि आलिंगन देण्यायोग्य असा तुझा देह मी पाहात नाही, तो बघायला फार सुरेख असला तरीही ... मी पाहातो ते त्यातील तुझं अंतरंग. त्यावर मी प्रेम करतो आणि आयुष्यभर प्रेम करत राहीन... हे बघ तू एक जोगीण आहेस. एका पाक जोगिणीला मी जे देईन ते मी तुला देईन. यास्तव, जिचं चुंबन मी घेऊ शकेन, जिला मी आलिंगन देऊ शकेन आणि माझ्या अपत्यांची माता बनवू शकेन अशा स्त्रीबरोबर मला तू लग्न करू द्यावंस.'

त्याच्या समस्येकडे पाहाण्याचा जेसीचा दृष्टिकोन वेगळा होता. त्याच्या या समस्येचा आपल्याशी काहीही संबंध नाही याबाबत ती नि:शंक होती. तिला एकदा तो म्हणाला होता की त्याच्यामध्ये दोन पुरुष वास करत आहेत. त्यातील एकाचे जेसीवर प्रेम आहे आणि दुसरा तिच्यावर प्रेम करू शकत नाही. त्याच्या व्यक्तिमत्वातील या दुभंगलेपणाचं मूळ आईबरोबरच्या त्याच्या नात्यात आणि लॉरेन्स कुटुंबात तिचे जे स्थान आहे त्यात आहे असं जेसीचं मत होतं. 'मिसेस लॉरेन्स... सत्ता गाजवते ती मातृत्वाच्या दैवी हक्कानं, मातेपेक्षाही धर्मोपदेशिका असल्यागत. तिच्या प्रतिष्ठेला आव्हान देणारा कुणी नव्हता, तिच्या वर्चस्वाबाबत प्रश्न उपस्थित करणं म्हणजे पावित्र्य बाटवणं असंच समजलं गेलं असतं.' लॉरेन्सबरोबरच्या तिच्या साऱ्या समस्या 'मी योग्य तेच करते,' या लिडीयाच्या अढळ समजुतीमधून उद्भवल्या होत्या.

लिडीयाचा विरोध हेच लॉरेन्सच्या त्रस्ततेचं एकमेव कारण नव्हतं. आईवरलं आपलं बरचसं प्रेम त्यानं जेसीकडे वळवलेलं होतं. परिणामी, कल्पना करणंही अशक्य व्हावं एवढे जेसीबरोबरचे त्याचे लैंगिक संबंध अवघड बनले होते. याचीच परिणती म्हणजे जेसीचं जोगणीशी साम्य असल्याचा त्याचा अट्टाहास.

जेसीच्या व्यक्तिमत्वाची चिरफाड करून लॉरेन्स तिला दूषणं देत होता. तरीही तिच्याविना तो काही करू शकत नव्हता, तिला सांगत होता की त्याचं लेखन आणि त्याच्या साहित्यिक पिंडाचा अवघा भाग तिचाच राहील. त्याच्यामधल्या वाङ्मयीन गुणांना, प्रेरणांना लिडीयानं कधीच उत्तेजन दिलं नव्हत. त्याच्यां बाबतीत तिनं ज्या काही अपेक्षा बाळगलेल्या होत्या त्या पूर्णपणे व्यावहारिक पातळीवरच्या होत्या. फक्त जेसीकडून त्याच्यामधल्या सर्जनशील

लेखकाला सतत प्रोत्साहन मिळत होतं. आपल्या लेखनाविषयीचं तिचं मत जाणून घेण्यास तो उत्सुक असायचा. आपलं लिखाण तिला वाचून दाखवण्यासाठी तो मुद्दाम तिच्या घरी जायचा. ती घरकाम करताना जिथं जिथं जाईल,तिच्या पाठोपाठ जाऊन तो तिला वाचून दाखवायचा. लेखक म्हणून त्याच्यामधले गुण तिनं हेरले, एवढंच नव्हे तर त्यांचा विकास व्हावा यासाठी आपल्यापरीनं तिनं प्रयत्न केले. तिच्यात ईर्षा नाही, बुद्धिमत्ता नाही असं तो तिला वेळोवेळी ऐकवायचा खरा, पण तिची मतं तो विचारात घ्यायचा. तिनं लेखन करावं म्हणून लॉरेन्सही तिला प्रोत्साहान द्यायचा. आपण लेखिका व्हावं असं तिलाही खूप वाटायचं. पण तिला ते जमलं नाही. चांगलं शिक्षण न मिळाल्यामुळं आपल्या पदरी अपयश आलं असं ती समजत होती. परंतु चांगलं शिक्षण लाभलेल्याचंही नसेल एवढं तिचं वाचन अफाट नि चौफेर होतं. लेखनात ती अपयशी ठरत होती तिच्यातल्या आत्मविश्वासाच्या अभावामुळं. आपल्या कर्तृत्वाविषयी ती स्वत:च साशंक होती. आणि तिची ही साशंकता लॉरेन्सबरोबरच्या संभाषणांनी वाढीला लावली होती.

या काळात जेसी एवढी खिन्न बनली होती की आपल्याला भोगाव्या लागणाऱ्या मानसिक पीडेमधून सुटका करून घेण्याचा विचार तिच्या मनात बळावला. तिनं निर्णय घेतला बाहेरगावी शिक्षिकेची नोकरी पत्करायची. तिनं अर्जही केला. तिच्या या निर्णयाला लॉरेन्स कारणीभूत आहे याची जाणीव तिच्या आईला होती. जावई म्हणून लॉरेन्स तिला कधीच पसंत नव्हता. कारण तो 'मम्मीज बॉय' होता आणि त्याची आई अन्य कुण्या स्त्रीला त्याचा कब्जा सुखासुखी देणारी नव्हती. त्याच्यापासून दूर होण्यासाठी जेसीची पळवाट मिसेस चेंबर्सला पसंत नव्हती. तिनं जेसीचं मन वळवण्याचा प्रयत्न केला. पण तो अयशस्वी ठरला. तिनं आपला बेत रहित केला, जेव्हा लॉरेन्सनं तिला सांगितल की तो थोड्याच दिवसात बाहेरगावी जाणार आहे तेव्हा. पुढं तो असंही म्हणाला की, त्याचं लग्न अन्य कुणाशी झालं तरी त्या दोघांचे भावबंध अतूट राहातील.

१९०८ च्या जुलैमध्ये लॉरेन्स 'नोटिंगहॅम कॉलेज'ची परीक्षा उत्तीर्ण झाला. दक्षिण लंडनमधील क्रॉयडॉन येथील 'डेव्हिडसन रोड हायस्कूल'मध्ये त्याला शिक्षकाची नोकरी मिळाली. नोकरीवर रुजू होण्यापूर्वी तो हॅग्ज फार्मवर गेला. तिथचं जेवणखाण केलं. संध्याकाळी तो घरी जायला निघाला तेव्हा जेसी त्याच्यासंगे घराबाहेर पडली. आवाराच्या फाटकापाशी दोघंही थांबली. तिथंच न राहवून लॉरेन्सनं तिला कवेत घेऊन तिचं चुंबन घेतलं. नंतर भानावर येऊन अपराधी सुरात पुन्हा पुन्हा म्हणाला, 'आय ॲम सो सॉरी.' ती खट्टू झाली. तिनं डोळ्यातली आसवं पुसली आणि म्हटलं, 'मनाला लावून घेण्याचं काही कारण नाही.'

निरोप घेताना तो म्हणाला, "उद्या घरी जरूर ये. चहापार्टी आहे."

ती म्हणाली, 'बघेन'.

लॉरेन्सांकडे जायची तिची इच्छा बिलकुल नव्हती. तिथं जाऊन त्याच्या आईची, बहिणींची कुजकट बोलणी ऐकावी लागतील, याची कल्पना तिला होती. तरी ती तिथं गेली आणि उपेक्षा, अवहेलना यांची धनीण होऊन माघारी आली.

## चार

१२ ऑक्टोबरला लॉरेन्स शाळेत रुजू झाला. त्याला सर्व विषय शिकवावे लागत. पगार होता वर्षाला ९५ पौंड. त्याच्या वर्गात पंचेचाळीस विद्यार्थी होते. ईस्टवूडमधल्या मुलांपेक्षा ही मुलं बरीच दरिद्री होती. त्यांच्यातली बरीचशी मुलं गार्डन अनाथाश्रमामधून आलेली होती. मुलं आडदांड होती, मग्रूर होती. त्यांना शिस्त लावण्याचा प्रयत्न करणं म्हणजे हिंस्र श्वापदांना माणसाळवण्याचा प्रयत्न करण्यागत होतं. तरीही लॉरेन्सनं हळूहळू त्यांच्यावर वचक बसवला.

सर्वस्वी अपरिचित अशा जगात लॉरेन्सनं पाऊल टाकलं होतं. इंग्लंडमध्ये त्याच्या काही चुकार फेऱ्या झाल्या असतील तेवढ्याच. या भागात तसा तो नवखा होता. शिवाय घरची माणसं सोडून तो प्रथमच दूर आला होता. एकटा राहात होता आणि हा एकटेपणा सिंदबादच्या मानगुटीवर बसलेल्या म्हाताऱ्याप्रमाणं त्याला जीव नकोसा करून टाकत होता. शाळेशेजारच्या इमारतीतच त्याला राहायला एक खोली मिळाली होती. त्याचा घरमालक मिस्टर जोन्स धंदा करणाऱ्या बायका कशा हेरायच्या, त्यांच्याशी संधान कसं जुळवायचं याचे पाठ त्याला आपणहून देत होता. इतकचं नव्हे तर त्याला कॉन्डोम पुरवण्यासही तो तयार होता. नवऱ्याशी सदानकदा भांडणाऱ्या मिसेस जोन्सलाही 'फ्लर्टिंग'ची आवड होती. पण प्रारंभीच्या या काळात एकाकीपणात तो एवढा चूर होता की अशा प्रलोभनांना प्रतिसाद देण्याची त्याची मन:स्थिती नव्हती, शिवाय तेवढं धारिष्ट्यही नव्हतं. या काळात त्याचं जीवन सुसह्य केलं ते पुस्तकांनी. तो उत्साहानं,तन्मयतेनं वाचत होता. पहिल्या वर्षीच त्याला वॅग्नर आणि नित्शे यांचा शोध लागला. त्या काळातील लेखक-कलावंतांमध्ये नित्शे अतिशय 'पॉप्युलर' होता. एच्. जी. वेल्स आणि जॉर्ज बर्नार्ड शॉं यांच्या साहित्यामधून नित्शेसंबंधी त्यानं वाचलेलं होतं. आता तर नित्शेची पुस्तकं सार्वजनिक वाचनालयात त्याला सहज उपलब्ध झाली होती.

लॉरेन्स वाचत होता, 'द व्हाईट पिकॉक'वर परिष्करण करत होता. शिक्षकाचा रटाळ पेशा सोडून लेखक म्हणून नावलौकीक मिळवण्याचं स्वप्न पाहात होता. एव्हाना त्याची केवळ एक कथा प्रसिद्ध झाली होती. तीही जेसी चेंबर्स या नावानं.

झालं असं: १९०७ च्या ऑगस्टमध्ये 'नॉटिंगहॅमशायर गार्डीयन'ने आयोजित केलेल्या कथास्पर्धेत लॉरेन्सनं तीन कथा पाठवल्या होत्या. एक स्वत:च्या नावानं, दुसरी जेसीच्या नावानं, तिसरी लुई बरोजच्या नावानं. लुई बारा वर्षांची असल्यापासून लॉरेन्स तिला ओळखत होता. 'इल्केस्टन प्युपिल-टीचर सेंटर' आणि 'नॉटिंगहॅम युनिव्हर्सिटी कॉलेज' मध्ये ती त्याच्याबरोबरच शिकत होती. साहित्यात रस असलेलं ईस्टवूडमध्ये लॉरेन्सचं जे मित्रमंडळ होतं त्यात ती सहभागी होत असे. तिच्या नावानं त्यानं 'द व्हाईट स्टॉकिंग'ही कथा पाठवली, 'रुबी ग्लास' (या कथेवरून त्यानं पुढं 'अ फ्रॅगमेंट ऑफ स्टेन्ड ग्लास' लिहिली) ही स्वत:च्या आणि 'अ प्रेल्यूड टु अ हॅपी ख्रिसमस' ही जेसीच्या नावानं

पाठवली. लॉरेन्सच्या कथेला बक्षिस मिळालं नसलं तरी तिचं आवर्जून कौतुक करण्यात आलं, पण तीन पौंडाचं बक्षीस मिळालं जेसीच्या नावानं पाठवलेल्या कथेला आणि विशेष म्हणजे साहित्यजगतात लॉरेन्सला पुढं प्रवेश मिळाला तोही जेसीच्या पुढाकारानं. तिनं त्याला सुचवलं की त्यानं स्वत:चं लिखाण 'इंग्लिश रिव्ह्यू' कडे पाठवावं. या मासिकाचा संपादक होता फोर्ड मॅडॉक्स ह्यूफर (पुढं फोर्ड मॅडॉक्स फोर्ड म्हणून नावारूपाला आला). आपलं लिखाण प्रसिद्धीला पाठवण्याबाबत लॉरेन्सनं प्रथम उत्सुकता दाखवली नाही. परंतु पत्रासोबत काही कविता मात्र जेसीकडे पाठवून दिल्या आणि लिहिलं की तिला पसंत पडलेल्या कविता तिनं 'रिव्ह्यू'कडे पाठवून द्याव्यात. जेसीनं कवितांची निवड केली आणि उत्साहात स्वत:च्या हस्ताक्षरात त्या लिहून काढल्या आणि 'रिचार्ड ग्रीसली' या नावानं 'रिव्ह्यू'कडे पाठवून दिल्या. कवितांसोबत पत्रावर तिनं स्वत:चा पत्ता लिहिला होता. १९०९ च्या ऑगस्टच्या प्रारंभी ह्यूफरकडून पत्र आलं. पत्रात कवितांची प्रशस्ती होती आणि त्या कवितांबद्दल आपण काहीतरी करू असं आश्वासन होतं. हे पत्र हाती पडताच जेसीला अस्मान ठेंगणं झालं. लॉरेन्स तेव्हा इल ऑफ वीटला कुटुंबियांबरोबर गेला होता. तो घरी परतल्याचं कळताच ह्यूफरचं पत्र घेऊन जेसी त्याच्या घरी गेली. लॉरेन्स म्हणाला, 'तू माझं भाग्य आहेस!' पुढं १९२९ मध्येही जेसीबद्दलची कृतज्ञता व्यक्त केली ती पुढील शब्दात : धागा कापून जला-वतरणासाठी नौकेला वाट मोकळी करून देणाऱ्या राजकन्येगत ' तिनं माझ्या साहित्यिक कारकिर्दीला प्रारंभ करून दिला. ' अर्थात् १९०९ मध्ये त्या पत्रामुळं लॉरेन्सच्या आईच्या कपाळाला आठ्या पडलेल्या तिला पाहाव्या लागल्या होत्या. आपल्या मुलासाठी तिनं केलेली ही लुडबूड तिला अजिबात पसंत पडली नव्हती. ते पत्रही पुढं तिच्या दृष्टीला कधी पडलं नाही. त्याच वर्षी नोव्हेंबरमध्ये 'स्टिल आफ्टरनून', 'बेबी मूव्हमेंट्स', 'डिसिप्लीन' आणि 'ड्रीम्स ओल्ड अँड नॅसेंट' या लॉरेन्सच्या कविता' 'रिव्ह्यू' मध्ये त्याच्या नावानिशी प्रसिद्ध झाल्या.

Now and again
All my body springs alive,
And the life that is polarised in my eyes,
That quivers between my eyes and mouth,
Flies like a wild thing across my body,
Leaving my eyes half empty, and clamorous,
Filling my still breasts with a flush and a flame,
Gathering the soft ripples below my breasts
Into urgent, passionate waves,
And my soft, slumbering belly
Quivering awake with one impulse of desire,

Gathers itself fiercely together ;
And my docile, fluent arms
knotting themselves with wild strengh
To clasp - What they have never clasped,
Then I tremble, and go on trembling
under the wild, strange tyrany of my body,
Till it has spent itself,
And the relentless noddality of my eyes reasserts itself,
Till the bursten flood of life ebbs back to my eyes,
Back from my beautiful, lonely body
Tired and unsatisfied.'

ही कविता लॉरेन्सनं कॉलेजमध्ये असताना लिहिली होती. या कवितेचं शीर्षक होतं 'व्हर्जिन. यूथ': लैंगिक भावनांचा आकस्मिक उद्रेक झाल्यानं एका लाजऱ्याबुजऱ्या, अद्याप ब्रम्हचर्याचं काटेकोरपणे पालन करत असलेल्या तरुणाची कासाविशी या कवितेमधून जाणवते. लॉरेन्सचे हे बोल स्वानुभवाचे होते. या काळात डझनभर पोरींची चुंबनं – गालांची, ओठांचं चुंबनं तो कधीच घेऊ शकला नव्हता– त्यानं घेतली असली तरी आपली लैंगिक भूक भागवण्यास तो धजावत नव्हता. क्रॉयडॉनलाही हा 'अव्यभिचारी तरुण' मिस्टर जोन्सच्या संगतीत राहूनही व्यभिचाराकडे पावलं वळवण्यास कचरत होता. त्याचा विषयासक्त देह तृप्तीविना तडफडत होता. त्याची ही जीवघेणी तगमग त्याच्या 'रेस्टलेसनेस' या कवितेत आविष्कृत झाली आहे :

रात्रीची वेळ. आपल्या खोलीच्या दारात पावसाच्या सरी धरण्यासाठी आपला हात पुढं फैलावून कवी उभा असतो. तो बाहेर पडतो. थरकाप उडवणाऱ्या अंधारात जातो. 'भुकेल्या' जीवासाठी मादी धुंडाळू लागतो. जाणाऱ्या येणाऱ्या बायांचे चेहरे पकडण्यासाठी, 'क्षणभर त्यांचे ओलसर गाल आणि केस गोंजारण्यासाठी,' रात्रीच्या लाटांवर तो आपल्या डोळ्यांचं, कानांचं, हातापायाचं जाळं फेकतो. आतुरतेनं न्याहाळू लागतो, त्यातील एखादी तरी प्रतिसाद देईल :

'With a laugh and a merry wildness that it was she
Who was seeking me, and had found me at last free
Me now from the stunting bonds of my chastity

त्याच्या अस्तित्वाची दखलही न घेणाऱ्या गर्दीत तो एकाकीच राहातो. एक विषयासक्त पागल म्हणून स्वत:ला शिव्याशाप देतो. या मूर्खाला विसरं कसा पडला? स्टॉलवर दाटीवाटीनं कोंबलेल्या पुस्तकांसमोर तो रेंगाळू शकतो. साहित्यात नेहमीच स्वत:ला विसरून जाऊ शकतो. साहित्य हीच त्याची एकमेव विश्वासू 'मिस्ट्रेस' आहे. नंतर अकस्मात या

तोडग्यातील फोलपणा त्याला जाणवतो.

But oh, it is not enongh, it is all no good.
There is something I want to feel in my running blood
There is something I want to touch
I must hold my face to the rain,
I must hold my face to the wind and let it explain
Me its life as it hurries in secret.

आणि एके सकाळी त्याच्यामधल्या 'पुरुषा'ला ज्याची अनिवार ओढ लागली होती ते संभोगसुख त्याला मिळालं,ॲलीस डॅक्स या विवाहित स्त्रीनं दिलं.

ॲलीस लॉरेन्सहून सहा वर्षांनी मोठी होती. पोस्ट ऑफिसात नोकरीला होती. 'कॉंग्रेशनल लिटररी सोसायटी,' आणि 'ईस्टवूड डिबेटिंग सोसायटी' या संस्थांची ती सदस्य होती. या ठिकाणी होणाऱ्या चर्चेत सहभाग घेणारी एक स्त्री म्हणून लॉरेन्स तिला गेली काही वर्षे ओळखत होता. समाजवादी स्त्रीमुक्ती चळवळीशी ती बांधील होती. तिच्या परिचितांपैकी बरेचसे पुरुष तिला वचकून असत. बऱ्याचदा ते जे सांगत त्याविरुद्ध भूमिका ती घेत असे. ॲनी बेझंट, एडवर्ड कार्पेंटर, रॅम्से मॅकडोनल्ड यांसारखी पुरोगामी विचारांची ख्यातनाम माणसं तिच्या घरी येत. तिथं होणाऱ्या चर्चेसाठी लॉरेन्स अधूनमधून जायचा. जेसीही जायची. लॉरेन्सचा ॲलीसशी परिचय इथंच झाला, मैत्रीही जुळून आली. प्रारंभी मित्रांना लिहिलेल्या पत्रांमधून तो तिची खिल्ली उडवत असे: ॲलिसची स्त्रीमुक्तीवादी मतं म्हणजे ती सुखी नसल्याचं निदर्शक आहे. तिनं भानावर यावं आणि 'इंटलेक्चुअल' बनण्याची ईर्षा सोडून देऊन एक सर्वसामान्य स्त्री बनावं. तिचं वाचन दांडगं होतं हे तो जाणून होता. तिच्या साहित्यविषयक मतांना तो किंमत देत होता. म्हणूनच 'द व्हाईट पिकॉक' चा पहिला खर्डा त्यानं तिला वाचायला दिला होता आणि तिची परखड टीका ऐकून म्हणाला होता: 'आपल्या मुलाचा शाळेचा निबंध वाचणाऱ्या आईगत' ती टीका करते. पुन्हा कधी आपलं लिखाण त्यानं तिला दिलं नाही.

ॲलीस रूपानं सामान्य होती. लहानपणी तिला वारंवार ऐकवण्यात येई की तिच्याशी लग्न करायला कुणी तयार होणार नाही. आणि म्हणून मागणी घालणाऱ्या पहिल्या पुरुषा-बरोबरच तिनं लग्न करून टाकलं. तिच्या नवऱ्याची फार्मसी होती. विक्षिप्त बाई म्हणून तिची ईस्टवूडमध्ये ख्याती होती.

या अशा तऱ्हेवाईक, रूपानं सुमार असलेल्या बाईनं लॉरेन्सला भुलवलं होतं. ही किमया घडून आली कशी? एका समारंभात ॲलीसनं आपली मैत्रीण सॅली हॉपकीनला सांगितलं. "मी बर्टला शरीरसुख दिलं. द्यावंच लागलं मला. आमच्या घरी तो आला होता. कविता पुरी करण्याची त्याची धडपड चालू होती. आणि ती काही त्याला पुरी करता येत नव्हती म्हणून मी त्याला वरच्या मजल्यावर नेलं आणि शरीरसुख दिलं."





ॲलीस सॅलीला सांगत असताना सॅलीच्या नवऱ्यानं ऐकलं. त्यानं पुढं आपल्या पत्रकार मित्राला हे गुपित सांगितलं. ही घटना नेमकी कधी घडली हे सिद्ध करणं कठीण आहे. बहुधा १९०९ च्या प्रारंभीच्या सहा महिन्यात केव्हातरी घडली असावी. कारण या वर्षीच्या मे महिन्यातील ८ तारखेला लॉरेन्सनं खुशीत येऊन ब्लांच जेनिंग्जला लिहिलं होतं की ॲलीसचा बाईपणा आता अधिक फुलला आहे आणि पुढं नमूद केलं होतं की 'माझ्यामध्ये आता खरोखरीच वाढ झाली आहे. या गोष्टीवर तू विश्वास ठेवणार नाहीस पण ती वस्तुस्थिती आहे.' लॉरेन्स – ॲलीसच्या 'अफेअर्स'ची कुजबूज ईस्टवूडमध्ये होती. जेसीच्या कानीही तशी कुणकुण आलेली होती. परंतु लॉरेन्स तसं काही करणार नाही याविषयी ती निश्चिंत होती. ॲलिसनंही तिला अगदी ठासून सांगितलं की त्या अफवा आहेत. जेसी आणि लॉरेन्स यांचे संबंध ॲलीसला ठाऊक होते. तिच्यासारख्या संवेदनशील मुलीला दुखावणं ॲलीसला प्रशस्त न वाटणं साहजिकच होतं. पुढं १९१३ मध्ये 'सन्स अँड लव्हर्स' प्रसिद्ध झाल्यानंतरही ॲलीसनं जेसीला पत्र पाठवून तिची खात्री पटावी अशा सुरात लिहिलं : पॉल मोरेल आणि क्लॅरा डॉवेस ( ती थोड्याफार प्रमाणात ॲलीसवर बेतलेली आहे हे पारिचितांच्या ध्यानी यावं) यांच्यामधलं 'अफेअर' पूर्णपणे काल्पनिक आहे. 'मी शपथेवर सांगते, ते खोटं आहे.' वस्तुत: १९१२ पर्यंत तिचं लॉरेन्सशी 'अफेअर' चालू राहिलं होतं. आणि लॉरेन्सनंही जेसीला याबाबतीत पूर्णपणे अंधारात ठेवलं होतं. विशेष म्हणजे, इतर स्त्रियांच्या संदर्भात तो जेसीशी बऱ्याचशा प्रमाणात मोकळेपणानं बोलत होता. पण ॲलीस प्रकरणाबाबत मात्र त्यानं कटाक्षानं गुप्तता राखली होती.

ॲलीस – प्रकरणामुळं लॉरेन्सच्या अंगात धीटाई संचारली असावी. फुशारकी मारल्यागत त्यानं एका भेटीत जेसीला सांगितलं, "मला लग्न करायचं आहे, नाही असं नाही,' कुणी अशी एखादी भेटली तर उद्याही लग्न करीन मी. शक्य झालं तर तुझ्याबरोबरही करीन. माझी मन:स्थिती आज अशी आहे की माझं समाधान होईपर्यंत मी एका स्त्रीकडून दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या – असा जातच राहीन."

आणि या उद्‌गारांना साजेसा तो खरोखरीच वागू लागला. जेसी होतीच. लुई बरोजशी पत्रव्यवहारानं मैत्री तो टिकवून होता. तिच्याशी लग्न करण्याचा विचारही त्याच्या मनात घोळत होता. आपला विचार त्यानं लुईला सांगितला नसला तरी जेसीच्या कानावर घातला होता. आणि तो असंही म्हणाला होता की शारीरिक भूक भागवण्यासाठीच तो लुईशी लग्न करणार आहे. जेसीचा लुईशी परिचय होता. त्यांची एकमेकांना पत्रंही जात येत. जेसीनं लॉरेन्सला स्पष्टपणे सांगितलं की असला विवाह म्हणजे पतीपत्नीमधल्या नात्याची क्रूर चेष्टा आहे. पुढं तिनं निक्षून सांगितलं की त्यानं त्याला पसंत असेल त्या कुणाही स्त्रीबरोबर लग्न करावं. पण लग्न झाल्यानंतर मात्र आपला एकमेकांशी संबंध उरणार नाही.

लुईशी लग्न करण्याचा विचार लॉरेन्स विसरूनही गेला. आता तो ॲग्नेस होल्टकडे वळला. त्याच्याच शाळेत ती शिक्षिका होती. त्याच्यापेक्षा दोन वर्षांनी मोठी. लेखक म्हणून लॉरेन्सविषयी तिच्या मनात कमालीचा आदर. त्याच्या कविता वहीत नीट उतरून घ्यायच्या

असोत, ह्यूफरसाठी 'द व्हाईट पिकॉक' ची सुवाच्च अक्षरात प्रत करायची असो, ॲग्नेस ही कामं इमानेइतबारे करायची. त्या दोघांचे लैंगिक संबंध कितपत जुळून आले होते, हे सांगणं अवघड आहे. कुठल्याही प्रकारची भावनिक गुंतवणूक होऊ न देता, विवाहबंधनात स्वत:ला अडकवून न घेता, तिच्याशी शरीरसंबंध जोडायची लॉरेन्सची इच्छा होती. पण विवाहपूर्व शारीरिक संबंध ठेवणं ॲग्नेसच्या व्हिक्टोरियन नीतिमूल्यांमध्ये बसणारं नव्हतं. लॉरेन्सला अपेक्षित असलेलं 'नागवं जीवन' भोगणं म्हणजे तिच्या लेखी महत्पाप होतं. वरवरच्या प्रणयचेष्टा तिच्या प्रकृतीला मानवत होत्या. तिचा खुळचट रोमॅन्टिकपणा त्याच्या मस्तकात जायचा, 'पण माझा इलाज नाही. खेळ सुरू होतो आणि मी तो खेळतो आणि ती छोकरी खेळते, आणि शेवट काय होणार आहे याची पर्वा कशाला?'

तरीही तिच्याशी लग्न करण्याचा त्याचा विचार होता. पैसे जमा होताच आपल्या शाळेतल्या एका शिक्षिकेबरोबर आपण लग्न करणार असल्याचं त्यानं जेसीला कळवलं. पत्रात ॲग्नेसच्या नावाचा उल्लेख मात्र कटाक्षानं टाळला. पण नोव्हेंबरमध्ये पत्र लिहून ॲग्नेसशी ओळख करून देण्यासाठी त्यानं जेसीला खास आमंत्रण दिलं. आपलं लिखाण, विशेषत: 'अ कोलिएर्स फ्रायडे नाईट' हे नाटक जेसीला वाचून दाखवण्याची इच्छाही प्रदर्शित केली.

लॉरेन्सच्या आग्रहानुसार जेसी २७ नोव्हेंबरला क्रॉयडॉनला आली. लॉरेन्सनं तिची ॲग्नेसशी ओळख करून दिली. नंतर लॉरेन्स आणि जेसी दिवसभर भटकले. रात्री त्यांनी 'द मेकिंग ऑफ अ जंटलमन' हे नाटक पाहिलं. त्यानंतर दोघंही लॉरेन्सच्या खोलीवर परतली. जेवणं झाली. लॉरेन्सनं आपलं नाटक वाचून दाखवलं. मध्यरात्र उलटली. पहाटे सहा वाजता घराबाहेर पडलेली जेसी दिवसभरच्या श्रमानं दमलीभागली होती. डोळ्यावर झोपेची झापड होती. पण 'आपण बोलत राहू या ना तासभर' ही लॉरेन्सची आर्जवी विनंती अव्हेरणं तिच्या जीवावर आलं. त्यानं प्रश्न केला की आयुष्याकडून तिच्या कोणत्या अपेक्षा आहेत? तेव्हा डोळ्यावाटे ओघळणारे अश्रू त्याच्या नजरेला पडू न देण्याची खबरदारी घेत तिनं उत्तर दिलं, "मला ठाऊक नाही. सांगता यायचं नाही मला. निभावून नेईन मी कसंतरी."

काही क्षण दोघंही मुकाट बसून राहिली. त्याची नजर तिच्यावर खिळलेली. तिची नजर इथं तिथं. थोड्या वेळानं त्यानं स्वत:ची मनोव्यथा बोलून दाखवली. एकाकी आयुष्य कंठणं त्याला दिवसेंदिवस कठीण जात आहे, लग्न करून प्रपंच थाटावा म्हटलं तर हाती तेवढे पैसे नाहीत, वगैरे वगैरे. मग प्रश्न केला, "विवाहाशिवाय शय्यासोबत करण्यास कुठली मुलगी तयार होईल?"

जेसी म्हणाली, "काही कल्पना नाही."

"असं करण्यात काही गैर आहे असं वाटतं का तुला?"

"नाही. मला नाही गैर वाटत पण माझ्या माहितीतल्या मुलींना निश्चितच वाटेल."

"तुला त्यात काही वावगं वाटत नाही ना?"

"नाही. पण त्या गोष्टीला होकार देणं तेवढं सोपं नाही."

तो क्षणभर घुटमळला आणि तोंडातल्या तोंडात पुटपुटला, "ठीक आहे. मला वाटतं, तिला मी विचारून पाहावं. ती संमती देईल? तुला काय वाटतं?"

"तुझ्यावर तिचं किती प्रेम आहे यावर ते अवलंबून आहे."

एव्हाना दोन वाजले होते. जेसीनं झोपायला जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यानं नाईलाजानं बोलणं आवरतं घेतलं. जेसी आपल्या खोलीत जाऊन झोपी गेली. रात्री केव्हातरी तिच्या दारावर टकटक झाली. ती दचकून जागी झाली. पण दरवाजा उघडायला उठली नाही. कानोसा घेत राहिली. पण टकटक पुन्हा तिच्या कानी पडली नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी तिनं त्याचा निरोप घेतला. पण आदल्या रात्रीच्या टकटकीचा उल्लेख दोघांनीही केला नाही.

दरम्यानच्या काळात आणखीन एका शिक्षिकेकडे लॉरेन्स आकर्षिला गेला होता. तिचं नाव हेलन कॉर्क. १८८२ मध्ये ससेक्समधील हेस्टिंग्ज या गावी तिचा जन्म झाला होता. तिचं घर तसं सुखवस्तू होतं. घरात कामकाज करायला मोलकरीण होती. हेलनला वाचून दाखवण्याइतपत तिच्या आईला उसंत होती. तिला वाचायला पुस्तकं आणून देण्याची तिच्या वडिलांना आवड होती. त्यांचं एक छोटं किराणा मालाचं दुकान होतं. धंद्याची भरभराट व्हावी या उद्देशानं त्यांनी एका मोठ्या घरात आपलं बिऱ्हाड हलवलं. परंतु दैवाचे फासे उफराटे पडले. सगळी मालमत्ता जप्त झाली. आणि लॉरेन्सच्या इतर मैत्रिणीप्रमाणंच विद्यार्थी शिक्षिका बनण्याचं हेलनच्या नशिबी आले. हा पेशा तिनं नाइलाजानं पत्करला. लेखिका बनण्याची तिची सुप्त मनीषा होती. स्थानिक वर्तमानपत्रात तिच्या काही कविता प्रसिद्धही झाल्या होत्या.

हेलन क्रॉयडॉन येथेच शाळेत शिक्षिका होती. ती देखणी होती. परंतु आपल्या शारीरिक सौंदर्याहून आपल्या बुद्धीचं मोल ती अधिक लेखत होती. शिवाय लैंगिकदृष्ट्या तिचं व्यक्तिमत्व दुभंगलेलं होतं. एव्हलीन आणि अँग्नेस या मेसन बहिणींशी तिची शारीरिक सलगी होती. या बहिणी लॉरेन्सच्या शाळेत शिक्षिका होत्या. त्यांनीच १९०९ च्या ऑक्टोबरमध्ये हेलनचा परिचय लॉरेन्सशी करून दिला होता.

हेलन स्वतंत्र बाण्याची होती. लग्न करावं, मुलाबाळांचं लेंढार मागं लावून घ्यावं, तिला नको होतं. हर्बर्ट मॅककार्टनी या तिच्या व्हायोलिन शिक्षकाची ती 'मिस्ट्रेस' बनली होती. हर्बर्ट विवाहित होता. त्याचं वैवाहिक आयुष्य सुखाचं नव्हतं. बायकोपासून विभक्त होऊन हेलनबरोबर राहाण्याची धमकही त्याच्या अंगी नव्हती. जनरीतीचा बाऊ हेलनला करावासा वाटत नव्हता. म्हणूनच आपल्या या प्रियकराबरोबर इल ऑफ विटला जाण्यास ती डगमगली नाही. परंतु तिथला दोघांचा सहवास सुखाचा झाला नसावा. समलिंगसंभोगाचं तिचं आकर्षण देहसंगाच्या समयी आड आलं असावं. पाचव्या दिवसानंतर हर्बर्ट माघारी आपल्या बायकोकडे परतला आणि त्यानंतर लगेच त्यानं आत्महत्या केली. या आघातानं हेलन सैरभैर झाली. पण लॉरेन्सनं तिला वेळीच सावरलं, जगण्याची उभारी दिली. तो तिच्या घरी जात होता. तिची आईही त्याचं आपुलकीनं स्वागत करत होती. त्याच्या सहवासात आपल्या

लेकीच्या मनावरचा ताण हलका होतो हे तिनं जाणलं होतं. परंतु तिच्या वडिलांना मात्र त्याला टाळणं पसंत होतं. लॉरेन्सशी बोलताना त्यांच्या शब्दांना उपरोधाची किंचितशी धार असायची.

लॉरेन्सबरोबरच्या हेलनच्या मैत्रीत शारीरिक आकर्षणाचा अंशही नव्हता. तो लेखक होता याचीच तिला भारी अपूर्वाई वाटत होती. लेखिका होण्याचं स्वप्न तीही उराशी बाळगून होती. त्या दोघांच्या बोलण्यात साहित्य, संगीत, चित्रकला, नाटकं हेच विषय असत. दोघंही दर शनिवारी फिरायला जात. चालता चालता काही वेळेला आपलं ईस्टवूडचं घर, तिथली माणसं, नॉटिंगहॅमशायरमधले अनुभव याविषयी तो बोलत असे. त्याच्या सांगण्यावरून त्याच्या 'द व्हाईट पिकॉक' चं संपादन करण्यात ती मदत करत असल्यामुळं त्याचं बोलणं म्हणजे त्या कादंबरीची पुरवणी असं तिला वाटायचं. त्या कादंबरीमधील स्ट्रेली फार्मवरील एमिली तिला आवडली होती. सिरीलबरोबरची तिची काहीशी तुटक असलेली मैत्री तिच्या लक्षात राहिली होती. एमिली ही जेसी चेंबर्स हिच्यावर बेतलेली आहे, ती शेतकऱ्याची मुलगी आहे, नॉटिंगहॅमच्या शाळेत शिक्षिका आहे, लॉरेन्सशी तिचा पत्रव्यवहार आहे इत्यादी तपशील तिला कळून आले. जेसीविषयीचं तिचं कुतुहल चाळवलं गेलं तेव्हा लॉरेन्सनं तिला जेसीचं एक पत्र दाखवलं. सांगितलं की तो तिला म्युरिएल म्हणतो, त्याच्या आईला ती अजिबात आवडत नाही, तिच्याबरोबरची मैत्री कुठल्या मार्गानं जाईल हे त्याचं त्यालाच कळत नव्हतं.

आणि त्याला हेही कळत नव्हतं की आपल्या देहात खळखळ करणाऱ्या कामवासना कशा तृप्त कराव्यात ! देखण्या तरुणींशी जवळीक लाभूनही त्यांच्याशी शय्यासोबत करणं त्याला जमत नव्हतं. शाळेच्या पगारावर लग्न करून संसार थाटणं त्याला शक्य नव्हतं. शिवाय लग्नाच्या बेडीत अडकून पडल्यानंतर शिक्षकाच्या पेशात जखडून राहावं लागणार, लेखनाला सर्वस्वी वाहून घेणं जमणार नाही या गोष्टी तो नजरेआड करू शकत नव्हता. जेसीचा जीव आपल्यात गुंतलेला आहे याचं भान त्याला होतं पण तिला कामवासनेची ओढ असेल याबाबत तो साशंक होता. तरीही शेवटी त्यानं ठरवलं, जेसीला विचारावं. मनाची तयारी केली आणि १९०९ च्या ख्रिसमस ईव्हला तो हॅग्ज फार्मवर पोचला. त्याच्या डोळ्याला डोळा भिडताच जेसीला काहीतरी चमत्कारीक वाटलं, त्याच्या डोळ्यातला भाव नेहमीपेक्षा वेगळा असल्याचंही जाणवलं आणि त्याच्या तोंडून जे ऐकण्यासाठी ती आसुसली होती ते तिच्या कानी पडलं. त्यानं सांगितलं: एवढी वर्षं त्याच्याकडून चुका होत राहिल्या. तिच्यावर त्याचं प्रेम आहे हे त्याच्या ध्यानी आलंच नाही. ॲग्नेसशी लग्न करण्याचा त्याचा विचार आता बदलला आहे. खरं तर, त्याचा तो निर्णय चुकीचाच होता. ॲग्नेसनं क्रॉयडॉनही सोडलं आहे. त्याचं जेसीवरच प्रेम आहे. तिचा आजवरचा सहवास, तिची मैत्री म्हणजे उत्कट प्रेमसाफल्याची पूर्वतयारी होती. तिच्याशी लग्न करण्याचा त्याचा विचार आहे. पण याबाबत कुणाहीपाशी तिनं चुकूनही बोलू नये. या क्षणापासून तो तिचा होता.

तो बोलत होता आणि जीवाचा कान करून ती ऐकत होती.

त्या संध्याकाळी त्या दोघांनी भावनावेगानं चुंबनं घेतली (चुंबन घेण्यास लॉरेन्स नेहमीच नाखुष असायचा. ही नाखुषी आयुष्यभर राहिली, अगदी देहसंगाच्या उत्कट क्षणीही तो चुंबन घेणं टाळायचा). त्याची 'मिस्ट्रेस' होण्यास तिनं होकार दिला. त्यानं धीर दिला की गर्भ राहाण्याची भीती तिनं बाळगण्याचं काहीही कारण नाही. त्याबाबत योग्य ती दक्षता तो घेणार होता. कॉंडोम पुरवण्यास त्याचा घरमालक समर्थ होता.

त्या दिवशी दोघांचा वाङ्‌निश्चय अनौपचारिकरीत्या एकांतात पार पडला.

२८ जानेवारीला लॉरेन्सनं ब्लॉंच जेनिंग्जला पत्र लिहून कळवलं, जुन्या छोकरीच्या सहवासाला तो आता पुरता कंटाळून गेला आहे. जुनाट नीतिमूल्यं जपणारी ती बाई, पुरुष हा नर आहे, चुंबनं ही केवळ नांदी आहे आणि देहसंगात प्रेमाची पूर्ती आहे हे मानायलाच तयार नाही. तिचा त्याला उबग आला आहे. तिला तो खूप खूप आवडतो असं ती म्हणते, पण तो निव्वळ बहाणा असावा. तिच्याबरोबरचे संबंध तो आता संपुष्टात आणणार आहे. वगैरे वगैरे. आणि पुढं लिहिलं, 'ख्रिसमसला जुनी ज्योत पुनश्च प्रज्वलीत झाली, क्षीण आणि दिसते न दिसते अशी, ऑल्कोहॉलच्या ज्योतीगत, जी डांबराच्या पिंपाला पेटवून देते. पूर्वीचीच छोकरी आहे ती. तिला फार दिवसापासून माझ्याबद्दल गाढ आपुलकी आहे. ती मला चांगली ओळखते, आणि मी तिला ओळखतो.... पुन्हा पुन्हा आम्ही पागल क्षण अनुभवले, तिनं आणि मी – काय आश्चर्य आहे, दहा वर्ष उलटून गेली आणि या कालावधीत मी क्वचितच तिचं चुंबन घेतलं असेल. तिचे केस काळेभोर आहेत, डोळे सुरेख आहेत, टपोरे आणि गडद, अतिशय संवेदनाशील. तिचा चेहरा ती माझ्याकडे उंचावते आणि मला बिलगते आणि कोसळणाऱ्या उल्केगत वेळ जातो, निमिषार्धात उघडमीट करणारा ..... निरोप घेण्याचा क्षण येतो तेव्हा पहिलं चुंबन प्रदीर्घ वाटेनासं होतं. लौकरच एका वीक-एन्डला ती माझ्याकडे येणार आहे. आम्ही क्रॉयडॉनला राहाणार नाही, लंडनला राहू. विश्व आमच्यासाठी आहे आणि आम्ही एकमेकांसाठी आहोत– केवळ एका वसंत ऋतूपुरतं का असेना– बिघडलं काय त्यात? माझ्या आणि तिच्या घरची काय म्हणतील? – पण मी कसली पर्वा करायची? छट् बिलकुल नाही– त्यांना कळून येणार नाही.

मी धनी आहे माझ्या प्राक्तनाचा
मी कप्तान आहे माझ्या आत्म्याचा

ज्या गोष्टींची अन्य कुणापाशीही वाच्यता करू नये अशा साऱ्या गोष्टी मी तुला का सांगत आहे, मला कळत नाही! कारण, मला वाटतं, माझ्यापाशी तू विचारणा केली होतीस. पण माझं पत्र जाळून टाक, जाळशील ना मेहरबानी करून? आणि मला सांग, तुला वाटतं, मी गैर केलं?'

पत्राचा समारोप करताना लिहिलं : 'एका नवीन छोकरीबद्दल मी तुला सांगेन-एक छोकरी, जिच्याविषयी मला 'आस्था' आहे-बस्स, तेवढंच– पुढल्या वेळेला मी लिहीन इथली छोकरी-हेलन म्हणतो तिला-अतिशय छान आहे ती!

या पत्रातील तीन छोकऱ्या, अनुक्रमे ॲग्नेस, जेसी आणि हेलन.



अनुक्रमणिका

५–६ मार्चच्या वीक-एन्डला जेसी क्रॉयडॉनला आली. तिथं लॉरेन्सच्या खोलीत दोघांचा समागम घडून आला. या पहिल्या समागमाचा अनुभव दोघांनाही फारसा समाधानकारक ठरला नसावा असं 'सन्स अँड लव्हर्स' मधील पुढील वर्णनावरून वाटतं :

'त्याची कॉलर तो सोडवत असताना, बिछान्यावर पडलेल्या तिच्याकडे पाहाण्यास तो विसरला नाही. पहिल्यांदा त्यानं तिचं केवळ सौंदर्य पाहिलं आणि त्यानं तो दिपून गेला. त्यानं कल्पनाही केली नसेल एवढा तिचा देह सुंदर होता..... आणि नंतर ती त्याला हवी-हवीशी वाटली, परंतु तो तिच्याकडे झुकला तसे तिचे हात काहीशा काकुळतीनं उचलले गेले, आणि त्यानं तिच्या चेहऱ्याकडे पाहिलं, आणि तो थबकला. तिचे टपोरे पिंगट डोळे त्याला न्याहाळत होते, निश्चल आणि शरणागत आणि प्रेमळ; स्वत:ला समर्पित केल्यागत जणू काही ती पहुडली होती. त्याच्यासाठी तिथं तिचा देह होता; परंतु बळी जाण्याची वाट पाहाणाऱ्या प्राण्यागत तिच्या डोळ्यातील खोलवरच्या नजरेनं त्याला रोखलं आणि त्याचं रक्त थंडगार पडलं.

"तुला खरंच का मी हवाय?" त्यानं विचारलं, जणू काही एखादी हिमछाया त्याच्यावर पसरली होती.

"हो, खरंच हवायस."

ती अत्यंत निश्चल होती, अत्यंत शांत होती. तिला एवढंचच जाणवलं होतं की त्याच्यासाठी ती काहीतरी करत आहे. हे सहन करणं त्याला असह्य झालं. त्याच्यासाठी बलिदान करण्यासाठी ती पडून राहिली होती, कारण तिचं त्याच्यावर गाढ प्रेम होतं. आणि त्यानं तिचा बळी घ्यायलाच हवा. क्षणभर त्याला वाटलं की तो विकारहीन वा मृत झाला आहे. नंतर त्यानं आपले डोळे पुन्हा मिटले, आणि त्याचं रक्त पुन्हा सळसळलं.'

तरीही ९ मार्चच्या पत्रात लॉरेन्सनं जेसीला कळवलं की तिनं त्याच्यावर थोर उपकार केलेत. ती क्रॉयडॉनला त्याच्या निकट असावी असं त्याला फार फार वाटतं. ती जवळ नसल्यानं त्याच्या जीवाला चैन कशी ती नाही. स्पर्शसुखासाठी, बाहुपाशातली धुंदी अनुभवण्यासाठी ती जवळ असावी. पुढल्या समागमासाठी तिनं तयार असावं म्हणून तिला खूष करण्यासाठीच वरील पत्र त्यानं पाठवलं असावं.

वरील पत्र पाठवून दोन आठवडेही उलटले नाहीत त्यानं जेसीला पत्र लिहून कळवलं की ॲलीस डॅक्स लंडनला आली असता त्याला भेटली. तिच्याबरोबर तो संगीताच्या कार्यक्रमाला गेला. संगीतानं त्याच्यावर एवढी जादू केली की त्या धुंदीत ॲलीस जिथं उतरली होती त्या हॉटेलमध्ये तिच्याबरोबर गेला 'मी तुझ्याशी बेइमानी केली. प्रामाणिक राहीन असं वचन काही मी तुला देऊ शकत नाही. सकाळी मी किती उदास असतो तुला ठाऊक आहे. तुझ्याशी वाङ्‌निश्चय झाल्याचं मी तिला सांगितलं. आता तिच्याबरोबरचे संबंध अर्थातच संपुष्टात आलेत– दरवाजाच्या पायऱ्यांवर इत:पर बसणे होणार नाही.'

मार्च अखेरीस जेसी व लॉरेन्स एका वीक-एन्डला क्रॉयडॉनला भेटली. या वेळी बहुधा त्यांनी हॉटेलमध्ये खोली घेतली असावी. लॉरेन्सच्या घरमालकाच्या आदरातिथ्यानं (की






अनुक्रमणिका

चौकस नजरेनं) जेसीला अवघडल्यासारखं होत असल्यामुळं तिनंच जागेचा बदल सुचवला असावा. पण जागा बदलूनही या समागमानेही लॉरेन्सची घोर निराशा केली. त्यानंतर जेसीला पाठवलेल्या पत्रात त्यानं त्रागा केला की त्याच्या वासना उद्दिपीत करण्यात ती उणी पडते. त्याला भोगतंद्री लाभत नाही. बैचेनी मात्र वाढते. 'मी आत्तापर्यंत समजून चाललो होतो की आयुष्यात स्त्रीला किंमत मोजावी लागते, पण मला शोध लागला आता की किंमत मोजतो तो पुरुष, स्त्री नव्हे' इ. इ. पुढं इस्टरलाही त्या दोघांनी काही काळ एकमेकांच्या सहवासात घालवला. या भेटीसमयी त्यांचा संग घडून आला होता की नाही हे स्पष्ट नाही. पण एव्हाना जेसी त्याच्या मनातून पार उतरली होती. त्याच्या जीवाची तगमग ११ मे रोजी हेलनला त्यानं लिहिलेल्या पत्रात दिसते :

'म्युरिएलचं काल सकाळी पत्र आलं. तिनं बाजी मारली असल्याची तिची समजूत झाली आहे. अत्यंत प्रेमानं आणि पूर्ण विश्वासानं तिनं लिहिलं आहे. मी एवढा गाफील केव्हापासून झालो? माझ्या संकल्पांचं मला असं कसं विस्मरण झालं? खरंच, 'आश्चर्य करण्याजोगं आहे हे! पक्षी बसताच झाडावरून अलगद पडलेलं सफरचंद ज्या सहजपणे उचलावं त्याच सहज-पणानं तिनं मला जवळ केलं आहे. माझी इच्छाशक्ती मी गमावून बसलो आहे. असं औदासिन्य आणि असा सुन्नपणा मी यापूर्वी कधी अनुभवलेला नव्हता. आणि आता म्युरिएलनं कळवलं आहे, शनिवारी ती येते आहे.

'म्युरिएल मला जवळ घेईल. थोर उपकार तिचे माझ्यावर—क्षणापुरते. पण लौकरच जे काही घडून येणार आहे त्यानं माझ्या उरात धडकी भरली आहे. याबाबतीत मी असहाय्य आहे– काहीच करू शकत नाही मी!'

जेसीनं कळवल्यानुसार ती लॉरेन्सला भेटली. या वेळी वसंत ऋतुतील बहरलेल्या निसर्गाच्या सान्निध्यात, सुवासिक फुलांच्या बिछायतीवर, दोघांचा समागम घडून आला.

You upon the dry, dead beech - leaves, in the fire on night
Burnt like a sacrifice; you invisible;
Only the fire of darkness, and the scent of you!
— And yes, thank God, it still is possible,
The healing days shall close the darkness up
Wherein we fainted like a smoke or dew.

Like vapour, dew, or poison. Now, thank God,
The fire of night is gone and your face is ash,
Indistinguishable on the grey, chill day;
The night has burnt us out, . . . . .

*('Scent of Irises')*

I am ashamed, you wanted me not to-night.
And it is always so, you sigh against me.
Your brightness dims when I draw too near and my free
Fire enters you like a frost, like a cruel blight.'

*('Lilies' in the Fire')*

पुन्हा घोर निराशा.

खरं म्हणजे विवाहपूर्व समागमाला जेसीनं अनुमती द्यावी हे आश्चर्यच! त्या काळातील उच्चवर्गीय शिक्षित स्त्रिया अशा संबंधात काही गैर आहे असं मानत नसल्या तरी जेसी तशा स्त्रियांपैकी नव्हती. शिवाय शिक्षिकेची नोकरी टिकवण्यासाठी स्वत:चं चारित्र्य निष्कलंक राखणं तिला जरूरीचं होतं. लॉरेन्सनं घेतलेली खबरदारी जर का अयशस्वी झाली असती तर कुटुंबियांचा आधार ती गमावून बसली असती, गावात नाचक्की झाली असती. लॉरेन्सनं दिलेल्या लग्नाच्या वचनाला भुलून तिनं संमती दिली? 'नवरा जसा आपल्या पत्नीवर प्रेम करतो तसं प्रेम मी तुझ्यावर करू शकणार नाही' या त्याच्या उद्‌गाराचं तिला विस्मरण व्हावं? दिल्या वचनाला तो जागला असता ही शंकाही तिच्या मनात डोकावू नये ? आपल्याविषयी त्याच्या आईच्या मनात कमालीची असूया आहे आणि तिच्या इच्छेबाहेर जाण्याचं धैर्य लॉरेन्समध्ये नाही हे ती का जाणून नव्हती? की, ज्याच्यात आपला जीव पुरता गुंतलेला आहे त्या प्रियकराला तो मागेल ते देणं ही समर्पणाची भावना तिच्यात बल-वत्तर ठरली होती?

शारीरिक आकर्षण जिच्यात बिलकुल नाही असं म्हणणारा लॉरेन्स स्वत:च्या कामवा-सनेच्या तृप्तीसाठी जेसीच्या देहाचा वापर करायला उद्युक्त झाला होता हे उघड गुपित आहे. समागमात तृप्ती न होता उलट असमाधानाची भावना बळावते आणि या दोषाचं खापर तो जेसीवर फोडतो हे विशेष! जेसी स्त्री होती, रतिक्रीडेत पूर्णपणे अननुभवी होती. काही चुंबनं एवढ्यापुरतीच तिची लॉरेन्सशी शारीरिक सलगी होती. भावी चिंतांचं दडपण तिच्या मनावर असणं स्वाभाविक होतं. अशा परिस्थितीत चारपाच समागमात ती निर्भर सुख त्याला देऊ शकली नाही म्हणून लॉरेन्सनं तिला दूषणं का द्यावीत ? तो पुरुष होता. ॲलीस डॅक्समुळं त्याला समागमाचा अनुभव होता. पण हा अनुभव जेसीबरोबरच्या देहसंगात उणा पडत असावा. कारण उघड होतं. ॲलीस पुढाकार घेणारी होती,लॉरेन्स फक्त 'पॅसिव्ह' सहभागी होता. ॲलीस अनुभवी असल्यामुळं ही किमया ती करू जाणे. जेसीकडून तशीच अपेक्षा त्यानं का करावी? जेसी सांगते, पाचेक वेळा तिचा लॉरेन्सशी समागम घडून आला. प्रत्येक वेळी उत्स्फूर्ततेचा त्याच्यामध्ये अभाव असलेला तिला आढळून आला होता. कामप्रेरणांनी ढकलून दिल्याप्रमाणं तो तडक तिच्या देहाशी झोंबत होता. या समयी तिनं त्याला हातांनी धरायचं नाही असं बंधन त्यानं तिच्यावर घातलं होतं. समागमा आधी प्रणयक्रीडा न करता तडक देहाला भिडण्याच्या त्याच्या प्रवृत्तीमुळं ती अवघडून जात होती, एकूण प्रकारच तिला त्रासदायक ठरत होता.

जेसीबरोबरच्या समागमाचं चित्रण लॉरेन्सनं 'सन्स अँड लव्हर्स' मध्ये केलं आहे. पण त्यावेळच्या त्याच्या प्रतिक्रिया तत्कालिक होत्या. १९१६ मध्ये त्यानं 'वूमेन इन लव्ह' ही कादंबरी लिहिली. ही कादंबरी जेसीनं वाचली होती. त्यातील रुपर्ट बिरकीन ही लॉरेन्सची प्रतिकृती आहे आणि हरमिऑन रॉड्डीसमध्ये आपल्या स्वभावछटा मिसळल्या गेल्या आहेत हे तिच्या ध्यानी आलं होतं. पण या कादंबरीत उपोद्घात समाविष्ट करण्यात आलेला नव्हता. तो उपोद्घात तिच्या वाचनात आला असता तर रुपर्ट आणि हरमिऑन यांच्या समागमाचं लॉरेन्सनं केलेलं चित्रण आपल्याबरोबरच्या त्याच्या समागमाच्या अनुभवाच्या आधारे केलं असल्याचं तिला कळून चुकलं असतं. या उपोद्घातामध्ये लॉरेन्सनं अत्यंत प्रांजळ आणि निर्भीड कबुलीजबाब दिला आहे. लॉरेन्सच्या वर उधृत केलेल्या कविता आणि जेसीची विधानं लक्षात घेता उपोद्घातामधील पुढील उतारे आत्मचरित्रात्मक नाहीत असं म्हणणं कठीण आहे.

'त्याला तिची यत्किंचितही अभिलाषा नव्हती : त्याला तिची आसक्ती नव्हती, त्यांच्यामध्ये वासनांचा चढता आवेग नव्हता, होती ती कलेकलेनं क्षीण होत जाणारी केवळ मिणमिणती कामप्रेरणा...

'याला तो प्रेम समजत नव्हता. तरीही तिच्याशी तो बांधला गेला होता, आणि तिला सोडून देणं म्हणजे मानसिक यातना. आणि अन्य कुणावर त्याचं प्रेम नव्हतं. कुठल्याही स्त्रीवर तो प्रेम करत नव्हता. त्याला प्रेम करायचं होत....

'त्याचं हरमिऑनवर प्रेम नव्हतं, तिची त्याला आसक्ती नव्हती. पण तिच्यावर प्रेम करण्याची आणि तिची अभिलाषा बाळगण्याची स्वत:वर त्याला सक्ती करायची होती. कामवासनांनी तो पेटलेला होता, आणि त्यांची पूर्ती त्याला करायची होती. तरी हरमिऑनची आसक्ती त्याला वाटत नव्हती. उलट ती त्याच्या मस्तकात जात होती. तरीही ही शारीरिक भूक त्याला भागवायची होती, देहसंग करायचा होता. म्हणूनच तिच्याकडे त्यानं स्वत:ला खेचून नेलं होतं.—

'तिलाही तो नको होता. पण तो तिला हवा आहे अशी अंत:करणपूर्वक स्वत:ची समज करून घेण्याची तिला निकड वाटत होती. त्याला जे हवं होतं, ज्यासाठी तो तडफडत होता, देहाची भूक भागवण्यासाठी त्यानं जो आग्रह धरला होता त्यासाठी काहीही तिनं केलं असतं. ती शहाणीसुरती होती, चांगलंच घडेल असं ती समजत होती. त्याच्यासाठी एखाद्या परिपूर्ण बळीगत ती स्वत: सज्ज झाली होती. तिनं आनंदानं स्वत:ला त्याच्यासमोर अर्पण केलं, त्याच्या इच्छापूर्तीसाठी स्वत:ला त्याच्या स्वाधीन केलं.

'पण ते कठोर अपयश ठरलं, केवळ अपयश. तिच्याकडून आग्रहानं मागणी केलेला अखेरचा देहसंग म्हणजे दु:खाची परीसीमा होती, तो अतिसामान्य होता, तद्दन रद्दड. तिच्याकडून त्याला आनंद मिळाला नव्हता, मिळाली केवळ अल्पशी मानहानी आणि तिचं

अंत:करण दु:खानं विदीर्ण झालं.

. . . तिची इच्छा होती त्यानं तिचा उपभोग घ्यावा, त्याच्या वासनांनी तिला विदीर्ण करावं,त्याच्या अभिलाषेनं तिला नेस्तनाबूत करावं,अगदी त्याचं समाधान होईस्तोवर . . .

'पण तेवढी त्याची कुवत नव्हती,तो उणा पडला. तिचा उपभोग घेऊन तिला नामशेष करणं त्याला जमलं नाही. तिला तो विसरू शकत नव्हता. त्यांच्यामध्ये अत्यंत विरळा अशी आत्मिक सलगी होती,यामधून स्वत:ला खेचून बाहेर काढणं,आणि रानटयासारखं येऊन स्वत:ची तृप्ती करून घेणं आता त्याला जमत नव्हतं. बलिदान केल्यागत ती पडलेली असताना,तिचं अस्तित्व, आणि तिची धास्ती ,आणि तिच्या पिळवटून टाकणाऱ्या वेदना यांची तीव्र जाणीव त्याला होती. तिच्या भावनांची त्याला अतिशय कदर होती. त्याच्या पिसाटलेल्या इच्छेनुसार तिला नेस्तनाबूत करणं,तिला तुडदावणं,आणि तिच्याकडून समाधान मिळवणं त्याला शक्य होत नव्हतं. तो पुरेसा अनुभवी नव्हता, पुरेसा कठोर नव्हता. तिच्या भावनांचं भान त्याला सदैव असायचं, त्यामुळं त्याच्या स्वत:च्या भावना उरलेल्या नसायच्या. परिणामी,त्यांच्यामधला हा अखेरचा समागम लज्जास्पदरीत्या अपयशी ठरला,सहन करणंही अशक्य व्हावा एवढा निर्दयी.'

'तो तिला नेस्तनाबूत करू शकत नसल्यामुळं,'हरमिऑन' त्याचा तिटकारा करत होती.' आणि तो 'तिचा तिरस्कार करत होता,'कारण प्रेम करण्याची क्षमता तिच्यात नव्हती,त्याच्याविषयी तिला अभिलाषा नव्हती,त्याच्याबद्दलच्या कुठल्याही प्रकारच्या शारीरिक वासनांची तिच्यामध्ये पूर्ण वानवा होती. म्हणूनच बिरकीन अन्य स्त्रियांकडे वळतो. 'सन्स अँड लव्हर्स' मधील देहसंगाला आठवडा उलटल्यानंतर पॉल आपल्या आईला सांगतो की यापुढं तो मिरीयमला कधीच भेटणार नाही. आणि तो अचानक मिरीयमला सोडचिठ्ठी देऊन क्लॅराकडे वळतो, तसाच लॉरेन्सही जेसीकडे पाठ फिरवून हेलनकडे वळला, मिसेस डॅक्सबरोबरची स्वत:ची सलगी मात्र त्यानं त्या दोघींपासून लपवण्याची दक्षता घेतली.

लॉरेन्स आणि हेलन यांची सलगी दाट होत गेली त्याला कारणीभूत ठरली तिची 'द फ्रेशवॉटर डायरी.' या डायरीत तिनं मॅककार्टनीबरोबर घालवलेल्या पाच दिवसांचा तपशीलवार वृत्तांत लिहून ठेवला होता. १९१०च्या फेब्रुवारी–मार्चमध्ये या डायरीचा सुगावा लॉरेन्सला लागला. त्यानं ती वाचायला देण्याची विनंती केली. तिनं ती त्याला दिली. ती वाचल्यानंतर तिच्या आधारे कादंबरी लिहिण्याची इच्छा त्याच्या मनात रुजली. आपला मनोदय त्यानं तिच्यापाशी व्यक्त केला. तिनं आनंदानं मान्यता दिली. त्यानं 'द सॅगा ऑफ सिगमंड,' पुढं 'द ट्रेसपासर' या नावानं प्रसिद्ध झालेली कादंबरी त्यानं लिहायला सुरुवात केली. (त्याच कथानकावर हेलननं लिहिलेली 'न्यूट्रल ग्राऊंड' ही कादंबरी १९३३मध्ये प्रसिद्ध झाली. ) लिहिता लिहिता तो स्वत: सिगमंडमय झाला,हेलनचा अनुनय करू लागला.

हेलननं स्वत:ला विचारलं लॉरेन्सबरोबरच्या तिच्या मैत्रीचं स्वरूप काय? एकमेकाविषयीच्या आपल्या दोघांच्या भावना काय आहेत? त्याच्याबद्दल तिला नेमकं काय वाटतं? जिव्हाळा आणि कौतुक. त्याच्या मनाची गूढता आणि कल्पनाशक्तीची झेप घ्यानी

येताच त्याच्याबद्दल एक प्रकारचा धाक वाटतो. त्याला तिच्याविषयी काय वाटत असेल? तो 'सॅगा' लिहीत असल्यामुळं तो मॅककार्टनीची भूमिका जगत आहे, तिच्याशी सलगी करू पाहात आहे. त्याची ही अवस्था 'अॅबनॉर्मल' असली तरी ती फार काळ टिकणार नाही. कलावंत आणि व्यक्ती यांची गल्लत तिनं करता कामा नये. कादंबरी लिहून पूर्ण झाली की तो पूर्ववत लॉरेन्स होईल, तिच्याकडे बघण्याचा त्याचा दृष्टिकोन आपसूकच बदलून जाईल.

हेलननं स्वत:ची अशी समजूत घातली असली तरी लॉरेन्स तिची अभिलाषा बाळगून होता, तिच्याशी समागम करण्याचा विचार त्याच्या मनात रुंजी घालत होता. एकांतात त्याच्या वासना हलकेच डोकं वर काढतात.

And then I offer all myself unto
This woman who likes to love me : but she turns
A look of hate upon the flower that burns
To break and pour her out its precious dew.

And slowly all the blossom shuts in pain,
And all the lotus buds of love sink over
To die unopened : when my moon-faced lover,
Kind on the weight of suffering smiles again

*('Lotus Hurt By The Cold')*

लॉरेन्सला हवंहवंसं असणारं शरीरसुख देण्यास हेलन नकार देत होती. तिच्या नकारानं तो चिडचिडत होता, तिचा तिरस्कार करत होता. आणि तरीही तिला विनवत होता.

....Strip me naked, touch me light
Light, light all over.
For I ache most earnestly for your touch,
Yet I cannot move, however much
I would be your lover.'

*('Excursion')*

आणि तरीही ती थंडगार गोळ्यागत; वासनेचा मागमूसही नसलेली! 'Only a mean arithmetic on the face of things / A cunning algebra in the faces of men' पाहाण्याचा एवढा सोस तिनं का धरावा! आपला प्रियकर म्हणजे एक कॅलेइडोस्कोप आहे या भावनेनं ती तो सारखासारखा हलवत राहाते आणि तरीही तिला हवी असलेली आकृती काही तिच्या दृष्टीसमोर येत नाही! हा अट्टाहास कशापायी! त्यापेक्षा 'Close your eyes, my love, let me make you blind.'

आणि तरीही ती त्याच्या वासनेला, आग्रहांना, विनवण्यांना बळी न पडण्याची खबरदारी

घेत होती.

त्या दोघांचं सख्य जेसीला रुचत नव्हतं. आणि ते स्वाभाविक होतं. त्यानं तिला विवाहाचं वचन दिलं होतं. त्याच्या वासनांपूर्तीसाठी आपला देह तिनं त्याच्या स्वाधीन केला होता. आणि लॉरेन्सनं तिच्याशी प्रतारणा करावी! अन्य स्त्रीशी प्रियाराधन करावं! तिनं त्यासंबंधी आपल्या नेहमीच्या स्वभावानुसार सौम्य भाषेत त्याच्याकडे विचारणा केली. त्यावर लॉरेन्सनं साळसूदपणे खुलासा केला की हेलनच्या जीवनावर तो कादंबरी लिहीत होता आणि या कादंबरीलेखनासाठी तिच्या भेटीगाठी आवश्यक होत्या. जेसीनं त्यांच्या स्नेहाचा उगाच बाऊ करू नये. जेसी निमूट राहिली.

जुलैला 'द ट्रेसपासर' चा पहिला खर्डा तयार झाला. या महिन्याच्या मध्यावर जेसी प्रथमच हेलनला भेटली, क्रॉयडनला, लॉरेन्सच्या खोलीवर. जेसीच्या व्यक्तिमत्वाची हेलनवर छाप पडली. लॉरेन्सच्या तोंडून जेसीविषयी तिनं जे आजवर ऐकलेलं होतं तशी ती नसल्याचं तिला आढळून आलं. जेसीमधील जिव्हाळा, खंबीरपणा तिला विशेषत्वानं जाणवला. तिला ती भलतीच आकर्षक वाटली. चहा करतानाच्या तिच्या हालचालीमधला डौल हेलनला मोहक वाटला. लॉरेन्स पांघरूण अंगावर ओढून घेऊन कुण्यातरी आधुनिक कवीवर कडाडून टीका करत होता. त्याचं काहीतरी बिनसलं असल्याचं हेलनच्या ध्यानी आलं. चहापाणी होताच तिनं तिथून काढता पाय घेतला. त्यानंतर जेसीला स्टेशनवर निरोप देऊन लॉरेन्स हेलनच्या घरी पोचला. त्यानं विचारलं, "म्युरिएलबद्दल तुला काय वाटतं ? तिच्याबाबतीत त्यानं काय करावं? आणि आपल्या दोघांचं काय?"

हेलनला सांगितलं, "मला वाटतं, डेव्हीड, तुला अखेर तिच्याकडेच जावं लागेल."

तिचे उद्गार कानी पडताच त्याच्या चेहऱ्यावर तुसडेपणा पसरला. त्याची अपेक्षा, जेसीच्या विरोधात पुरावे सादर करून जेसीबरोबरच्या लग्नाला तिनं विरोध दर्शवावा. तिच्या ध्यानी आलं, लॉरेन्स अद्यापही मॅककार्टनीच्या भूमिकेतच आहे.

जेसीला लॉरेन्स पुरता विटला होता. काहीही करून हेलनशी संधान जुळवायला तो आसुसला होता. ३१ जुलैला इस्टवूडहून त्यानं हेलनला पत्र लिहिलं.

'सूर्यास्ताला तुला पत्र लिहायला मी सुरुवात केली. आता. . . . जवळजवळ मध्यरात्र झाली आहे. मी सैतानाएवढाच दुःखी आहे.

'जाऊ दे, बेट कसं काय वाटलं तुला? कितींदा तरी तुझा विचार माझ्या मनात आला. मला खूप खूप वाटत होतं, फ्रेशवॉटरला मी तुझ्याबरोबर असायला हवं होतं, – पण असंबद्धता! एखाद्याला ती किती बेजार करून टाकते!

'म्युरिएल मला भेटली. फार सुंदर आहे ती आणि अतिशय उल्हसित. मला भेटायला ती काल आली होती. माझं चुंबन घेते ती. काळजाची राखोंडी झाल्यागत वाटतं. पण त्यानंतर ती आणखीन चुंबन घेते आणि माझा कामाग्नी भडकावते. माय गॉड, हिडीस प्रकार. उद्या मी तिथं जायचं, गुरुवारपर्यंत राहायचं असं आश्वासन दिलं आहे मी. तेवढा धीट असलो तर राहाणार नाही मी. तूर्त तिथं राहाण्याचा माझा बेत नाही. मला तिला सांगायलाच हवं की

आपण निश्चितपणे एकमेकांपासून कायमचं दूर व्हायला हवं; तिला सांगण्याएवढं मला धैर्य असलं तर .....

'पण निराधार असल्यागत माझ्याकडे जेव्हा ती पाहाते तेव्हा मला वाटतं,तिला थोडीशी खूष करण्यासाठी मी तिचं चुंबन घ्यायलाच हवं. पण उद्या जायची माझी इच्छा नाही.

'मी तसा अधम प्राणी आहे. पण तिला एवढं दुखवू शकेन! मी घरी यायलाच नको होतं. वाटतं,असं असं एकत्र आणून प्रारब्धानं माझा छळ करायला नको होता. आणि फ्रेश-वॉटरमध्ये तुझा.

'असो-'आपण यातून सहिसलामत बाहेर पडू. मला विसरू नकोस आणि वाचत असताना कंटाळल्यागत हसू नको.'

लॉरेन्सचं पत्र हेलनच्या हाती पडेस्तोवर जेसी-लॉरेन्सचा अनौपचारिक वाङ्‌निश्चय मोडला होता. १ ऑगस्टला ठरल्याप्रमाणं दोघांची भेट झाली तेव्हा लॉरेन्सनं आपला निर्णय तिला सांगितला. लॉरेन्सबरोबरच्या आपल्या संबंधात त्याच्या आईनं नाक खुपसल्यामुळचं त्यानं हा निर्णय घेतला अशी जेसीनं समजूत करून घेतली. पण तिचा समज चुकीचा होता. आपल्या मुलाच्या निर्णयानं लिडीयाला आनंद खचितच झाला असेल,पण त्यांच्या लग्नात मोडता घालण्यात तिचा अजिबात हात नव्हता.

जेसी-लॉरेन्सचा वाङ्‌निश्चय मोडला पण मैत्री राहिली.

दरम्यानच्या काळात फोर्ड मॅडॉक्स ह्यूफरमुळे लॉरेन्स लंडनच्या साहित्यिक वर्तुळात परिचित झाला होता. जोसेफ कॉनरॅड,हेन्री जेम्स,थॉमस हार्डी,जॉन गाल्सवर्दी यासारख्या मान्यवर लेखकांचं लिखाण ज्या मासिकात छापून येत होतं त्या 'इंग्लिश रिव्ह्यू'मध्ये लॉरेन्सचं नाव झळकू लागलं होतं, त्याच्याकडे लक्ष वेधलं गेलं होतं. त्याच्या पहिल्या कादंबरीचं हस्तलिखित त्यानं हायनामानकडे पाठवावं असा सल्ला ह्यूफरनं त्याला दिला,सोबत शिफारसपत्रही लिहून दिलं. २१ जानेवारी १९१० रोजी विल्यम हायनामाननं लॉरेन्सला बोलावून त्याची कादंबरी स्वीकारली असल्याचं सांगितलं. 'द व्हाईट पिकॉक'. असं कादंबरीचं नामकरण करण्यात आलं.

आणि उन्हाळ्यात लिडीयाच्या प्रकृतीची कुरबुर सुरू झाली.

## पाच

औषधोपचारांनी लिडीयाच्या प्रकृतीला गुण पडत नव्हता. तिची प्रकृती मुळातच नाजूक. आता आजारपणानं तिला अधिकच दुबळी केली. तशाही परिस्थितीत झेपेल तसं काम ती करत होती. हिवाळ्यात तिची प्रकृती अधिकच खालावली. तिला कॅन्सर असल्याचं निदान झालं. आणि वादळाच्या तडाख्यात सापडलेल्या वृक्षागत लॉरेन्सची गत झाली. क्रॉयडॉनला त्याचं मन लागेना.

'The hoar-frost crumbles in the sun,
        The crisping stream of a train
Melts in the air,while two black birds
        Sweep past the window again.

Along the vacant road a red
Telegram-bycycle approaches: I wait
In a thaw of anxiety,for the boy
to leap down at our gate.

He has passed us by : but is it
Relief that starts in my breast?
Or a deeper bruise of knowing that still
She has no rest.

*('Endless Anxiety')*

पंधरवड्यातून एका वीक-एन्डला तो घरी येत होता. आईची सेवाशुश्रूषा करत होता. तिच्या शेजारी बसून 'द व्हाइट पिकॉक'ची प्रुफं तपासत होता. आपल्या लाडक्या आईच्या यातना पाहून वेडंपिसं झालेलं मन थाऱ्यावर राहावं यासाठी आपलं लक्ष अन्यत्र गुंतवायची त्याची इच्छा होती. एखाद्या स्त्रीच्या प्रेमळ सहवासात वास्तवाच्या तीव्र चटक्यापासून क्षण-भराची का हाईना मोकळीक लाभेल,आपल्या दु:खाचा भार हलका होईल असं त्याला वाटतं. त्याची ही मानसिक अवस्था 'रिलीज' या कवितेमध्ये जाणवते. 'सन्स अँड लव्हर्स' मध्ये पॉल क्लॅराकडे वळतो. आणि ती त्याला आपल्या उराशी घट्ट कवटाळून धरते, त्याला आंदोळते,लहान मुलाचं करावं तसं त्याचं सांत्वन करते. प्रत्यक्षात लॉरेन्स चोरून ॲलीस डॅक्सकडे जात होता. या कामी हेलनकडून अपेक्षित प्रतिसाद मिळणं सुतराम शक्य नव्हतं. जेसीला तो भेटत होता. नोव्हेंबरमध्ये लिहिलेली 'ऑफुल ऑटम' ही कविता व 'सन्स अँड लव्हर्स' मधील पॉल-मिरीयम यांच्या भेटीचं चित्रण लॉरेन्स-जेसीच्या भेटीचं फलीत अधो-रेखित करतात.

जेसी कवीच्या देहसंगाच्या आग्रहाला नकार देते,पण त्याच्या केसामधून हळुवारपणे बोटं फिरवते, त्याचं मुख कुरवाळते, त्याला वाटतं, या क्षणी दोघांनी मिळून स्वर्गाच्या किल्ल्या परमेश्वराकडून हिसकावून घेता येतील! 'अपेक्षित दुर्मिळ अनुरागा'चा लाभ करून घेण्यासाठी कदाचित तिच्या प्रेमाच्या जलाशयात त्यानं स्वत:चा बाप्तिस्मा करून घेतला असता? ही कविता मनोमीलनाचा प्रयत्न सूचित करते, अपयशाची धास्ती असूनही. पण 'सन्स अँड

लव्हर्स' मधील प्रसंगात मिरीयमविषयी वाटणारं शारीरिक प्रेम आणि आईभोवती मृत्यूचा पाश क्षणाक्षणानं अधिकाधिक बळकट होत चाललेला पाहून जीवाला लागलेला घोर यामधील पॉलचा मानसिक ताणतणाव जाणवतो.

डिसेंबर उजाडता उजाडताच लिडीयाचं दुखणं विकोपाला गेलं आणि ती मृत्यूशय्येवर अखेरच्या घटका मोजत असतानाच लॉरेन्सनं लुई बरोजशी लग्न करण्याचा निर्णय घेतला.

३ डिसेंबरला लुई लॉरेन्सला ट्रेनमध्ये भेटली. दोघांनी एकमेकांची आस्थेवाईकपणानं विचारपूस केली. निरोप घेण्याचा समय जवळ येऊन ठेपला. लुईनं विचारलं,"काय करायचा विचार आहे तुझा बर्ट– ख्रिसमसनंतर?"

लॉरेन्स म्हणाला,"सांगता येणार नाही मला."

"काय करणं आवडेल तुला?"

तत्क्षणी तिची उत्कंठा त्याला जाणवली. तो म्हणाला,"सांगता नाही येत. . . लग्न करायची इच्छा आहे.

तिनं मान खाली घातली. त्यानं विचारलं,"तुला वाटतं?"

ती अतिशय अवघडून गेली,म्हणाली,"माहिती नाही."

त्याच्या तोंडून अचानक शब्द बाहेर पडले, "तुझ्याशी लग्न करण्याची माझी इच्छा आहे."

त्यानं तिच्याकडे पाहिलं. ती लाजून लाल झाली होती.

"तुला आवडेल?" त्यानं पुन्हा विचारलं.

"काय?"

"माझ्याशी लग्न."

ती झटकन त्याच्याकडे वळली. तिचा चेहरा प्रफुल्लित झाला होता. निरोप घेताना तिनं पटकन त्याच्या हातावर हात ठेवला. तिच्या स्पर्शामधून तिनं त्याला संमती कळवली.

त्याच दिवशी रॅशेल टेलर या कवयित्रीला लिहून ही सुवार्ता त्यानं कळवली. लुईच्या रूपगुणाची स्तुती केली. आपल्या निर्णयावर आपण खूष असल्याचं सांगितलं. लुईच्या वडलांनाही पत्र पाठवून त्यानं आपला मनोदय व्यक्त केला. जावई म्हणून लॉरेन्स लुईच्या आईवडलांना पसंत नव्हता. पण आपल्या मुलीच्या पसंतीला नकार देणं त्यांना उचित वाटत नव्हतं. दोन दिवसांनी जेसीलाही कळवलं : का कुणास ठाऊक,त्यानं लुईला लग्नाची मागणी घातली. तिनं होकार दिला आणि तिला दिलेला शब्द तो पाळणार आहे.

६ डिसेंबरला त्यानं लुईला पत्र लिहिलं. तिचा हात आपल्या हाती घेण्याआधी आपल्या आईचा हात आपल्या हातातून निसटत असल्याची खंत व्यक्त करून त्यानं लिहिलं. 'मी बराच विचार करतो तुझा. आपण किती सुखी होऊ याचा. दु:खाचा हा भार सुखी होण्याच्या निश्चयाला प्रवृत्त करतो. तुझा मी जेवढा जास्त विचार करू लागतो,तेवढा मी अधिक सुखावतो,अचूक निवड केली म्हणून. मी ठार आंधळा होतो. आणि मूर्ख, पण दु:खानं नजर

उघडली. तुझा विचार करणं म्हणजे जीवनाचा विचार करण्यागत आहे. माझ्याखातिर घरती आनंदमयी करणारी तू पहिली स्त्री ठरशील : 'आई,जे(सी)– बाकीच्या सगळ्या,म्हणजे आत्यंतिक दु:खी जगाची द्वारं! परंतु तू एडनच्या द्वाराइतकी कणखर आणि लोभस आहेस. ....... ..आपल्या वाडवडलांच्याबरोबर आपण वाळवंटात जन्माला आलो,आणि कानानची आपल्याला ओढ आहे. कानानसारखीच तू आहेस–तू समृद्ध आहेस आणि फलदायी आणि आनंदी,आणि माझं तुझ्यावर प्रेम आहे.'

*　　　*　　　*　　　*

'बहुधा शनिवारी रात्री जेवणाला तू येशील–तुला शक्य असल्यास. गंमतच आहे. मी म्हटलं–पण तुला ठाऊक आहे,माझ्या आईला माझा विकारवश लळा आहे, आणि तिची असूया प्रखर आहे. जे (सी) चा तिरस्कार करते आणि तिच्याबरोबरचं माझं लग्न रोखण्यासाठी ती थडग्यातूनही उठेल. महिन्यापूर्वी,सहा आठवड्यापूर्वीही असेल,मी जरा जपूनच विचारलं,"आई,तुला वाटतं का ग की लुईबरोबर लग्न केल्यानं– काही दिवसांनी– माझं भलं होईल?"

"तात्काळ ती म्हणाली,"नाही–नाही वाटत मला."– आणि नंतर अर्ध्या एक मिनिटानं म्हणाली,"ठीक आहे–जर का तुला वाटतं,तिच्याबरोबर तू सुखी होशील–मान्य आहे."

बघितलंस,मला ठाऊक आहे,तिला मान्य आहे आणि तू तिला नेहमीच आवडायचीस.

वरील पत्रावरून ध्यानी येतं की लुईबरोर लग्न करण्याचा विचार लॉरेन्सनं आपल्या आईपाशी ऑक्टोबरमध्येच व्यक्त केला होता. हा निर्णय आपण तडकाफडकी घेतला या लॉरेन्सच्या म्हणण्यात तथ्य नव्हतं. एवढंच म्हणता येईल की,या निर्णयाची वाच्यता करण्याची संधी ३ डिसेंबरच्या लुईबरोबरच्या त्याच्या भेटीत त्याला मिळाली.

खरं म्हणजे लुईबरोबर लग्न करण्याचा विचार जवळजवळ दोन वर्षांपासून त्याच्या मनात घर करून होता. ९ फेब्रुवारी १९०९च्या पत्रात लग्नाचा उघड प्रस्ताव न करता त्यानं सूचकपणे विचारलं होतं,'जे(सी),तू आणि मी,एक सुखी त्रिकोण होऊ? माझ्यामध्ये खवीसपणा आणि विकृती यांचा झणझणीतपणा आहे. मी घर सोडल्यापासून ते अधिक उग्र बनले आहेत; आपण तिघे भेटतो तेव्हा एक व्यक्ती नाराज असते. तुला जाणवलं नाही ते? मस्तकात जातं माझ्या ते समजलं की नाही तुला? माफ कर,मी असं म्हणायला नको होतं– पण–पण.'

पत्नी म्हणून लुई व सखी म्हणून जेसी हा लॉरेन्सनं अपेक्षिलेला प्रेमाचा त्रिकोण जेसीच्या विरोधामुळं जुळून आला नव्हता. परंतु लुईशी लग्न करण्याचा विचार मात्र त्याच्या मनातून गेला नव्हता हे नि:संदेह.

लिडीया आता काही दिवसांचीच सोबती होती. तिचे दफनविधी आटोपले की लग्न करायचं लॉरेन्सनं निश्चित केलं होतं.

आणि ९ डिसेंबरला लिडियाचं निधन झालं.

'सन्स अँड लव्हर्स' मध्ये पॉलनं आपल्या आईच्या दुधात मॉर्फिनचा ज्यादा डोस घालून तिचा मृत्यू नजिक आणला. तसाच प्रयत्न प्रत्यक्षात लॉरेन्सनं स्वत: केला होता का? हा प्रश्न उद्भवण्याला कारणीभूत ठरलं ऑब्रे वॉटरफील्डचं ८ जून १९१४चं पत्र. त्या पत्रात त्यानं लिहिलं होतं की लॉरेन्सनं त्याची बायको लिना हिला सांगितलं होतं की तो खरोखरीच तसा वागला होता आणि त्याच्या या उद्गारांनी ऑब्रेला धक्का बसला होता. हेच पत्र लिनानं 'कॅसल इन इटली' (१९६१)या आत्मचरित्रात समाविष्ट करून पुढं लॉरेन्सबरोबरचं आपलं संभाषण जोडलं होतं. ती लॉरेन्सला म्हणाली,"कादंबरीवर मी खूष आहे,पण आईला दुधातून पॉलनं मॉर्फिन देणं,त्याच्या व्यक्तिमत्वाशी आणि आईवरील त्याच्या प्रेमाशी सुसंगत वाटत नाही. कादंबरीत त्यामुळं बदसूर निर्माण होतो." त्यावर लॉरेन्सनं ठासून सांगितलं,"चुकतेयस तू! हे बघ,मी अगदी तस्साच वागलो होतो."

लिना पत्रकार होती. दररोज नेमानं ती डायरी लिहीत असे. तिनं नोंदवलं तसंच संभाषण झालं असेलही. परंतु,आपल्या लिखाणावर कुणी टीका केली तर ती लॉरेन्सला अजिबात खपत नसे हे त्याचं स्वभाववैशिष्ट्य लक्षात घेता; शक्यता आहे,लिनाचं विधान खोडून काढण्यासाठी उसळून वा त्राग्यानं तो तसं म्हणाला असेल.

वस्तुस्थिती काय असेल ती असो,आईच्या मृत्यूनं त्याच्यावर औदासिन्याची अवकळा पसरली,एवढं बरीक खरं. त्याच्या वडलांनाही दु:ख झालं होतं. परंतु त्यांच्याविषयी त्याच्या मनात कमालीचा तिरस्कार असल्यामुळं तो त्यांच्याबद्दल हेटाळणीच्या सुरात बोलत होता. 'घृणास्पद आहे तो,मस्तकात जातो,किड्यागत आपमतलबी आहे तो.' आपलं सांत्वन करू शकतील अशा आप्तेष्टांकडे तो वळत होता. आईच्या दफनविधीच्या आदल्या दिवशी त्यानं जेसीला घरी बोलावून घेतलं. बऱ्याच कालावधीनंतर दोघंही ईस्टवूडच्या बोळामधून बराच वेळ हिंडले. बोलता बोलता तो म्हणाला,"माझं आईवर प्रेम होतं. सदैव."

जेसी म्हणाली,"मला माहीत आहे."

तत्क्षणी तो म्हणाला, "मी काय म्हणतो आहे याचा अर्थबोध तुला झालेला नाही. प्रियकरानं प्रेयसीवर प्रेम करावं तसं मी माझ्या आईवर प्रेम केलं आहे." आणि अलिकडच्या काळातील त्याच्या 'द एन्ड','द ब्रायड' आणि 'द व्हर्जिन मदर' या कविता त्यानं तिच्या हाती दिल्या. जणू काही आपल्या विधानाची सत्यता तिला पटावी, मातृ-वियोगाच्या दु:खाची तीव्रता तिच्या ध्यानी यावी.

३ डिसेंबरला रॅशेल टेलरला पाठवलेल्या पत्रातही त्यानं लिहिलं होतं : 'आम्ही एकमेकांवर प्रेम केलं,पतीपत्नीचं प्रेम,तद्वतच मायलेकांचं प्रेम.'

लॉरेन्स आणि त्याची आई या दोघांमधल्या विकारवश प्रेमाची कल्पना जेसीला होती. या विकृत प्रेमाच्या विळख्यातून लॉरेन्स स्वत:ची मुक्तता करू न शकल्यानं त्याचे दुष्परिणाम तिनं स्वत: भोगलेले होते,भोगत होती. त्याचं बोलणं तिनं निमूट ऐकून घेतलं.

दफनविधीनंतरही दोघं भेटली. या वेळी तिनं त्याला सुचवलं की त्याच्या प्रेम-प्रकरणात भाबड्या हेलनला त्यानं गुंतवू नये. त्यावर तो ताडकन म्हणाला की 'काय करायला हवं,काय

करणं भाग आहे यांच्याशी त्याला काहीही मतलब नाही.' बोलणचं खुंटलं.

एव्हाना जेसी हेलनची जिवभावाची सखी बनली होती. हेलनचा लॉरेन्सवर जीव जडावला होता त्याहून कितीतरी पटींनं तिचा जीव जेसीत गुंतला होता. जेसीबद्दल तिला वाटणारं शारीरिक आकर्षण, त्या आकर्षणापोटी तिच्याबद्दल निर्माण झालेली अभिलाषा यांनी जेसीबरोबरचे तिचे भावबंध दृढ केले होते. लॉरेन्सबरोबरच्या हेलनच्या मैत्रीत कामवासनेचा अंश नव्हता. त्याच्याशी विवाहबद्ध व्हावं आणि त्याच्या मुलांना जन्माला घालावं वा त्याचं अंगवस्त्र व्हावं अशी इच्छा तिनं कधी बाळगलेली नव्हती. पण लॉरेन्स मात्र आपल्याकडे एक उपभोग्य देह म्हणूनच पाहात आहे याची जाणीव तिला अर्थातच होती.

लॉरेन्स शाळेत रुजू झाला. त्याची विमनस्कता पाहून हेलन कष्टी झाली. त्याच्याशी संवाद साधणं तिला जमेनासं झालं. तो असा त्रयस्थासारखा का वागतो, तिला उमगेना. तेवढ्यात जेसीचं पत्र तिच्या हाती पडलं.

'डेव्हीडची बातमी मला कळते. मी त्याला भेटलेही होते. मला वाटतं, एव्हाना तूही त्याला भेटली असशील. मला वाटतं, त्याच्याबद्दल मी चकार शब्दही बोलता कामा नये. सांप्रत मी पुरेशी खंबीर नाही. एखादी धमनी कापली गेली तर तिचं तोंड तुम्ही बांधून टाकाल, हो की नाही! यास्तव, बंध मी सोडता कामा नये, पुन्हा बांधायचं म्हटलयास मला ते कदापी शक्य होणार नाही.

'जुन्या म्हणी नव्या अर्थांचा खजिना घेऊन सामोऱ्या याव्यात हे एकूण अजबच! आईवडलांची पापं मुलांना भोगावी लागतात– आहे खरं तसं – त्याला कोण काय करणार! डेव्हीड त्याच्या आईच्या शोकांतिकेत पुरता जखडून गेला आहे; त्याची किंमत त्याला मोजायलाच हवी. आपली देणी आपल्याला फेडायलाच हवीत आणि बोलण्याचा फारसा उपयोग होणार नाही. अतिशय अंधुक असणाऱ्या बऱ्याच गोष्टी कालांतरानं विलक्षण अर्थगर्भ होतात.'

जेसीबरोबरचं लॉरेन्सचं सख्य लुईला ठाऊक होतं. पण इतर स्त्रियांशीही त्याचे लागेबांधे असल्याचा सुगावा लागताच ती बिथरली. वाग्दत्त वधू या नात्यानं त्याला जाब विचारण्याचा आपला अधिकार तिनं बजावलाही. त्यावर ॲग्नेस, ॲलीस, हेलन यांचा नामोल्लेख टाळून त्यानं सावधगिरीनं उत्तर दिलं (२०-१२-१९१०) :

'मी जे(सी)ला म्हणालो होतो, तिची इच्छा असल्यास माझ्याशी ती लग्न करू शकते अजाणता आमचं प्रकरणं मी चालू ठेवलं होतं : मी तरी काय करणार होते! पण मी तिला नकोसा आहे यास्तव परमेश्वराचे आभार. मला तिच्याशी लग्न करायचं नाही–ती माझी जिवलग मैत्रीण असली तरी. आता काही ती माझ्या (जीवनाचा) अविभाज्य घटक नाही, अजिबात नाही.

'बाकीच्या तिघीसंबंधी– एक तू आणि जे(सी) दुसरी: खरं आहे, मी खोटं सांगितलं. त्यांना फक्त मी आवडत होतो आणि त्या माझी खुषामत करत होत्या. मी मूर्ख आहे. एक

छोकरी छानपैकी दिलखुलास आहे,तिचा आता वाङ्‌निश्चिय झाला आहे,आणि आशा करतो,तिचा तुझा परिचय होईल. ती यॉर्कशायरमध्ये शाळामास्तरीण आहे. एक आहे ती काहीशी छचोर आहे आणि तिचा मला तिटकारा येतो. आणि तिनं मला गटवलं होतं,पॉटिफरच्या बायकोप्रमाणं : आणि एक आहे ती नसल्यातच जमा. भेटीत तुला मी तपशीलवार सांगेन.

'मी घनचक्कर आहे आणि वृत्ती तडकाफडकी वागण्याची आहे-पण मी नेकीनं राहीन आणि तुला सुखी करण्यासाठी धडपडेन. माझ्याविषयी मला पूर्ण खात्री आहे,जशी खात्री मला इतर गोष्टींविषयी आहे. माझं व्यक्तिमत्व तापदायक आहे. पण माझ्याविषयी शंका घेऊ नको- बिलकुल नको,माझं तुझ्यावर प्रेम आहे... मला वाटतं सर्वसामान्य माणसांप्रमाणंच मी असायला हवं होतं- मी काहीसा वेगळा आहे- आणि परमेश्वर जाणतो,मला त्याचा खेद आहे.

'नको,माझ्या प्रिये,माझी शंका घेऊ नको. माझं खरोखरीच तुझ्यावर प्रेम आहे.'

तरीही जेसीबरोबर लॉरेन्सनं पत्रव्यवहार करावा ही बाब लुईला खटकत होती. त्याबाबत तिनं आपली नाराजी व्यक्त केली. जेव्हा त्यानं तिची समजूत घातली (३०-१-१९११) 'जे(सी) लिहिते म्हणून तू चिडावंस,कमालच आहे! माझ्या काही प्रश्नांना उत्तरादाखल तिनं लिहिलं होतं,आणि ते निश्चितच शृंगारिक पत्र नव्हतं. मत्सरी बनू नकोस,समजलं? ही भावना चांगली नव्हे!'

पत्नी म्हणून लुईची केलेली निवड चांगली असल्याचं लॉरेन्स आप्तेष्टांना सांगत असला तरी तिच्या सहवासात तो सुखी नव्हता. मार्चच्या पहिल्या आठवड्यात त्यानं जेसीला लिहिलं होतं : 'का कुणास ठाऊक,जेव्हा आम्ही दोघं एकांतात असतो तेव्हा मला पळून जावंसं वाटतं.' लुई देखणी होती,प्रेमळ होती. त्याचबरोबर रूढीप्रिय होती,व्यवहारी होती. तिला एक चांगलं सजवलेलं घर हवं होतं. नीटनेटका प्रपंच थाटून सुखीसमाधानी जीवन जगण्याचं तिचं स्वप्न होतं. आणि हे स्वप्न प्रत्यक्षात साकार करण्यासाठी धन संपादन करणं,हरप्रकारे बचत करणं तिला जरुरीचं वाटत होतं. 'इंग्लिश रिव्ह्यू'मध्ये लॉरेन्सची 'ओडर ऑफ ख्रिसॅन्थेमस' ही कविता प्रसिद्ध झाली होती. तिचं मानधन म्हणून दहा पौंड हाती पडताच त्यानं स्वत:साठी बूट आणि शर्ट खरेदी केले आणि काही पैसे ॲडाला पाठवून दिले. आणि आपण केलेला पैशाचा हा विनियोग त्यानं लुईला पत्रातून कळवला. त्यावर काहीही बचत करण्याचा तो प्रयत्न करत नाही म्हणून तिनं उलट टपाली त्याला दोष दिला. तिच्या पत्रानं तो वैतागला. मामुली कमाई आणि त्यावरून तिनं आपल्याला फैलावर घ्यावं हे त्याला रुचलं नाही. हाती पैसे नसल्यामुळे लग्न लांबणीवर पडत आहे ही गोष्ट लुई नजरेआड करू शकत नव्हती. हातात नगद १००पौंड आणि वार्षिक उत्पन्न १२०पौंड असल्याशिवाय लग्न करायचं नाही असं लॉरेन्सनं तिला सांगितलं होतं. पण ती कमाई करण्यासाठी मात्र तो काही हालचाल करत नसल्याचं पाहून ती चीडीला येत होती. लॉरेन्स चिडचिडत होता. पण त्याच्या चिडचिडीला आणखीन एक कारण होतं

या काळातील लॉरेन्सच्या बऱ्याचशा प्रेमकवितांमधून लुईची कामोत्सुक वृत्ती नजरेत भरते,त्याचबरोबर आपलं शील राखण्यासाठी आपल्या कामविकारांना ती काबूत ठेवत अस-ल्याचंही कळून येतं. आणि नेमकी हीच बाब त्याला खटकत होती. ६एप्रिलच्या पत्रात त्यानं लिहिलं होतं : 'काही बाबतीत पुरुष आणि स्त्रिया अतिशय भिन्नभिन्न असतात. पुरुष पशूचं लेकरू असतं,त्याला जे काही हवं असतं ते त्याला मिळेपर्यंत तो कधीच समाधानी होत नाही–स्त्री सदैव विन्मुख,जी माझा ठाम विश्वास आहे,स्वप्न आणि आशा,त्यापायी भोगाव्या लागणाऱ्या कळा,यातच अधिक रमते,त्यांच्या पूर्तीपेक्षाही.'

या संदर्भात 'टर्न्ड डाऊन','स्नॅप ड्रॅगन','कम स्प्रिंग,कम सॉरो','किसेस इन द ट्रेन,' या लॉरेन्सच्या कविता विलक्षण बोलक्या आहेत.

एक दिवस लुई आणि लॉरेन्स प्रणयरंगी रंगलेले असताना अचानक तिचं अंग चोरणं त्याच्या ध्यानी येतं.

'I know from her hardened lips that still her heart is
Hungry for me, yet if I lay my hand in her breast
She puts me away, like a saleswoman whose mart is
Endangered by the pilferer on his quest

गब्दुल पक्षागत वा पांढऱ्याशुभ्र लोकरीच्या प्राण्यागत तिचे हात त्याच्या देहावरून फिरतात,त्याला रोमांचित करतात. पण तिचं मन

'Dreaming - God knows of what, for to me she's the same
Betrothed young lady who loves me, and takes good care
Of her maidenly virtue and of my good name.'

*('Hands of the Betrothed')*

वाग्दत्त वधूकडून त्याच्यामधल्या 'पुरुषा'ला जे हवं होतं तं मिळत नव्हतं. जेसीकडून त्याला ते सुख लाभलं नव्हतं. हेलन होती. परंतु शय्यासोबत करण्यास ती राजी नव्हती. 'आपण लग्न करायचं का?' असं पुटपुटल्यागत त्यानं विचारून पाहिलं होतं. पण तिनं ते मनावर घेतलं नव्हतं. तरीही तो प्रयत्नशील राहिला होता. १४मार्चच्या पत्रात त्यानं रोकडं विचारलं.

'. . . . तू म्हणतेस,आपण एकमेकांच्या सहवासात राहू कारण त्यायोगे तुला चैतन्य लाभतं. तुला ठाऊक आहे,आपण एकांतात असलो की तू माझा हात धरशील; तुला ठाऊक आहे,मी थोडाफार अस्वस्थ झालो की तू तुझे हात माझ्या मानेभोवती टाकशील. यामध्ये आणि याची परिणती होते त्या अंतीम कृत्यामध्ये काही फरक असल्यास मला तो सांगू शकशील का? आभार मानीन मी तुझे...'

'आपण लग्न करू या का?' अशी विचारणाही त्यानं केली आणि पुढं लिहिलं की त्याचं आयुष्य टप्प्याटप्प्यानं पुढं सरकत आहे,ती तिच्या आयुष्याकडे पाहाते असमाधानानं.

एकरंगी जाळयागत तिचं जीवन. तो जेवढा विकारवश आहे तेवढीच तीही आहे. परंतु तिची वासना धुमसते आणि तिचा जोम,जोष भस्मसात करते. तिच्या वासनेचं ज्योतीत रूपांतर करण्याची त्याची इच्छा आहे. पण त्याची इच्छा फलद्रूप होणार नाही याबाबत तो नि:शंक आहे.

या पत्राला हेलननं उत्तर दिलं नाही. पण त्याला भेटत राहिली. जुलैमधील एका शनिवारी अशीच भेट झाली असता त्याच्या हातून काहीतरी आगळीक घडली. तिनं त्याला पत्र लिहून स्पष्ट शब्दात नाराजी व्यक्त केली. १२जुलैला उत्तरादाखल पाठवलेल्या पत्रात त्यानं कळवलं, 'रविवारी रात्री,तुझा निरोप घेऊन निघाल्यानंतर,महिन्यापूर्वी जोन्सनं दिलेल्या दोन छोट्या वस्तू,ज्या मला मोहात पाडत होत्या, सेंट जेम्सच्या रेल्व-पुलावरून भिरकावून दिल्या. काही अंशी तो माझा मृत्यू होता. हे सांगून तरी काय उपयोग ! मला वीट आला आहे बोलण्याचा.

'यापुढे मी लैंगिक संबंधाविषयी कधीच विचारणार नाही,कधीच नाही,लग्नाचं गलिच्छ नाणं मला देणं शक्य झाल्याखेरीज... आपल्यामधील हा लैंगिक ताण सहन करणं मला शक्य होणारं नाही... आणि तुला वा अन्य कुणालाही त्याबद्दल कदापी विचारणार नाही. माझा तो दुबळेपणा आहे-लैंगिक ताण मी सहन करू शकत नाही ...'

घरमालकानं दिलेली दोन कन्डोम्स लॉरेन्सनं नदीच्या पात्रात फेकून दिली,त्याचबरोबर हेलनशी समागम करण्याची आस गाडून टाकली.

प्रेम-प्रकरणातील अपयश,अतृप्त कामेच्छा,भारभूत वाङनिश्चय,आईचा मृत्यू यांनी त्याला नैराश्याच्या खाईत ढकलून दिलं. त्याचा दैनंदिन दिनक्रम,त्याचा शिक्षकी पेशा,त्याचं लेखन यांपेकी एकही गोष्ट त्याला सावरू शकत नव्हती,त्याला उभारी देऊ शकत नव्हती. शाळेतल्या नोकरीचा त्याला वीट आला होता. ती सोडून देण्याचा विचार दिवसेनदिवस प्रबळ होत होता. पण हातून पुरेसं लिखाण होत नव्हतं. प्रकाशित साहित्याच्या मानधनात संसार थाटणं केवळ अशक्य होतं. आणि लौकरात लौकर विवाहबद्ध व्हावं यासाठी लुईचं टुमणं चालू होतं. लॉरेन्स कोंडीत सापडला होता.

त्यानं ॲडाला लिहिलं :'काही वेळेला माझ्या जिवाचा थरकाप उडतो,श्वास घेणंही मुष्किल होतं... जगण्याच्या वरदानाखातीर आपण अव्वाच्या सव्वा किंमत मोजतो. तूर्त विरंगुळा आहे तो माझ्या लिखाणात... निदान ते दिवस तरी ढकलून देते... आयुष्य एवढं ओंगळ आणि निर्दय आहे,मला उबग आला आहे त्याचा. ते सुखद बनावं म्हणून मी किती आसुसलेला आहे. पण ते एवढं निष्ठूर आणि जीवघेणं असलेलं पाहून ते नकासं वाटतं.'

आयुष्य म्हणजे एक निर्दय शोकांतिका असल्याची भावना त्याच्या मनात रुजली,बळावली. सुहुदांचा सहवासही नकोसा झाला. 'ही माणसं माझी सोबती नव्हेत. इथं मित्र असूनही मी एकटा आहे,एकांतवासात असल्यागत,एकाकी आयुष्य एखाद्याच्या कसं अंगवळणी पडतं.

मला इथं कुणी घनिष्ट स्नेही नाहीत,आणि मला तसा कुणी नकोही. मी माझं एकट्यानं पाहू शकतो आणि मला एकटं राहू देणं मी पसंत करतो... माझी कुणाशी बोलाचाली नाही पण काही वेळेला घास गिळणं मुष्किल होतं. दिवसामागून दिवस उलटतात, पण एखाद्याला त्याच्या स्वत:च्या विचारांपासून मोकळीक नसते. जणू काही ती गोष्ट अस्तित्वात नाही असं समजायचं– तोच एकमेव मार्ग. तुमचं दु:खी असणं आणि तुमच्या अस्तित्वानं इतरांना दु:खी करणं सामान्य जनांना रुचत नाही,ते तुमचा तिरस्कार करतात. शोकांत ही आयुष्यातली अत्यंत महत्त्वपूर्ण अशी गोष्ट आहे. एकट्यानं जगायला शिकणं हा पाठ गिरवायचा.'

पण एकांतवास हा नैराश्यावरचा तोडगा नव्हता. एकांतात मातृ-वियोगाचं दु:ख पराकोटीला पोचलं. त्या दु:खानं लॉरेन्सच्या नैराश्याची काजळी अधिकच कुट्ट केली. त्या दु:खावेगात आईच्या अनावर ओढीनं त्यानं टाहो फोडला :........

'... I am willing to come to you now, my dear,
As a pigeon lets itself off from a cathedral dome,
To be lost in the haze of the sky, I would like to come
And be lost out of sight with you, like a melting foam.

For I am tired, my dear, and if I could lift my feet,
My tenacious feet, from off the dome of the earth
To fall like a breath within the breathing wind
Where you are lost, what rest my love, what rest!'

*('Call unto Death')*

एक दिवस लॉरेन्सचा भाऊ जॉर्ज अकस्मात जेसीला रस्त्यात भेटला. तिनं लॉरेन्सची चौकशी केली तेव्हा तो म्हणाला की लॉरेन्सची अवस्था भ्रमिष्टागत झाली आहे, रात्री झोपेतून तो किंचाळत उठतो. त्याला वाटतं,कुणीतरी त्याचा जीव घ्यायला टूपन बसला आहे. जेसीनं विचारलं,"त्याच्या विवाहाचं काय?" जॉर्ज म्हणाला,"हे लग्न व्हायचं नाही. त्याची निवड चुकीची आहे असं माझं मत आहे."

लॉरेन्स ॲडा आणि लुई यांच्याबरोबर वेल्सला काही दिवस थारेपालट व्हावा म्हणून गेला. तिथंही तो अतिशय बेचैन होता. मिनीटभरही एका ठिकाणी तो बसत नव्हता. झपाटलेल्या माणसागत डगरीवरून वरखाली धावत होता. एकदा तर तो तडक उठला आणि कुणालाही न सांगता शायरब्रुकला ॲलीसच्या घरी पोचला.

अशा परिस्थितीतही 'सन्स अँड लव्हर्स' (मूळ शीर्षक :'पॉल मोरेल') ही आत्मचरित्रा–त्मक कादंबरी लॉरेन्स लिहीत होता. तिची प्रगती तो लुईला कळवत होता, आणि 'माझ्या नसानसामधलं बरचसं अतृप्त प्रेम मला आता पचवायलाच हवं. ज्वालामुखीची सारी आग नि

तप्त रस संथपणे प्राशन करणं ही बाब अत्यंत तिरस्कारणीय आहे' हे तिच्या ध्यानी आणून देत होता. ( ३-११-१९१६ ). लुईशी लग्न करून त्याला हवं असलेलं सुख तो मिळवू शकत होता. पण इथंच त्याची गोची होत होती. तिच्याशी विवाहबद्ध होण्यास त्याच्या मनाची अद्याप तयारी होत नव्हती, वाङनिश्चय मोडण्यास तो धजावत नव्हता. तिच्याशी लग्न करावं की करू नये हा प्रश्न त्याच्या मानगुटीवर समंधागत बसला होता.

आणि एक दिवस दैव त्याच्यावर प्रसन्न झालं. नोव्हेंबरच्या मध्यावर केंटमध्ये एडवर्ड गार्नेटला भेटायला जात असताना पावसात भिजल्याचं निमित्त झालं. क्रॉयडॉनल परतल्यावर न्युमोनियानं तो अंथरुणाला खिळला. या गंभीर आजारात अ‍ॅडानं त्याची शुश्रुषा केली. तिच्या मदतीला येण्याची लुईची इच्छा होती. पण अ‍ॅडानं तिला कळवलं, (२८-११-१९११) 'काळीज घट्ट कर त्याच्याखातीर आणि काळजी करू नकोस. . . त्याला थोडसं बरं वाटताच मी तुला कळवीन.' ख्रिसमसची सुटी पडताच लुई क्रॉयडॉनला गेली. एव्हाना लॉरेन्सची प्रकृती बरीच सुधारली होती. अशक्तपणा होता. त्याची फुफ्फुसं या आजारात कमकुवत झाली असली तरी त्याला क्षयाची बाधा झाली नसल्याचं डॉक्टरनं निदान केलं.

लॉरेन्स हिंडताफिरता झाला पण शिक्षकाची नोकरी करणं त्याच्या दुबळ्या प्रकृतीला झेपणारं नव्हतं. या काळात गार्नेटनं त्याच्या साहित्यिक गुणांना दाद दिली, त्याला भरपूर प्रोत्साहन दिलं. लॉरेन्सनं 'द ट्रेसपासर'चा पहिला खर्डा ह्यूफरला वाचायला दिला होता. त्या कादंबरीवरील त्याच्या प्रतिक्रियांनी लॉरेन्सला नाउमेद केलं होतं. त्याच्या मते, ही कादंबरी म्हणजे एका प्रतिभावंताची निकृष्ट साहित्यकृती आहे. त्यातील एक चतुर्थांश भागात श्रेष्ठ कलाकृतीची सामग्री आहे. तिची रचना विस्कळीत आहे. शिवाय ती अश्लील आहे. 'द व्हाईट पिकॉक' ही त्याची पहिली कादंबरी प्रकाशित करणाऱ्या विल्यम हायनामानलाही त्याची नवी कादंबरी आवडली नव्हती. पण गार्नेटनं त्याला अत्युत्साहानं सांगितलं की, ती कादंबरी प्रकाशित करण्यास तो डकवर्थला सांगेल. गार्नेटचं उदंड प्रोत्साहन लुईबरोबरचा वाङनिश्चय मोडण्याच्या संदर्भात निर्णायक ठरला असं म्हटलं तर वावगं ठरू नये. नोकरी सोडून लेखनावर लक्ष केंद्रित करण्याचा निर्णय लॉरेन्सनं घेतला. नोकरी सोडल्यानंतर लेखनावर मिळणाऱ्या तुटपुंज्या पैशात संसाराचा गाडा रेटणं केवळ अशक्य होतं. शिवाय त्याची दुबळी प्रकृती.

४-२-१९१२ रोजी लॉरेन्सनं लुईला लिहिलं : बरेच दिवसात माझं पत्र नाही म्हणून तू अचंबा करत असशील. क्रॉयडॉन आणि बोर्नमथ इथल्या डॉक्टरांनी मला सल्ला दिला की मी लग्न करू नये, शक्य असल्यास, त्यासाठी आणखीन बराच काळ लोटू द्यावा. त्यांच्या सल्ल्यावर मी विचार करत होतो. आणि मला स्वत:लाही जाणवत आहे की माझी प्रकृती एवढी नाजूक झाली आहे की ही जबाबदारी मी स्वीकारू नये. शिवाय मला आता शिकवणी करता कामा नये ही बाब लक्षात घेता मला जिवंत राहाण्यासाठी बरीच धडपड करणं आवश्यक आहे. वाङनिश्चयाची आणखीन फरफट मी करत नाही. म्हणून, माझा विचार तू सोडून द्यावास असं सांगतो. आपण एकमेकांना अनुरूप नाही असं मला वाटतं.



अनुक्रमणिका

'माझ्या आजारानं बऱ्याच प्रमाणात माझ्यात बदल घडवून आणला आहे ,मला जखडून टाकणारे बरेचसे पुराणे बंध तोडून टाकले आहेत. माझा नाइलाज आहे. असंच चालू ठेवणं चांगलं नव्हे. मी अॅडाला विचारलं,आणि तिलाही वाटतं की वाङनिश्चय मोडणंच चांगलं; कारण नाहीतर तुझ्यावर अन्याय केल्यासारखं होईल.

'एकूण बाब क्लेशकारक आहे आणि सारा दोष माझा आहे.'

१३ फेब्रुवारीला लॉरेन्स आणि लुई नॉटिंगहॅममध्ये एकमेकांना भेटले. ही त्यांची भेट अखेरची ठरली. लॉरेन्सच्या निर्णयानं तिला मनस्वी दु:ख झालं होतं. तरी या भेटीत स्वाभि-मान जपण्याचा तिनं कसोशीनं प्रयत्न केला. जणू काही क्लेशकारक असं काही घडलंच नाही असा आव आणून ती त्याच्याबरोबर हिंडली. कलाप्रदर्शनाला भेट दिली. त्याची थोडी-फार खिल्लीही उडवली. तिनं दु:खप्रदर्शन केलं असतं तर लॉरेन्स अडचणीत सापडला असता. एखाद दुसऱ्या वेळी कोंडलेल्या दु:खानं हलकेसे हुंदके दिलेच. पण वेळीच तिनं स्वत:ला सावरलं.

त्यानंतर तीन दिवसांनी अॅडानंच तिला पत्र लिहिलं : 'लुई,बर्टहून कुणीतरी अधिक चांगला पुरुष लाभावा अशी तुझी योग्यता आहे,त्याच्यासारख्या पुरूषाबरोबर मी लग्न करणार नाही,नाही,पृथ्वीतलावर तो एकमेव असला तरी.'

अॅडाच्या सांत्वनपर शब्दांनी लुईच्या जिव्हारीच्या वेदना हलक्या होणाऱ्या नव्हत्या. तिनं अश्रू गिळले. जेसीप्रमाणे या प्रकरणाचा तिनं बाऊ केला नाही. पण तिची उमेद खचली ती कायमची.

१९११ मध्ये जेसीनं एक कथा लिहिली. ती आणि लॉरेन्स विशीच्या उंबरठ्यावर असताना त्या दोघांमध्ये जे भावबंध निर्माण झाले होते त्यावर तिची कथा आधारलेली होती. ही कथा तिनं लॉरेन्सला दिली. तिची कथा छापण्यालायक नसल्याचं त्यानं तिला ऐकवलं. पण त्या कथेनं त्याच्या मनात मूळ धरलं. हळूहळू 'सन्स अँड लव्हर्स' आकाराला येऊ लागली. आपल्या या लिखाणाबद्दल त्यानं जेसीपाशी वाच्यता केली नाही. तिला कळलं ते हेलनकडून आणि त्या कादंबरीचा काही भाग तिनं पाहिला तो ऑक्टोबरमध्ये. हा खर्डा मात्र लॉरेन्सनं स्वत:हून तिच्याकडे पाठवून दिला होता. कादंबरी दोन तृतीयांश लिहून झाली होती. त्यापुढचं कथानक काही केल्या पुढं सरकत नव्हतं. जेसीचं मत जाणून घेण्यास तो उत्सुक होता.

जेसीनं हस्तलिखित वाचलं. लिखाण तिला निराशाजनक वाटलं. आईच्या जीवनाचं चित्रण ज्या पद्धतीनं केलं होतं त्यात नाविन्य नव्हतं. मिरीयम जेसीवरच बेतलेली होती. पण तिला एका बुर्झ्वा कुटुंबातील अनाथ पोर म्हणून दाखवण्यात आलं होतं. हा बदल लॉरेन्सनं का करावा हेही तिला आकळेना. अर्नेस्टचा त्रोटक उल्लेखही तिला खटकला. तिच्या विशेष लक्षात राहिली ती लिडीया-लॉरेन्स,लिडीया-जेसी यांच्या संबंधाच्या संदर्भातील पुढील विधानं :

'तिच्याकडून (मिरीयम) त्याची (पॉल) अपेक्षा तरी काय होती? त्याच्यावरील आईच्या वर्चस्वाला तिनं शह द्यावा अशी तिच्याकडून त्याची अपेक्षा होती...'

'मिरीयम पॉलला आईच्या ॲप्रनच्या दोरीला धरून चालणारा तरुण समजत होती.'

'एकदा का मिरीयमनं पॉलची लैंगिक सहानुभूती संपादन केली तर आईला त्याला कायमचं गमवावं लागलं असतं. मिसेस मोरेलला वाटत होतं की आपल्याला तो खरोखरीच दुरावला तर आपल्या आयुष्याला अर्थ उरणार नाही. विषयवासनेखातीर तिनं त्याला दुसऱ्या स्त्रीपाशी जाऊ दिलं असतं. त्यानं प्रेम करावं, लग्न करावं हेसुद्धा तिला चाललं असतं. फक्त ती स्त्री तिच्याहून दुबळी असावी. कारण त्याला गमावून बसण्याची पाळी तिच्यावर आली नसती...'

हस्तलिखित वाचून जेसीनं सुचवलं की अर्नेस्टच्या मृत्यूचा कथानकात अंतर्भाव करावा, प्रत्यक्ष घडलेल्या घटनांच्या आधारे, प्रामाणिकपणे त्यानं कथा पुन्हा लिहून काढावी. आयुष्यातील कच्च्या मालाला नीटस आणि अर्थपूर्ण आकार देण्याची त्याची पात्रता ती जाणून होती. शिवाय या लेखनप्रक्रियेमुळं आईबरोबरच्या त्याच्या तिढ्या ऑब्सेशनमधून तो कायमचा मुक्त होईल अशी आशा तिला वाटत होती.

जेसीच्या सूचनांचा स्वीकार करून त्यानं जेसीला लिहिलं की तिच्याशी त्याची ओळख झाली त्या दिवसापासूनच्या ठळक आठवणी तिनं लिहून पाठवाव्यात. तिनं होकार दिला. ही कादंबरी म्हणजे तिच्या आयुष्याची अत्यंत महत्त्वपूर्ण अशी कथा होती. ती आठवून आठवून आठवणी लिहू लागली. लॉरेन्सच्या गंभीर आजाराची वार्ता तिच्या कानावर आली तरीही त्याची चौकशी करायला न जाता ती आठवणी लिहीत राहिली. त्या लिहून संपल्या तोवर ख्रिसमसची सुटी सुरू झाली होती. लॉरेन्स ईस्टवूडला विश्रांती घेत होता. जेसी तिथं गेली आणि आठवणींची टिपणं त्याच्या हवाली केली. या भेटीत, का कुणास ठाऊक, लॉरेन्सला जाणवलं की आपल्याबरोबरचे संबंध पुन्हा जुळून येतील अशी आशा जेसी बाळगून असावी. तो ताड्कन म्हणाला, "माझी आई मेली आहे, आता माझ्यावर तू ताबा मिळवू शकशील असं समजू नकोस." त्याच्या घणाघाती शब्दांनी ती तिरमिरली, हिरमुसली होऊन माघारी गेली.

जेसीची टिपणं वाचून लॉरेन्सला हुरूप आला. त्यानं कादंबरीचा नवा खर्डा लिहायला घेतला. लिहिलेला मजकूर जेसीला दाखवायला तो स्वत: जाऊ लागला. इस्त्री गरम झाली की नाही हे पाहाण्यासाठी मिसेस मोरेलचं इस्त्रीवर थुंकणं यासारखे प्रत्यक्षातील अगदी मामुली प्रसंगही लॉरेन्सनं विलक्षण प्रत्ययकारी केले होते. प्रांरभीची प्रकरणं वाचून जेसी सुखावली, पण मिरीयमशी परिचय झाल्यानंतरचा कथाभाग वाचून ती दुखावली गेली. मिरीयमची व्यक्तिरेखा रेखाटताना त्यानं आपल्यावर जो अन्याय केला आहे, आपल्या दोघांच्या स्नेहात त्यानं 'सेक्स'चं जे हीण मिसळलेलं आहे हे पाहून ती व्यथित झाली. कादंबरी म्हणजे प्रत्यक्षाचं यथातथ्य चित्रण नव्हे याचं भान असूनही आपलं चित्रण त्यानं एवढं विपर्यस्त करावं ही गोष्ट तिला फार लागली. आपली प्रेमकहाणी लिहिताना जेसी आणि

लिडीया यांच्यामधल्या संघर्षाकडे त्यानं पुरेसं लक्ष दिलं नव्हतं. जेसीवर शारीरिक प्रेम करणं त्याला जमत नव्हतं यात दोष त्याचा नसून तिचा आहे हे सिद्ध करण्यावरच त्यानं बव्हंशी भर दिलेला होता. जेसीची नाराजी लॉरेन्सच्या लक्षात आली. हस्तलिखित तो पोस्टानं पाठवू लागला. त्यावरील आपल्या प्रतिक्रिया ती टिपून ठेवू लागली. ३१मार्च रोजी जेसीची थोरली बहीण मे हिच्या मूरग्रीन येथील घरी लॉरेन्स जेसीला भेटला. रविवारचा दिवस होता. दुपारच्या जेवणाला येतो असं सांगून तो उगवला चहाच्या वेळेला. जेसीनं हस्तलिखित त्याच्या हाती दिलं. त्यानं विचारलं की तिला काही सांगायचं आहे का? ती म्हणाली की आपल्या प्रतिक्रिया हस्तलिखितासोबत तिनं ठेवलेल्या आहेत.

त्यानंतर जेसी-लॉरेन्सची भेट झाली एप्रिल अखेरला रेल्वे स्टेशनवर. त्याच्याबरोबर ॲडा आणि तिचा नियोजित पती एडी क्लार्क होता. तो बेचैन दिसला. तिच्याशी बोलायला नेमके शब्द त्याला सापडत नव्हते असं त्याचं बोलणं होतं. काही दिवसात जर्मनीला जाण्याचा आपला विचार असल्याचं तो म्हणाला. त्याची बेचैनी जेसीनं अचूक हेरली पण त्यामागील कारणाचा थांगपत्ता लागणं तिला अर्थातच शक्य नव्हतं. लॉरेन्स नुकताच फ्रीडा वीकलीला भेटला होता.

( क्रमशः )

---

**अविश्वसनीय सत्ये**

अनेक लेखक टोपणनावाने लिहितात. बेंजामिन फ्रँकलिन या लेखकाने आपल्या लेखन कारकीर्दीत आठ टोपणनावांनी लेखन केले. अँथनी ॲफल्युअंट, फादर अब्राहाम, रिचर्ड सॉंडर्स, श्को प्रोट्यूस व बिझीबॉडी, श्रीमती सायलेन्स डॉगूड, फिलोमॅथ आणि चांगली विवेकबुद्धी - ( A good Conscience )

त्याचप्रमाणे मायकेल अँजेलो टिटमार्श, चार्लस मलोपुश, लॅन्सलॉट वॅगस्टाफ, आर्थर पेनडेनिस, जॉर्ज फिट्झबूड्ल, पिटर पर्स्यूस, जीम्स द ला प्लूशों, आयकी सॉलोमन्स, डोरोथी ज्यूलिया, रॅम्सबॉटम ही सर्व नावे विल्यम मेकपीस थॅकरे (कादंबरीकार) यांची होती.





# नोंदवही

## प्रकाशक आणि लेखक

'प्रकाशक रा. ज. देशमुख' या ग्रंथात जया दडकर यांनी 'रा. ज. देशमुख – चरित्रपट' हा विभाग लिहला आहे. हा भाग फारच चांगला उतरला आहे. या शिवाय 'प्रकाशक – एक न उलगडणारे कोडे' या नावाचा प्रकाशक रा. ज. देशमुख यांचा लेखही या ग्रंथात आहे. रा. ज. देशमुख – चरित्रपट या भागात, १९६३ असा एक उपविभाग आहे. त्यात 'मराठी ग्रंथप्रकाशन' संस्थेने आयोजित केलेल्या एका परिसंवादाचा वृत्तांत आहे. परिसंवादाचा विषय होता, 'लेखकांच्या प्रकाशकाकडून अपेक्षा.' या परिसंवादात प्रकाशक रा. ज. देशमुख यांनीही भाषण केले होते. परिसंवादाचा वृत्तांत देताना जया दडकर लिहितात :

'देशमुख बोलले आणि लेखक-प्रकाशकवाद आणखीनच चिघळला.... देशमुख आपल्या भाषणात म्हणाले, "मला एवढेच वाईट वाटते की आम्ही हा धंदा करतो, मी हा धंदा करतो. त्यामुळे तुमची पुस्तके निघतात. तुम्ही एका माणसाजवळ का नांदत नाही? तुम्ही नांदायला तयार असाल, तो नांदवून घेत नसेल, तर तो का नांदवून घेत नाही त्याचा क्षणभर लोकांनी विचार करावा. मला वाईट वाटते. माझ्याकडे लेखक आहेत, वर्षानुवर्षाचे माझे संबंध आहेत. जे मला नको वाटत असतील, ज्यांना मला नांदविता येत नसेल, त्यांना मी नको म्हणून सांगितले असेल. पण मला असे दिसते की मी तुम्हाला नको म्हणून सांगितलेले नाही. माझा असा एक चार्ज आहे. काही प्रकाशक त्यांचे चांगले साहित्य काढून घेतात. त्यांना भिकार वाटते, ते हे (लेखक) इतरत्र वाटायला निघतात. खरे म्हणजे प्रामाणिकपणे त्यांनी हे वाटायला नको आहे, इतरत्र नेऊन. त्यांना वाईट वाटायला पाहिजे ... आपण प्रकाशकाला बनवतो आहोत."

हा मजकूर वाचत असताना स्टॅनली अनविन या प्रकाशकाने लिहिलेल्या आत्मचरित्राची आठवण झाली. त्यांचा अनुभव जरा गोड शब्दात नमूद केला आहे, पण तो प्रकाशक रा. ज. देशमुख यांच्यापेक्षा फारसा वेगळा नाही. टी फिशर अनविन (१८४८–१९३६) हे इंग्लंडमधील एक नामवंत प्रकाशक. टी. एफ. यू. या त्यांच्या आद्याक्षरांनी ते प्रकाशनक्षेत्रात ओळखले जात. १८८२ मध्ये 'मार्शल जेप अँन्ड कंपनी' ही छोटी प्रकाशनसंस्था त्यांनी खरेदी केली. स्टॅनली अनविन हे टी. एफ. यू चे चिरंजीव. १९०४ पासून स्टॅनली आपल्या वडिलांच्या धंद्यात त्यांना साहाय्य करीत. पुढे जॉर्ज अॅलन अँन्ड अनविन लिमिटेड (स्थापना १९१४) ही स्वत:ची प्रकाशनसंस्था त्यांनी नावारूपाला आणली. प्रकाशनक्षेत्रात केलेल्या कामगिरीबद्दल त्यांना 'सर' ही किताबत मिळाली. 'द ट्रुथ अबाउट अ पब्लिशर' (१९६०) हे त्यांचं आत्मवृत्त. त्यांना प्रकाशनव्यवसायात आलेले अनुभव त्यांनी आत्मवृत्तात शब्दबद्ध केले आहेत. त्यातील दोन लक्षणीय अनुभव येथे देत आहोत....

टी. फ. यू यांची अशी धारणा होती की साहित्यकृतीचा दर्जा चांगला असेल तर वाचक ती उचलून धरतीलच. भले तिचा लेखक प्रसिद्ध असो वा नसो. त्यांनी प्रकाशनव्यवसाय चालू केल्यानंतर पहिल्या पाच वर्षात जोसेफ कॉनरॅड, जॉर्ज मूर, जॉन गॉल्सवर्दी, एच. जी. वेल्स, डब्लू. बी. येटस आदी बऱ्याच लेखकांची प्रथम प्रकाशने मोठ्या उमेदीने काढली. चांगल्या साहित्यकृतींचे समाधान त्यांना लाभले. पण आर्थिक लाभ मात्र जेमतेमच झाला. तरीही लेखकाच्या नवोदितपणाचा फायदा उठविणारा ताठर प्रकाशक म्हणून ते ओळखले जाऊ लागले. पुस्तकांमध्ये गुंतवलेले पैसे मोकळे होईपर्यंत ते मानधन देत नाहीत म्हणून काही लेखक तक्रारीचा सूर काढू लागले. त्यातील एक सॉमरसेट मॉम. 'द समिंग अप' मध्ये तो म्हणतो ....

'मी दोन कथा लिहिल्या. मला वाटलं त्यांचा एकत्रित असा एक संग्रह निघू शकेल. मी त्या फिशर अनविन यांच्याकडे पाठवून दिल्या. काही दिवसांनी त्यांनी त्या परत केल्या. सोबत पत्र लिहिलं आणि विचारणा केली की माझ्यापाशी कादंबरी असल्यास मी ती त्यांच्याकडे पाठवावी. हे प्रोत्साहन दणदणीत होतं. मी तत्क्षणी बैठक मारली आणि एक कादंबरी लिहून काढली.

या कादंबरीचं नाव 'लिझा ऑफ लँबेथ.' अनविन यांनी ती तात्काळ स्वीकारली. त्या काळी प्रस्थापित असणाऱ्या प्रकाशकांनी ती प्रकाशित करण्याचं धारिष्ट्य दाखवलं असतं की नाही शंकाच आहे! पण मॉमची प्रतिक्रिया काय ?

'फिशर अनविन त्यांच्या लेखकांशी ताठरपणे वागत. माझ्या नवोदितपणाचा, माझ्या अननुभवाचा आणि 'माझं पुस्तक स्वीकारलं गेलंय' या माझ्या हर्षाचा त्यांनी फायदा उठविला. त्यांनी माझ्याशी करार केला; अमुक प्रती विकत गेल्याशिवाय मला मानधन मिळणार नव्हतं. पण आपला माल खपवायचा कसा हे ते जाणून होते. त्यांनी माझी कादंबरी बऱ्याचश्या बड्या आसामींकडे पाठवून दिली. कादंबरीवर बरीच परीक्षणं आली. उलट-सुलट प्रतिक्रिया नोंदविल्या गेल्या. बॅसिल विल्बरफोर्स (पुढे वेस्ट मिन्स्टरचे आर्चबिशप झाले) यांनी ॲबेमध्ये ती प्रवचनासाठी निवडली. सेंट थॉमस हॉस्पिटलचे सिनियर ऑब्स्टेट्रिक फिजिशियन या कादंबरीवर निहायत खूष झाले. आपल्या हाताखाली त्यानी एक जागा मला देऊ केली. कादंबरी प्रकाशित झाल्यानंतर लगेचच मी माझी अखेरची परीक्षा उत्तीर्ण झालो होतो ... कादंबरी प्रकाशित झाल्यानंतर महिन्याभरात दुसरी आवृत्ती निघाली आणि लेखक म्हणून मी सहज जगू शकेन याविषयी मी नि:संदेह झालो. वर्ष उलटलं. SEVILLE सेव्हीलहून परतलो तेव्हा मला आश्चर्याचा धक्का बसला. मानधन म्हणून फिशर अनविन यांच्याकडून मला चेक आला होता. चेक वीस पौंडाचा होता.

मानधन देण्यात आलं त्या सुमारास मॉमला इतर फायदे - महत्त्वाचे असे निश्चित झाले होते. त्यांच्या कादंबरीची १५०० ची आवृत्ती काढण्यात आली होती. ती खपविण्यासाठी खर्च केला गेला होता. या व्यवहारामधून फिशर अनविन यांना फक्त वीस पौंडाचा नफा झाला होता. हा वस्तुस्थिती लक्षात घेता अनविन यांची भूमिका ताठर असं म्हणणं कितपत समर्थनीय ठरेल?

औदार्य दाखविण्याला वाव होताच कुठं? करारामध्ये तरतूद होती, दोन हजार आवृत्तीनंतर साडेबारा टक्के, तीन हजारानंतर पंधरा टक्के, सहा हजारानंतर वीस टक्के. याचा अर्थ पुढील यशामध्ये लेखकाला पूर्ण फायदे मिळणार होते. गंमतीची गोष्ट अशी आहे की या कादंबरीच्या प्रकाशनाने व तिला मिळालेल्या यशामुळे – यात अनविन यांचा वाटा फारच मोठा होता हे खुद्द मॉमनीच कबूल केलेले आहे – मॉम यांनी लेखक होण्याचा आपला निर्णय पक्का केला. हे त्यांनीच म्हटले आहे. तरी त्यांची तक्रार होती.

**मॉम पुढे लिहितो ...**

झोपडपट्टीवर मी आणखी एक विस्तृत पुस्तक लिहावे म्हणून फिशर अनविन यांनी माझा पाठपुरावा केला. त्यांनी मला सांगितलं की लोकांची माझ्याकडून तशीच अपेक्षा आहे. आणि त्यांनी असं भविष्य वर्तविले की आता नाव मिळालेलंच आहे, त्यामुळं या नव्या कादंबरीला 'लिझा ऑफ लॅंम्बेथ'हून अधिक यश लाभेल. पण माझ्या डोक्यात तसा विचार नव्हता. मी महत्त्वाकांक्षी होतो. मला वाटत होतं, का ते सांगता येणार नाही, की You must not pursue a sucess but fly from it – एकदा झोपडपट्टीवर लिहिल्यानंतर त्याच विषयावर लिहिण्यात मला अजिबात स्वारस्य नव्हतं. आणि मी अगदी वेगळ्या तऱ्हेची एक कादंबरी लिहून हातावेगळी केली. फिशर अनविन यांच्या हाती ती पडताच, त्यांना अचंबा वाटत असेल... माझ्या सुदैवाने मला त्यासाठी हवे असलेले शंभर पौंड देण्यास फिशर अनविन यांनी नकार दिला. मात्र अन्य कुठलाही प्रकाशक कुठलाही सौदा करण्यास राजी नव्हता – हेही खरेच.'

प्रकाशनव्यवसायाच्या समस्यांच्या अभ्यासात या साऱ्याच गोष्टींना महत्त्व आहे. प्रकाशक रा. ज. देशमुखांनी 'लेखक एकाच प्रकाशकाकडे का नांदत नाही' हा प्रश्न उपस्थित केला. मॉम यांचे उदाहरण हे त्यापैकीच.

प्रकाशक नवा लेखक शोधून काढतो. त्याला सतत प्रोत्साहन देऊन, त्याच्या साहित्यिक गुणांची निगराणी करतो. त्याला साहित्यजगतात प्रवेश मिळवून देतो. पण याचं स्मरण लेखक ठेवीलच असं नाही. त्याला नाव मिळाले की तो अधिक मानधन देऊ इच्छिणाऱ्या प्रकाशकाकडे वळतो. किंवा तसं अमिष दाखवून एखादा प्रकाशक त्याला आपल्याकडे वळवितो. म्हणजेच एकानं मशागत करून लावलेल्या झाडाची फळं दुसरा इसम अलगद आपल्या झोळीत टाकतो. लेखकालाही तो आधीच्या प्रकाशकाहून उजवा वाटतो.

या संदर्भात स्टॅनली अनविन याने स्टीफन झ्वाईग या लेखकाचं उदाहरण दिलं आहे. निबंध, नाटक वगैरे मिळून झ्वाईग यांची सात पुस्तकं अनविन यांनी प्रसिद्ध केली होती. या साऱ्यावर त्यांनी पैसे घालविले होते. त्यांनी ही जोखीम पत्करली होती, अगदी जाणीवपूर्वक. कारण त्यांची खात्री होती की एक दिवस सहज विकलं जाईल असं पुस्तक झ्वाईग यांच्या हातून लिहून होईल. तस पुस्तक त्यांच्या हातून लिहिलं गेलं पण ते अनविन यांच्या हातातून गेलं. झ्वाईग यांना पैशाची अतिशय निकड होती आणि अनविन यांना न विचारताच त्यांच्या

मूळ जर्मन भाषेतील पुस्तकाच्या इंग्रजी अनुवादाचे हक्क त्यांनी अमेरिकन प्रकाशकाला विकून टाकले. वाचकांनी हे पुस्तक उचलून धरलं. आणि ब्रिटिश हक्क मिळवणारा प्रकाशक लायक प्रकाशक म्हणून मान्यता पावला. वस्तुत: **त्या प्रकाशकानं** इव्हाईग या लेखकाला नाव मिळवून देण्याच्या कामी कुठल्याही प्रकारचे परिश्रम केलेले नव्हते, तर अनविन यांनी श्रम घेऊन निर्माण केलेल्या 'गुडविल'चा पुरेपूर लाभ त्यांनी उठविला होता.

यानंतर स्टॅनली लिहितात –

"अलीकडे एका सुप्रसिद्ध प्रकाशनसंस्थेच्या इतिहास प्रसिद्ध झाला आहे. त्या पुस्तकाच्या लेखकानं या प्रकाशकाच्या यादीत नामवंत कवी असल्याचा साभिमान उल्लेख केलेला आहे. कुणी चौकशी केली आहे का, त्या प्रकाशकानं त्यातल्या कितीशा कवींना प्रथमत:च उजेडात आणलं ? आणि कवी म्हणून नावारूपास आल्यानंतर त्यांनी कितीसे कवी मिळवलेत ? या प्रश्नाचं उत्तर धक्कादायक ठरेल.

या समस्येचे गांभीर्य फुगवून सांगण्याची माझ्या समव्यावसायिकांवर – प्रसिद्ध वा अप्रसिद्ध– चिखलफेक करण्याची माझी इच्छा नाही. मी एवढंच निर्दशनास आणून देऊ इच्छितो की लेखकाला प्रकाशकानं किती पैसे देणे व्यवहार्य ठरेल, हे अंतिमत: ठरवितो तो वाचकवर्ग, प्रकाशक नव्हे. एखादी नवी छोटीशी संस्था नवोदितांचं साहित्य, प्रकाशात आणते, तेव्हा ती मोठी जोखीमच पत्करत असते. आणि जोवर विक्री तिला वाव देऊ शकत नाही, तोवर ती औदार्य दाखवू शकत नाही. अशा प्रकाशनसंस्थांना प्रोत्साहन देणं जरूरीचं असतं. त्यांच्या नावानं बोट मोडणं नव्हे. महत्त्वाचं आहे, ते या व्यवहारातून प्रकाशक–लेखक यांना काय फायदा होतो? एखाद्या नव्या लेखकाला साहित्यक्षेत्रात शिरकाव करून देणाऱ्या प्रकाशकानं पैसे गमावले तर लेखकाला पैशाचा लाभ झाला नाही, या सबबीवर केवळ तो क्षुद्र ठरत नाही."

लेखक आणि प्रकाशक यासंबंधी, स्टॅनली अनविन यांनी लॅन्सलॉट (LANCELOT) हॉगबेन आणि त्यांचे 'मॅथमॅटिक्स फार दि मिलिअन' हे पुस्तक, या संदर्भात सांगितलेली आठवण फार उद्बोधक आहे.

स्टॅनली अनविन यांच्या मालकीची आणखी एक प्रकाशनसंस्था होती. तिचं नाव 'विल्यम ॲन्ड नॉरगेट'. ती कंपनी त्यांनी १९३६ साली विकली तेव्हा करारामध्ये हॉगबेनच्या पुस्तकांचा स्टॉक आणि त्यांच्या आजवरच्या व भविष्यकाळातील पुस्तकांचे हक्क स्वत:कडे राखून ठेवले. हॉगबेन यांच्या आजवरच्या पुस्तकावर, काहीही आर्थिक लाभ होत नसला तरी त्यांनी केलेले काम विद्वत्तापूर्ण होतं, हे लक्षात घेऊनच त्यांच्या पुस्तकांच्या गुदामातील प्रतींची मालकी स्वत:कडे ठेऊन होईल तो तोटा सोसण्याची जोखीम अनविन यांनी पत्करली होती; ती त्यांच्या भविष्यकाळातील पुस्तकप्रकाशनाचे हक्क आपल्याला मिळतील या हमीवर. ( ते ज्यांच्या सल्ल्याची कदर करीत त्यांच्या मते हॉगबेन हा प्रतिभावंत) लेखक व प्रज्ञावान संशोधक आहे, आणि एक दिवस तो निश्चितच नावारूपाला येणार आहे. ही त्यांची भविष्यवाणी थोड्याच

दिवसात खरी ठरली. एक दिवस हॉगबेन यांनी जेव्हा अनविन यांच्याकडे दोन फूट उंचीचे हस्तलिखित आणले, तेव्हा ते साहजिकच मोठ्या उत्सुकतेने, अपेक्षेने स्वीकारण्यात आले. अनविन यांचा एक सहकारी, सी. ए. फुर्थ (FURTH) यानं ते चाळलं आणि ठामपणे जाहीर केलं, हॉगबेनचं काम उत्कृष्ट आहे, 'आउटस्टॅंडिंग' आहे. असंच मत इतरांचेही हस्तलिखित चाळल्यानंतर झालं. परंतु लेखकानं जेव्हा सांगितलं की अनविन यांनी ते पुस्तक प्रकाशित करावं अशी त्याची इच्छा नाही, तेव्हा त्यांना धक्काच बसला. कराराप्रमाणे त्या पुस्तकाचे हक्क अनविन यांच्याकडेच होते. हॉगबेन यांच्या मित्रांनी म्हणे त्याला सल्ला दिला होता की – नव्हे आग्रह धरला होता की – अशा पॉप्युलर पुस्तकासाठी अनविन हे फारच चुकीचे प्रकाशक होते. त्यांनी 'क्ष' प्रकाशकाकडे जावं हे उचित. पेचप्रसंग निर्माण झाला. अनविनांच्या एव्हाना लक्षात आलं होतं की एका प्रतिभावंताशी आपण बोलणी करत आहोत. तो लहरी असेलही. आपण जर का करारावरील कलमावर बोट ठेऊन निर्णय घेतला, तर एका सुखद आणि कायम स्वरूपाच्या ऋणानुबंधास मुकावं लागेल. तथापि अनविन यांना सामान्य प्रकाशकाच्या मनोवृत्तीबद्दल चांगली अटकळ होती. म्हणूनच त्यांनी त्या ज्ञानाच्या आधाराने संधी घेण्याचं ठरवलं. त्यांनी हॉगबेनना विचारलं, "जर का त्या 'क्ष' प्रकाशकानं त्या पुस्तकप्रकाशनाला नकार दिला, तर आम्हाला ते निश्चित मिळू शकेल ?" त्यावर लेखकानं तसं आश्वासन दिलं. अनविनांची खात्री होती, हस्तलिखिताच्या बाडाची उंची व आकार बीजगणितातली चिन्हे, खुणा, 'सिंबाल्स' आकृत्या पाहूनच तो 'क्ष' प्रकाशक हबकून जाईल, आणि त्यांचा कयास अचूक ठरला. हस्तलिखित अनविन यांच्या प्रकाशनसंस्थेकडे माघारी आले. सर्वांना आनंद झाला. परंतु हा आनंद क्षणिक ठरला. लेखकाचे मित्र 'क्ष' प्रकाशकाला जाऊन भेटले आणि 'क्ष' प्रकाशकानं ते हस्तलिखित पुन्हा मागून घेतलं. त्यांची ही मागणी मान्य करावी असा लेखक हॉगबेन यांचाच आग्रह. अनविन सुरुवातीला जिथं होते, तिथंच पुन्हा एकवार येऊन थडकले. चटकन निर्णय घेणं आवश्यक होतं. ते हॉगबेनना म्हणाले "हे हस्तलिखित परत जायचंच असेल तर तो 'क्ष' प्रकाशक आणि आम्ही दोघांनी मिळून ते प्रकाशित करावं, या अटीस हॉगबेन आपण मान्यता द्याल का?" हॉगबेननी होकार दिला. तो प्रकाशक अट स्वीकारणार नाही या भरवशावर अनविन राहिले. त्यांचा आडाखा चुकला नाही. हस्तलिखित परत आलं. त्या सोबत त्या 'क्ष' प्रकाशकाची चिठ्ठी. त्यानं लिहिलं होतं की, या पुस्तकाची फार मोठी आवृत्ती काढावी लागेल आणि विक्री जोरदार होईल अशा तऱ्हेने विक्रीची योजना आखण्यात यायला हवी. परंतु या पुस्तकाची खरेदी करणारे इतक्या प्रचंड संख्येने प्रत्यक्षात आहेत का याबाबत मात्र तो 'क्ष' प्रकाशक साशंक होता.

सरतेशेवटी, अनविन 'मॅथमॅटिक्स फॉर दि मिलिअन्स' या पुस्तकाचे प्रकाशक झाले. या आगळ्यावेगळ्या पुस्तकाकडे, ग्राहकवर्गाचं लक्ष वेधण्यासाठी त्यांनी वर्तमानपत्रातून मोठ-मोठ्या जाहिराती देण्याचा नित्याचा मार्ग अवलंबिला नाही. हे पुस्तक एक प्रज्ञावान संशोधक

आणि प्रतिभावान लेखकाचे आहे, याबद्दल त्यांची खात्री असल्याकारणाने ते पुस्तक आम जनतेपर्यंत पोचावे यासाठी त्यांनी एक रचना केली. प्रथम अनविन स्वत: माध्यमिक शाळेतल्या शिक्षकांना भेटले. या पुस्तकाविषयी त्यांच्याशी चर्चा केली. एच. जी. वेल्स त्या काळातील एक मान्यवर लेखक. तो विज्ञानाशी संलग्न असलेल्या विषयावर लिखाण करी व तो तसा त्याकाळात तरी चांगला लोकप्रिय होता व विज्ञान व विज्ञानशाखेशी संलग्न असणाऱ्या विषयासंबधी त्यांचे लिखाण हा अगदी अखेरचा शब्द समजला जाई. 'मॅथॅमेटिक्स फॉर दि मिलिअन्स' या पुस्तकाची प्रकाशनपूर्व प्रत एच. जी. वेल्स यांच्याकडे अभिप्रायासाठी रवाना केली होती. त्यांचे पत्र आहे. त्या पुस्तकाबद्दल त्यांचा अभिप्राय असा होता –

'मॅथेमॅटिक्स फॅार दि मिलिअन्स' मला पाठविल्याबद्दल तुमचे आभार मानतो. मी ते काळजीपूर्वक वाचलं आहे. आणि तेही सतत वाढत्या आस्थेनं आणि आदरानं. त्याचं काहीसं चक्रावून टाकणारं वेष्टन आणि मांडणीतलं अभूतपूर्व नाविन्य लक्षात घेता, उतावीळपणे मत नोंदविण्याजोगे ते पुस्तक नाहीये.

त्यावर विचार करण्यास मी बराच वेळ घेतलाय, आणि विचाराअंती माझं असं मत आहे की ते पुस्तक महान आहे. प्रथम दर्जाचं ठरावं एवढे महत्त्वपूर्ण आहे; आणि जे कोणी या विश्वातील गोष्टी जाणून घेण्यास धडपडत असतात, त्या १५ पासून ९० वर्षांच्या प्रत्येक बुद्धिमंतानं ते पुस्तक वाचावयास हवं......"

याशिवाय गणित या विषयात गोडी असणाऱ्यांशीही संपर्क साधण्यात आले. सर बर्ट्रांड रसेल, सर पर्सी नून्न, ज्युलियन हक्स्ले, जॉन हिल्टन, आणि ए. जे. रोवसे (Rowse) या अशा निरनिराळ्या क्षेत्रातील नामवंतांकडून अभिप्राय मिळविण्यात आले. सर बर्ट्रांड रसेल यांचा गणित या विषयाचा अभ्यास खास करून होता. सर ज्युलियन हक्स्ले हे विज्ञानाबद्दल सर्वसामान्य जनांसाठी उत्तम लिखाण करण्यासाठी प्रसिद्ध होते. या सर्वांनी या पुस्तकाची मुक्तकंठाने स्तुती केली. सर्व अभिप्राय एकत्रित करून वेल्स यांच्या अभिप्रायाबरोबर एक पुस्तिका तयार करण्यात आली. हे पुस्तक किती मजेशीर आहे, यावरच प्रकाशकानं मुख्यत्वे भर दिला. गणित या विषयाशी संबंधित असलेल्या प्रत्येक क्षेत्राशी संपर्क साधला गेला. ज्यांना न्यूनगंडानं पछाडलेलं आहे अशा व्यक्तीचा तो मनोगंड हे पुस्तक नाहीसा करील असंही त्या पुस्तिकेत आवर्जून नमूद केलं गेलं.

पुस्तक दिमाखात प्रसिद्ध झालं. आपल्या मित्रांचा सल्ला अव्हेरून, आपण हे पुस्तक अनविनकडं दिलं याबद्दल लेखकाला खंत करायची संधी मिळाली नाही. उलट तो खूष झाला. करार झाला होता तेव्हा लेखकाचं नाव पुस्तकावर छापायचं नाही असं ठरलं होतं. परंतु सुदैवाने ते पुस्तक प्रकाशित होण्याअगोदर त्या सुमारास, रॉयल सोसायटीचा फेलो म्हणून लेखकाची निवड करण्यात आली. सहाजिकच 'पॉप्युलर' पुस्तक लिहून, पॉप्युलर व्हायच्या मागे लागलेला आहे असंही कुणी ध्वनित करू शकला नसता. हॉगबेन आणि आनविन यांचे संबंध एका घटनेमुळे आणखी दृढ झाले. पुस्तकाच्या छपाईस सुरुवात झाली खरी, पण हॉगबेन सुरुवातीला



अनुक्रमणिका

दिलेल्या मजकुरात अनेक वेळा बदल करीत. कंपोज करणे, कागद या सर्वांच्या खर्चात एकसारखी वाढ होतच होती. यामुळे अनविन यांचे सहकारी चांगलेच कावले होते. पण अनविन यांनी हॉगबेन यांची प्रज्ञा चांगलीच वरच्या श्रेणीची आहे हे हेरले होते. आपल्या सहकाऱ्यांस अनविन यांनी बजावले की कोणत्याही परिस्थितीत त्यांनी हॉगबेन यांना दुखवावयाचे नाही. पुस्तक छापून पुरे झाल्यानंतर त्यांनी या वाढलेल्या खर्चाचा हिशोब हॉगबेन यांच्यासमोर ठेवला, व त्यासंबंधात त्यांचे मत काय आहे याबद्दल विचारणा केली. हॉगबेन यांनी आपण तो खर्च सोसावयास तयार आहोत असे सांगितले. मागाहून त्यांनी अनविनला विचारले, समजा मी हा खर्च सोसावयास तयार नाही असे सांगितले असते तर? यावर अनविननी उत्तर दिले, मी तुमची दानत ओळखून असल्याने तुम्ही तसे उत्तर देणार नाही हे मला माहीत होते. प्रत्यक्षात हॉगबेन यांना पैसे द्यावे लागले नाहीत. हॉगबेन यांचे 'न्यू बायॉलजी' हे पुस्तक प्रती संपाल्याकारणाने बाजारात मिळत नव्हते. त्या पुस्तकाची नवीन आवृत्ती विनामूल्य देण्याची तयारी हॉगबेन यांनी दाखविली. कालांतराने तेही पुस्तक अनविन यांनी प्रसिद्ध केले व तेही चांगले लोकप्रिय ठरले, अर्थात 'दि मॅथमॅटिक्स फॉर दि मिलिअन्स' ची बरोबरी त्या पुस्तकाला करता आली नाही.

पुस्तक लक्षावधी वाचकांपर्यंत पोचावं ही इच्छा. पुस्तकाची किंमत म्हणूनच कमी ठेवावी असं लेखकाला वाटतं होतं. पण पुस्तकाचा निर्मितीखर्च अफाट होता, त्यानुसार पुस्तकाची किंमत १६ किंवा अठरा शिलिंग ठेवावी लागली असती. पण हॉगबेननं स्वत:च्या मानधनात कपात करण्याची तयारी दर्शविली, जर प्रकाशकाने त्या पुस्तकाची किंमत बारा शिलिंग सहा पेन्स ठेवल्यास. याचाच अर्थ पुस्तकाच्या आणखी आवृत्त्या निघाल्यास फायदा होणार होता. लेखकांचं म्हणणं अनविननी मान्य केलं. परिणामी पुस्तक सहस्रावधी वाचकांच्या हाती गेलं. पुस्तकाचं नाव सार्थ झालं. पुढं पुढं पुस्तकाचा अफाट खप लक्षात घेऊन लेखकाला वाढीव मानधन दिलं गेले.

माझे मित्र श्री. भावे, (वरदा बुक्स) हे मला एकदा म्हणाले होते की, समर्थ रामदासांच्या 'दासबोध' या ग्रंथाला सतत थोडीफार मागणी असतेच. तसेच 'दि मॅथमॅटिक्स फॉर मिलिअन्स' या पुस्तकाचे आहे. अजूनही इतकी वर्षे होऊन गेली तरी हे पुस्तक खपतच असते.

'प्रकाशक रा. ज. देशमुख' या ग्रथांत रा. ज. देशमुख यांचे प्रकाशन व्यवसायासंबंधी तीन लेख अंर्तभूत करण्यात आलेले आहेत. ते वाचत असताना' स्टनली अनविन आणि रा. ज. देशमुख या दोन, भिन्न देशातील, दोन प्रकाशकांच्या एकंदर अनुभवातील सारखेपणा चांगलाच लक्षात येतो.

या ठिकाणी कोणी असा मुद्दा उपस्थित करील, की दोघेही प्रकाशक असल्याकारणाने ते लेखकांच्या बाजूने लिहिणेच शक्य नाही. या मुद्याच्या संदर्भात प्रख्यात इंग्लिश लेखक आर. एल. स्टिव्हनसन यांनी प्रकाशकासंबंधी लिहिलेल्या एका लेखाची आठवण होते. त्याविषयी पुन्हा केव्हातरी!

**– नाना जोशी**



अनुक्रमणिका

# नोंदवही

## लेखकाचा प्रतिनिधी

लिटररी एजंट या नावाची संस्था मराठी साहित्यक्षेत्रात नाही. पाश्चिमात्य साहित्यक्षेत्रात या संस्थेला अथवा व्यक्तीला फार महत्त्वाचे स्थान आहे. या संस्थेच्या कामाच्या स्वरूपाचे वर्णन स्थूलमानाने पुढीलप्रमाणे करता येईल. लेखकाच्या साहित्यकृतीला जास्तीत जास्त पैसे मिळतील अशा प्रकारे लेखकाच्या वतीने वाटाघाटी करणे, त्याच्या साहित्यकृतींचे हक्क सुरक्षित कसे राहातील यासंबंधी योग्य ती काळजी घेणे, लेखकाच्या साहित्यकृतीला चांगला व योग्य असा प्रकाशक शोधून काढणे व त्या प्रकाशकाशी वाटाघाटी करणे ही कामे ही संस्था वा व्यक्ती करते. लेखकाला जी काही प्राप्ती होते, त्यात अर्थातच या संस्थेचा वा व्यक्तीचा वाटा असतो. व त्यावरच त्यांचा योगक्षेम चालतो.मराठी साहित्यजगतात अशा प्रकारच्या संस्था नसल्याकारणाने हा असा व्यवसाय करून कोणी आपले पोट भरतो, सन्मानाने हा व्यवसाय करतो, ही कल्पनाच जरा अशक्य कोटीतली आहे. लिटररी एजंट या शब्दाला म्हणून चांगलासा प्रतिशब्द तयार होण्यात अडचणी येणारच. साहित्य ठेकेदार, साहित्य वकील, लेखक प्रतिनिधी, असे अनेक पर्याय नजरेसमोर आले. त्यातल्या लेखकाचे प्रतिनिधित्व करतो तो लिटररी एजंट, म्हणून लेखकप्रतिनिधी या शब्दाचा स्वीकार मी केलेला आहे. कोणास अधिक चांगला शब्द सुचला तर त्याचे स्वागतच होईल. इंग्लंडमध्ये अे. पी. वॉट ( A. P. WATT) या नावाची एक प्रख्यात संस्था हा लेखक प्रतिनिधित्वाचा व्यवसाय करते. या संस्थेत सत्तावीस वर्षे लेखक-प्रतिनिधी म्हणून काम केलेल्या, हिलारी रुबिनस्टाईन (Hilary Rubinstein) यांनी लिहिलेले एक टिपण मी देत आहे. या संस्थेतून सेवानिवृत्त होता होता, त्यानी ते लिहिलेले आहे.

"मी गेली सत्तावीस वर्षे ए.पी.वॉट या संस्थेत साहित्य-प्रतिनिधी म्हणून काम केले.आणखी थोड्याच दिवसांनी मी सेवानिवृत्त होईन.अनेकजण मला म्हणाले की, 'आपण आपल्या आठवणी लिहिणार आहात अशी आमची समजूत आहे.' या पुस्तकधंद्यातला एक व्यावसायिक म्हणून मला हे अगदी पक्केपणी ठाऊक आहे की ही अशी, आठवणींची पुस्तके, नेहमीच थेट जुन्या बाजारात जातात. याची कारणे पुढीलप्रमाणे. एकतर या व्यवसायात असलेले माझे मित्र हेच माझ्या या आत्मचरित्रवजा पुस्तकाचे ग्राहक. हेच ग्राहक, आपला परममित्र आपल्याला त्याचे स्वत:च्या आठवणींचे पुस्तक भेट देईल अशी अपेक्षा करतात.अर्थात पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर ते कोणास 'भेट' म्हणून पाठवायचे याची यादी प्रत्येक लेखकाकडे व प्रकाशकाकडे असतेच. जे कोणी या धर्मादाय यादीत नसतात, ते त्या यादीत असलेल्या व्यक्तीकडून हे पुस्तक मिळवून, ते वाचण्याची मनीषा बाळगून असतात. प्रकाशक आणि लेखक प्रतिनिधी यांना पुस्तके विकत घेऊन वाचण्याबद्दल तशी अरुची व नाराजीच असते.

ए. पी. वॉट या कंपनीची स्थापना १८७९ साली झाली. लेखक-प्रकाशक या दोघांच्यात दुवा साधून देण्याचे काम करणारी ही जगातली सर्वात जुनी संस्था आहे. तिने आजवर ज्या लेखकांचे प्रतिनिधीत्व केले आहे त्या लेखकांच्या यादीत इंग्लिश भाषेतील वाङ्मयातील विसाव्या शतकातील अनेक नामवंत लेखकांचा समावेश आहे. उदा. थॉमस हार्डी, मार्क ट्वेन, अर्नाल्ड बेनेट, रुडयार्ड किपलिंग इत्यादी. या लेखकांच्या पुस्तकाचे वा अन्य लिखाणाचे जे हक्क या संस्थेकडे होते, ते आता बाद ठरले आहेत. याचे कारण हे लेखक मृत्यू पावूनही अनेक वर्षे लोटली. या संस्थकडे अजूनही पी. जी. वुडहाउस, सॉमरसेट मॉम, कवी रॉबर्ट ग्रेव्हज्, एच. जी. वेल्स आणि इतर अभिजात साहित्यिकांच्या पुस्तकांचे व लिखाणाचे हक्क आहेत.

मी या संस्थेत पीटर वॉट यांच्या मृत्यूनंतर दाखल झालो. मूळ संस्थापक मि. वॉट, यांच्या कुटुंबियांपैकीच पीटर वॉट होते. ए. पी. वॉट या संस्थेत काम करणारे ते अखेरचे वॉट. त्यांच्यानंतर वॉट कुटुंबियांपैकी कोणीही वॉट या संस्थेत काम केलेले नाही. मी ज्या खोलीत माझे दैनंदिन काम करण्यासाठी बसत असे त्या खोलीत पुस्तके ठेवण्यासाठी व त्यांचे प्रदर्शनही व्हावे या हेतूने एक भले मोठे कपाट ठेवलेले होते. त्याच कपाटात पुस्तकांनी भरलेल्या काळ्या पत्र्याच्या जस्ती पेट्या ठेवण्यासाठीही खास व्यवस्था केलेली होती. वॉट संस्थेमार्फत ज्या (कालांतराने) नामवंत ठरलेल्या लेखकांची पुस्तके प्रकाशित व्हावीत यासाठी यशस्वी वाटाघाटी केल्या गेल्या होत्या, त्या लेखकांची पुस्तके या काळ्या जस्ती पेटीत ठेवलेली असत. प्रत्येक नामवंत लेखकासाठी वेगळी पेटी होती. उदा. – एका पेटीवर नाव होते डॉ. ए. कॉनन डॉयल (शेरलॉक होम्सचा जनक), यांचे नाव ज्या पेटीवर होते ते सुवर्णाक्षरात कोरण्यात आलेले होते. कालांतराने 'डॉ'-खोडले जाऊन त्याच्यावर 'सर' असे कोरण्यात आले. आणखी काही वर्षांनी, एक तिरपी रेघ काढून, त्या रेघेच्या तळाला 'मृत्यू पावले' ही अक्षरे कोरण्यात आली. या काळ्या जस्ती पेटीत ज्यांची पुस्तके होती, त्यातले बहुतेक लेखक मृत्यू पावले होते. या नामवंत मृतांच्या कीर्तीवर अवलंबून राहून धंदा करण्याची माझी इच्छा नव्हती. म्हणूनच मी या साऱ्या काळ्या जस्ती पेट्या तेथून हलविल्या आणि दुसऱ्या एका खोलीतल्या कपाटात बंद करून टाकल्या.

थोडे दिवस गेले. वॉट संस्थेत दाखल झालेल्या नव्या भागीदाराची 'तपासणी' व 'शोध' घेण्याच्या उद्देशाने, रॉबर्ट ग्रेव्ह हे कवी महाशय मी बसलो, त्या ठिकाणी आले. त्यांनी खोलीत इकडे तिकडे पाहिले, सरतेशेवटी माझ्यावर नजर रोखून, त्यांनी जाब मागितल्यागत मला विचारले, "तरुण गृहस्था, त्या काळ्या जस्ती पेट्या कोठे आहेत? माझ्या नावाची काळी पेटी कोठे आहे?" मी येथे अगदी नवीन बच्चा आहे. आणि या अशा महान साहित्यिकांच्या नावांच्या पेट्यांनी माझी खोली सजविण्याचा मला अजून तरी हक्क नाही, तो हक्क मला श्रम करून मिळवावयाचा आहे." अशा अर्थाचे मी काहीतरी चाचरत बोललो. तो क्षण मला तसा अस्वस्थ करणाराच होता. अनेक वर्षांनी आम्ही त्या काळ्या जस्ती पेट्या सोदबी (Southeby) कंपनीने आयोजित केलेल्या लिलावत विकून टाकल्या.



अनुक्रमणिका

आमचा तारेचा पत्ता (मी फॅक्स पूर्वीच्या दिवसांसंबंधी लिहितोय) 'लॉंजिव्हिटी' (Longevity) दीर्घायुष्य – लंडन असा होता. मी वॉट या संस्थेत ज्या महिन्यात दाखल झालो, त्याच महिन्यात सॉमरसेट मॉम हे वयाच्या पंचाण्णवाव्या वर्षी मृत्यू पावले. लेखकाच्या मृत्यूनंतर पन्नास वर्षेपर्यंत त्याच्या लिखाणाचे हक्क आमच्या संस्थेकडे असतात. म्हणजे मॉम यांच्या लेखनाबद्दलची रॉयल्टी आमच्याकडे इ.स. २०१५ पर्यंत राहाणार आहे. पी.जी. वुडहाऊस हे वयाच्या त्र्याण्णवाव्या वर्षी मृत्यू पावले. मी त्यांच्या अखेरच्या वर्षात त्यांचे प्रतिनिधित्व केले, याबद्दल मी स्वत:ला फारच नशीबवान समजतो. 'प्लम' या नावाने त्यांची अगदी जवळची मित्र मंडळी त्यांना संबोधीत असत. मला त्यांनी सुरुवातीलाच सांगितले की मी त्यांना 'प्लम' म्हणूनच हाक मारायची. मी माझ्या स्वप्नसृष्टीत, ज्या लेखकांची माझ्या मनोमंदिरात स्थापना केली आहे, त्यापैकी पी. जी. वुडहाऊस हे एक. माझ्या मनोमंदिरात विशिष्ट लेखकांची स्थापना होत असे. प्रतिभावान, सतत काहीना काही नवनिर्माण करणारे, आपल्या व्यवसायाची बूज राखणारे, शालीन, दाखवेगिरीचा स्पर्शही नसलेले, दुसऱ्याचे कौतुक करण्याच्या बाबतीत उदार, आणि कधीही चिडचिड न करणारे, असे जे लेखक होते, त्यांचीच स्थापना माझ्या मनोमंदिरात होत होती. ऑगडेन नॅश हा त्यापैकी एक. सध्या हयात असलेल्या लेखकापैकी मायकेल होलोरीड (MICHAEL HOLORYD), जॅन मॉरिस (JAN MORRIS), फ्रॅंक मूईर (FRANK MUIR), आणि क्वेनटिन ब्लेक (QUENTIN BLAKE) यांचा समावेश आहे.

या ठिकाणी नॅश यांच्यासंबंधी कांही सांगितलेच पाहिजे. त्यांच्या काव्यपंक्ती या चतुराई व कौशल्य दर्शविणाऱ्या असतात. आणि त्या रचावयास सोप्या आहेत असे वरवर भासते. परंतु प्रत्यक्षात त्यांचे अनुकरण करणे हे फारच कठीण आहे. ऑगडेन नॅश या अशा काव्यपंक्तींची रचना फारच सहजपणे करीत. मी त्याचा साक्षीदार आहे. त्याचे असे झाले. एकदा ते माझ्याकडे रात्रीच्या भोजनास आले होते. मी त्यांची माझ्या दोन छोट्या मुलांशी मार्क आणि बेन ओळख करून दिली. बेनकडे नॅश यांच्या काव्यसंग्रहाची एक प्रत होती. तिच्यावर नॅश यांनी स्वाक्षरी करावी अशी विनंती बेनने केली. नॅशने ताबडतोब आपले पेन बाहेर काढले आणि लिहिले–

THIS FOR BEN – हे बेन साठी

THE KINDEST OF MEN सगळ्यात दयाळू माणसासाठी NO PERHAPHS FOR A LARK आणि कदाचित गंमत म्हणून

HE WILL LEND IT TO MARK तो हे मार्कला देईल.

आपण परत एकदा पी. जी. वुडहाऊसकडे वळूया. मी वॉट या संस्थेत दाखल झाल्यानंतर लगेच पहिल्याच वर्षी अमेरिकेत न्यूयॉर्क या शहरी गेलो. प्लम (पी. जी. वुडहाऊस यांचे टोपण नाव) यांनी मला प्लाझा या प्रख्यात व आलिशान रेस्टॉरंटमध्ये जेवावयास बोलावले. आम्ही क्रिकेट या खेळासंबंधीच बराच वेळ बोललो. प्लम यांचे वय त्यावेळी चौऱ्याऐंशी होते. ते मला म्हणाले, " लॉर्डस या मैदानावर क्रिकेटचा सामना पाहाण्याची त्यांना जबर इच्छा आहे." तोवर

त्यांनी आपल्या इतक्या मोठ्या आयुष्यात एकदाही विमानाचे प्रवास केलेला नव्हता. विमानाने प्रवास करणे, हा अनुभव त्यांना भीतीदायक ठरला असता का?असे त्यांनी मला विचारले. मी त्यांना तेथेच सांगितले, की तसे काहीही होणार नाही. त्यांनी इंग्लंडला विमानानेच यावे असा आग्रह मी त्यांना केला. त्यांचे फारच उत्साहाने स्वागत होईल, असे आश्वासनही दिले. कदाचित् या आश्वासनामुळेच ते आले नसावेत. कारण त्यांना गर्दीबद्दल घृणाच होती आणि त्यांची फार कोणी विचारपूस केलेलीही त्यांना पसंत नसे.

आमच्याकडे येणारे काही लेखक, आमच्या संस्थेत फार वर्षे ठिय्या देऊन असत. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, हे लेखक हाती असलेली साहित्यकृती पुरी करण्यास बरीच वर्षे घेत. मार्टिन गिलबर्ट यांनी लिहिलेल्या विन्स्टन चर्चिल यांच्या चरित्राचेच उदाहरण देता येईल. हे चरित्र तसं चांगलेच भले मोठे आहे. चर्चिल यांच्या सर्व चरित्रात, तो प्रमाणग्रंथ मानला जातो. अगदी अखेरचा शब्द, इतका त्याला साहित्य जगतात मान आहे. मार्टिन गिलबर्ट यांनी आपल्या आयुष्याचा अर्ध्याहून अधिक काळ, या चरित्रलेखनात घालविलेला आहे. दुसऱ्या महायुद्धावरचा एक ग्रंथ, वेगवेगळ्या विषयांवरचे बाराहून अधिक ग्रंथांचे लेखन आणि Holo Caust होलोकोस्ट (ज्यूंचे शिरकाण), या घटनेसंबंधी अधिकारी समजल्या जाणाऱ्या एका ग्रंथाचे लिखाणही याच काळातले. एच. सी. रॉबिन्स, लानडोन (H. C. ROBBINS, LANDON) हे संगीतशास्त्रावर लिखाण करणारे प्रख्यात लेखक ! त्यांनी, आता संस्मरणीय ठरलेला पाच खंडातील HAYDN – हेडन या संगीतकाराबद्दलचा चरित्रग्रंथ लिहिण्यास चाळीस वर्षे घेतली. गमतीची गोष्ट अशी की त्यांनी तो चरित्रग्रंथ हातावेगळा केल्यानंतर "MOZARTS LAST YEARS "(मोझार्ट यांची अखेरची वर्षे) मोझार्टस लास्ट इअर्स हा ग्रंथ लिहिला. १७९० साली या ग्रंथाने सर्व जगात खपाच्या बाबतीत उच्चांक गाठला. बेस्ट सेलर्सच्या यादीत या ग्रंथाचा समावेश झाला होता.

होलोरीड हे असेच लांब पल्ल्याची धाव करण्यात पटाईत असलेले लेखक आहेत. बर्नार्ड शॉ यांचे चरित्र त्यांनी चार खंडात लिहिले आहे. ते लिहिण्यास त्यांनी सतरा वर्षे घेतली. अजूनही शॉ या व्यक्तीसंबंधीचे त्यांचे लिखाण पुरे झालेले नाही. त्यांच्या मूळ चरित्रग्रंथाला पूरक म्हणून आणखी दोन खंड तयार करण्याच्या खटपटीत ते १९९२ साल संपेपर्यंत होते. ब्रिटनमध्ये हा चरित्रग्रंथ व त्याचे पूरक ग्रंथ, प्रसिद्ध होण्याअगोदर आणि प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांना या ग्रंथराजाच्या हक्कापोटी ६२५,००० पौंड मिळाले. सहा खंडाचा हा ग्रंथराज, आणि वीस वर्षांची कडी मेहनत या सर्वापोटी, हे पैसे त्यांना मिळाले होते. परंतु पैशाचा हा प्रचंड आकडा ऐकून अनेकांची छातीच दडपली. अनेकांनी त्यासंबंधी आरडा-ओरडाही केला. बी. बी. सी वर माझी एक मुलाखत झाली. ती हंफ्री कारपेंटर यांनी घेतली होती. त्यांनी माझ्याकडून एक कबुली घेण्याची या मुलाखतीत सातत्याने प्रयत्न केला. त्यांचे म्हणणे थोडक्यात असे होते की, होलोरीड लिहिणार होते ते पुस्तक, कांदबरी नव्हती, तो एक चरित्रग्रंथ होता. त्याचे एवढे अव्वाच्या

सव्वा पैसे दिल्यानंतर प्रकाशनाच्या धंद्यात सातत्याने वाढत जाणारे Spiral निर्माण होईल. वरच्या दर्जाचे अनेक लेखक अधिक अधिक पैशांची मागणी करतील. याला कारण वॉटस्‌सारख्या संस्था आहेत. याच संस्था लेखकास हे प्रमाणाबाहेर पैसे मिळवून देण्यास कारणीभूत होतात. यामुळे प्रकाशनधंद्याचे जे नुकसान होणार आहे, त्याला हे लेखक-प्रतिनिधी जवाबदार आहेत.

कार्पेंटर यांच्या युक्तिवादात काहीही अर्थ नाही. प्रकाशकांना लेखकाला जेवढे पैसे देण्याची इच्छा असते, तेवढेच पैसे ते पुस्तक लिहिण्यासाठी देतात. अनेक वेळा प्रकाशकांना वाटते पुस्तकाची जाहिरात व्यवस्थित व योग्य ठिकाणी केली की, मग त्यांनी त्या पुस्तकवर जो काही खर्च केलेला असतो, तो भरून निघेलच. वर आणखीही अधिक पैसे मिळतील. काही वेळा ते अशीही अटकळ बांधतात की एखादे पुस्तक बेस्ट सेलर ठरेल. किमानपक्षी खपाचा उच्चांक गाठील. यामुळे प्रकाशनसंस्थेला इतका फायदा होईल की त्यासाठी अगोदर दिलेली रक्कम ही विचारातही न घेण्याइतकी नगण्य असेल. काही वेळा एखादे तोटा देणारे पुस्तक प्रकाशित करणे हेही फायद्याचे असते.

साहित्य-प्रतिनिधीकडे, जवळ जवळ सर्वच लेखक कोणाच्याना कोणाच्या शिफारशीने येतात. याला अपवाद आहेत. मी वॉट संस्थेत दाखल होण्यापूर्वी प्रकाशनाचा धंदा करीत होतो. त्या काळात व अजून नोबेल परितोषिकविजेत्या नॉडिन यांची व माझी घनिष्ठ मैत्री होती. अलिसन लुरी ALISON LURIE या कोणाच्या तरी तोंडी शिफारसीवरून आमच्याकडे आल्या. असाच एक दिवस मला कोठून तरी फोन आला, आणि फोन करणाऱ्या अलिसन लुरीने मला घाबरत सांगितले की मी एक लेखक आहे. व त्यानंतर मी आपणसा भेटावयास येऊ का असे विचारले. ती त्याप्रमाणे आली आणि तिच्या नव्या कादंबरीची 'ONLY CHILDREN' ओनली चिल्ड्रेन टंकलिखित प्रत माझ्या हाती ठेवली. परंतु या सारखे दिवस वारंवार येत नाहीत. या अशा दिवसांना स्मरणात नेहमीच स्थान मिळते. त्यांची आठवण सुखावतेही.

काही वेळा लेखक असेच अवचितपणे, कल्पना नसताना, आपल्याकडे चालून येतात. ते एकाच प्रकारे येतात असेही नाही. एकदा मी स्कॉटलंडच्या अगदी उत्तरेच्या भागात सुट्टीवर असताना एका हॉटेलमध्ये राहात होतो. मी त्या हॉटेलचे मालक जेराल्ड इरव्हिन (GERALD IRVINE) यांना मी साहित्य-प्रतिनिधी आहे असे सांगितले. त्यांनी मला असे सांगितले की त्यांची कन्या साऊथ सी आयलंड या ठिकाणी एक वर्ष जाऊन नुकतीच परत आली आहे. तिला कॉलिन्स (COLLINS) या कंपनीने नमुन्यादाखल प्रकरण लिहिण्यासाठी म्हणून दोनशे पौंड देऊ केले आहेत. तिला साहित्य-प्रतिनिधीची जरूरी आहे का? मी त्यांना सांगितले की कॉलिन्स ही फार चांगली प्रतिष्ठा असलेली आदरणीय अशी प्रकाशनसंस्था आहे. सामान्यपणे अडचण येणार नाही. यदाकदाचित् आलीच तर मला तिला मदत करायला आवडेल.

थोड्याच दिवसांनी इरव्हिन यांनी मला टेलिफोन केला आणि ते मला म्हणाले, कॉलिन्स यांच्याकडे नमुन्यादाखल पाठविलेले प्रकरण, त्यांना ते पसंत नाही, असे सांगून परत पाठविले आहे. या प्रकरणाचे ज्यांनी संपादन केले होते आणि ज्यांनी तिला ही इसाऱ्याची रक्कम देऊ

केली होती, तेही या प्रकरणात चांगलेच कावले होते. हे सर्व पाहून ल्यूसीने ते नमुनाप्रकरण दुसऱ्या एका प्रकाशकाकडे पाठविले. या माणसाने इरव्हिन यांच्या कन्येला फोन केला आणि सांगितले की तिचे पुस्तक लिहून पुरे होईल तेव्हा त्याला भविष्य जरूर आहे. त्याने असेही सांगितले की शनिवार, रविवार रात्रीच्या गाडीने इनव्हरनेस (स्कॉटलंडच्या पार उत्तरेस असलेले शहर) येथे येतो. येताना तो आपल्याबरोबर करारपत्राचे कागद घेऊन येणार होता. प्रश्न असा होता की ल्युसीने या करारपत्रावर सही करावी का?

या खेपेला, मी पूर्वीची अनास्था सोडली आणि त्यात जास्त लक्ष घातले. मी ते नमुना–प्रकरण वाचले आणि त्या पुस्तकाचा भविष्यकाळ चांगला उज्ज्वल आहे हे माझ्या लक्षात आले. मी त्यांना कळविले "तिचा साहित्य–प्रतिनिधी म्हणून काम करायला मला फारच आवडेल. तसेच मी अशा तऱ्हेचा करारनामा पदरात पाडून घेईन की तिला सुरुवातीला जे पैसे देण्यात आले होते, त्यापेक्षा कितीतरी अधिक पैसे तिला मिळतील असेही मी पाहीन." हे पुस्तक 'कास्टअवे' (CAST AWAY) या नावाने प्रसिद्ध झाले. ते पुस्तक जणू ईश्वराने धाडलेले बेस्ट सेलर ठरले. अशा प्रकारच्या फारच थोड्या पुस्तकांच्या बाबतीत मी साहित्य–प्रतिनिधी होई. पण त्या थोड्या पुस्तकात या पुस्तकाची गणना करावीच लागेल.

माझी परीक्षा नेहमीच अशी अचूक असे का? चुका कधीच झाल्या नाहीत का? तशा पुष्कळच चुका झालेल्या आहेत. त्यातल्या सगळ्यात फारच महाग पडलेल्या चुकीबद्दल सांगतो. JOHN SELWYN GUMMER जॉन सेलविन गुम्मर हे आमच्या संस्थेचे एक लेखक. त्यांनी माझ्याशी, आपल्या एका पुस्तकाची सारांशवजा–रूपरेषा वाचावयास आणून दिली. ती चांगली चाळीस पानांची होती. त्या पुस्तकांचे नाव होते 'NOT A PEENY MORE' नॉट ए पेनी मोअर. हे घडले तेव्हा गुम्मर यांनी राजकारणात प्रवेश केलेला नव्हता. मला या पुस्तकाचा एकंदर सूर व ढंग काही पसंत पडला नाही. आणि मी ते नाकारले. या लेखकांचे नाव होते जेफ्री आर्चर. या अशा चुकीबद्दल काही खंत वा खेद आहे का? अजिबात नाही. मी या केलेल्या लक्षणीय चुकीवर अनेक वर्षे गुजराण केली.

मी साहित्य-प्रतिनिधी हा व्यवसाय करीत होतो. त्यावेळी मी करीत असलेल्या कामाच्या विशिष्ट अंगाबद्दल मला आत्मीयता होती. प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तित्वात काही भाग पुरुषत्वाचा, काही स्त्रीत्वाचा असतो. लेखक-प्रतिनिधी म्हणून काम करताना हे दोन्हीही भाग सारख्या प्रमाणात उपयोगात आणावे लागतात. आमच्याकडे आलेल्या लेखकांची तरफदारी करताना चिकाटी दाखवावी लागते. प्रकाशक, संपादक आणि निर्माते या सर्वांशी वाटाघाटी करताना ठामपणे उभे राहावे लागते. आपण ज्याचे प्रतिनिधीत्व करीत आहोत, त्याला कोणी लुबाडणार नाही यासाठी कमालीचा उग्र असा प्रतिकार करावा लागतो, हे सारे एकीकडे करीत असताना, दुसरीकडून आमच्याकडे आलेल्या लेखकाला सल्ला देणे, त्याला पाठिंबा देणे व प्रोत्साहन देणे, हेही करावे लागते. प्रख्यात मानसशास्त्रज्ञ युंग याला हे खासच पसंत पडले असते.

**नाना जोशी**

---



**फ्रांझ काफ्का**
**(१८८३-१९२४)**

**जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा**
**जर्मन कथा-कादंबरीकार.**

**विसाव्या शतकातील**
**या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा**
**मराठीमधी[illegible] पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ[illegible] [illegible]वनवृत्तांत.**
**'द ट्रायल' या कादंबरी[illegible] अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्यसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'तपशील' च्या वर्गणीदारांना**
**सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा
**नाना जोशी**
४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२

अनुक्रमणिका